# गलोल

( विनोदी लेखांचा नवा संग्रह )

शामराव ओक



एप्रिल १९३८

किंमत

रुपया

# खडा लावतांना—

प्रवासी बांकावर घाईघाईत पाहिलेल्या वर्तमानपत्रांतल्या गोष्टी, पुस्तकाच्या आराम खुर्चीवर संथपणें पुन्हां चाळण्याची ( व त्यांतील दोष काढण्याची ) संधी वाचकांना दिल्याचें सात्विक समाधान आज लेखकाला होत आहे.

या पुस्तकाच्या उपयुक्ततेबद्दल नैसर्गिक नम्रतेमुळें लेखकाला जास्त कांहींतरी सांगतां आलें नाहीं तरी यांतले कांहीं ठळक गुण वाचकांच्या निदर्शनास आणण्याची तो परवानगी घेत आहे.

एकाद्या चांगल्या चिवट कागदाचें पुष्टिपत्र घालून ( व याप्रमाणें पुस्तकाचें नाव झांकण्याची खबरदारी घेऊन ) डाव्या ( अथवा उजव्या ) बरगडीजवळ हें पुस्तक धरून गंभीरपणें रस्त्यानें गेल्यास, 'अभ्यासू इसम, अशी आसपासच्या लोकांवर ( विशेषतः स्त्रियांवर ) छाप पाडणें सोपें जाईल. ( तात्पुरता चष्मा लावल्यास अधिक बरें. ) वादविवादाचे प्रसंगीं 'अखेरचा मुद्दा' म्हणून हें पुस्तक किती उपयोगी आहे हें याच्या मजबूत बांधणीवरून तावडतोब ध्यानांत येईल. पावसाच्या सरीनंतर रम्य वनश्रींत फिरायला जाऊन बसायला कोरडी जागा नसल्यास, हें पुस्तक उघडून मांडतांच निसर्गसौंदर्याच्या प्रेक्षकास मोफत आसन तयार होईल. वडील मंडळींना न कळत सिनेमाला गेलेल्या होतकरू विद्यार्थ्याला, पलीकडे आपले पालक बसले आहेत असा दुष्ट संशय आल्यास, दिवे लागतांच या ग्रंथाची ढाल तोंडाआड धरून सहीसलामत बचावून जाणें शक्य आहे. कॉलेजांतील उमद्या तरुणाची ओळख करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या विद्यार्थिनीस, 'हातातून पडून' त्या तरुणानें उचलून, देऊन बोलणें सुरूं करण्यासाठीं निमित्तमात्र होण्याचे बाबतींत, प्रस्तुत पुस्तक कोणत्याही महाकाव्याला हार जाणार नाहीं. यांतील मजकूर विनोदाला पांचटपणा समजणाऱ्या आंबट इसमाला योग्य ती चीड आणून त्याच्या मेंदूला तजेला देण्यास मदत करील, आणि विनोदबुद्धीपासून अलिप्त असलेल्या गंभीर

गृहस्थाला गुंगी आणून त्याला निद्रानाशावर अचूक इलाज म्हणूनही वापरतां येईल. शिवाय मध्यरात्रीं भांडणाऱ्या मांजराकडे नेम धरून फेंकल्यास निद्रानाशाच्या अशा दुसऱ्या प्रकारावरही हा रामबाण उपाय आहे असें अनुभवान्ति कळेल.

याखेरीज होमिओपाथिक गोळयांच्या पुंड्या बांधण्यास, बाबा-लोगांच्या आरमारखात्यास कच्चा माल पुरविण्यास, चुलीवरची भांडीं उतरण्यांस, लंगड्या कपाटाला टेंकण देण्यास व अशा प्रकारच्या किप्येक व्यवहारी कार्यांस, यापुढील पानांचा उपयोग महाराष्ट्राच्या आबालवृद्धांना करतां येईल, या आगाऊ कृतार्थतेनें सद्‌गदित होऊन लेखक वाचकांची पान उलटेपर्यंत रजा घेत आहे.

———

लोकांच्या मालकीचीं पुस्तकें वाचीत—
झाडावरून दिसणारी मोफत मौज
पाहण्याचें सोडून,
मैदानांत उतरून
पदरच्या पैशांनीं पुस्तकें खरीदण्याचें
असामान्य नैतिक धैर्य–[ व उधळेपणा ]
दाखविणाऱ्या
विस्मयकारक वाचकवर्गास
चकित आदरानें अर्पण.



# अनुक्रमणिका



*"........Lest there should be any well-intentioned persons who do not perceive the difference ( as some could not, when OLD MORTALITY was newly published) between religion and the cant of religion, piety and the pretence of piety, a humble reverence for the great truths of Scripture and an audacious and offensive obtrusion of its letter and not its spirit in the commonest dissensions and meanest affairs of life, to the extra-ordinary confusion of ignorant minds, let them understand that it is always the latter and never the former, which is satirized here. Further that the latter is here satirized as being, according to all experience inconsistant with the former, impossible of union with it, and one of the most evil and mischievous falsehoods existent in Society-whether it establish its headquarters for the time being, in Exeter Hall or Ebenezer Chapel or both. It may appear unnecessary to offer a word of observation on so plain a head. But it is never out of season to protest against that coarse familiarity with sacred things which is busy on the lip and idle in the heart, or against the confounding of Christianity, with any class of person who, in the words of SWIFT, have just enough religion to make them hate and not enough to make them love, one another..."*

*CHARLES DICKENS in the preface to*
*—Pickwick Papers*

# भूमिका

...कोणी तिऱ्हाइत पण सरळ मनाचीं माणसें असतात. 'मत बनवण्या'च्या आवेशांत, कांहींकांहीं साधे फरक अशांपैकीं कित्येकांच्या दृष्टीआड होतात; उदाहरणार्थ धर्म आणि बावळट श्रद्धा, श्रद्धा आणि श्रद्धेचें ढोंग. धर्मग्रंथातल्या श्रेष्ठ सत्यांबद्दल नम्र आदर ठेवणाऱ्या माणसाला वरील लोक (आपल्या अल्पसंतोषी बुद्धीला फारशी तकलीफ न देतां) मान–देतील न देतील, पण हजामतीलादेखील धर्मसिंधूतली वाटी भरून आणणाऱ्या, विजेची बत्ती पेटली कीं भाविकपणें नमस्कार करणाऱ्या, देवळापुढून जातांना (थोडें हलकेच आजुबाजूला पाहून) देवाला चोरनमस्कार करणाऱ्या, 'खुट्' झालें कीं 'फिस्स!' करणाऱ्या, कोणत्याही सद्‌गृहस्थाला वरील कित्येक लोक तितकाच मान देतील! तेव्हां वरील कित्येक लोकांनीं डोळे उघडून न्याहाळून पाहावें–कारण सभ्य कपड्यांतल्या अरबूज अडाण्यांची भोंवताली गर्दी माजली आहे–कीं, वर दिलेल्या उदाहरणांतील जोड्यांपैकीं, दुसऱ्या प्रकारांचेवरच या काश्मिरी शालींतील नगांचा रोख आहे. अंगभूत किंवा सिद्ध गुणावर ज्या गोष्टी आदरणीय आहेत त्यांचेबद्दल येथें योग्य तो आदर दिसेलच. येथील आहेर वरील पहिल्या प्रकारांशीं न जुळणाऱ्या दुसऱ्या प्रकारांना आहे. विचारप्रधान धर्म, प्रामाणिक श्रद्धा, सत्याविषयीं चौकसबुद्धि–या पहिल्या प्रकारांशी, मूर्खपणापासून बदमाषीपर्यंत शिक्षण देणाऱ्या दुसऱ्या प्रकारांची विसंगति बरीच दिसते. (असें कांहीं धूर्त वाचकांनीं हेरलेंच असेल). थोडक्यांत म्हणजे कांहीं मूर्ख व कांहीं ड्यांबीस लोकांनीं मोठमोठ्या गोष्टींचीं नुसतीं सोंगें घेऊन एकमेकांना (आणि स्वतःला, कधींकधीं न कळत) बनविण्याचा धीमा, पद्धतशीर, एकादेवेळीं निरुपरुद्रवी–मार्ग पत्करला आहे. (त्यामुळें आमची जरी करमणूक होते,) तरी एकंदर हें

नसावें; वाईट (म्हणजे निर्बुद्ध, भाविक ढोंगी, किंवा लुच्चा मवाली ढोंगी) माणसांमुळें समाजाचें नुकसान व्हावें, असें साधारणपणें कोणाला वाटत नसावें. (असा अंदाज आहे.) तेव्हां मठापासून मारवाडी बाजारापर्यंत जे जे कोणी इसम ढोंग करीत उभे असलेले जागोजाग आढळतील त्यांची गचांडी धरून त्यांचीं तोंडें जगाकडे फिरविणें, लबाडांच्या अड्ड्यावरील छपरें उडवणें, आणि बावळटांना योग्य जागीं चिमटे घेणें, हा जाणनबुजून टिंगल करणाराचा बाणा आहे.

(वास्तविक हें सगळें पुराण तसें पाहिलें तर जरूरही नसेल, पण एव्हांना आपल्या पुऱ्या ध्यानांत आलेल्या दुसऱ्या प्रकारच्या मित्रांनीं सत्याची इतकी विटंबना चालविली आहे कीं आपला वेळींच एक इषारा दिलेला बरा.) मोठमोठ्या भव्य गोष्टींच्या वाफा तोंडानें सोडत असता पोटात विषारी धुराचे कारखानें चालविणाऱ्यांचेवर निर्दय कुचेष्टेची मशिन-गन चालवून, त्यांना फजितीने नेस्तनाबूत करणें हें आपलें काम आहे. आपली शिकार तत्त्वांचा शंखध्वनि करणाऱ्या बनानेवाल्यांपासून बननेवाल्या-पर्यंत आहे; कारण आपापसांत द्वेष करण्यापुरतींच तत्त्वें अशांच्या ठायीं असतात, दोस्तीचीं तत्त्वें त्यांना आढळून आलेलीं नसतात.

---

# चेंडूफळीचा चांचणी सामना

[ **टीपः**—पुढेंमागें सह्याद्रीच्या शिखरांतून अनेक ज्वालामुखी प्रकट होऊन किंवा धरणीकंपानें राजपुतान्याचा समुद्र होऊन दख्खन पठारावर रेताड वाळवंट उत्पन्न झालें, किंवा अशाच एकाद्या दैवी घटनेनें महाराष्ट्रीय संस्कृति सुरक्षितपणें गाढली गेली, हजारो वर्षांनीं एकाद्या गोंड किंवा संताळ अशा नवीन परिणत संस्कृतीच्या संशोधकांनीं आमच्या संस्कृतीचे अवशेष उकरून काढले, व त्यांत पुढील लेख त्यांना गवसला, तर या लेखांत निर्दिष्ट झालेले लोक कोण होते ही त्यांना अडचण पडूं नये, म्हणून अशा ठळक लोकांविषयीं त्रोटक माहिती देणें या कर्तव्यानें लेखक भविष्यकालाला बांधला गेला आहे ( हुश्श ऽऽऽ ). ]

---

( काल—ख्रिस्ती शक १९३७ )

**आहिताग्नि राजवाडे**—पुणें नामक शहरांतील वैदिक अग्निपूजक. तीनचार हजार वर्षांपूर्वीच्या संस्कृतीचा अवशेष अट्टाहासानें जिवन्त ठेवण्याचा प्रयत्न करणारे एक 'पुराणावशिष्ट'.

**प. सातवळेकर**—वेदकालीन बीं—बयाणें लावून धार्मिक बागाईत करणारे एक खेडेगांवी प्रयत्नवादी.

**चौंडेबुवाः**—तत्कालीन हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें 'गाय' नामक पाळीव जनावराच्या पाठीवर लादून श्रद्धेची पैदास करूं पाहणारे एक सन्त.

**पांगारकरः**—जुन्या महाराष्ट्रीय सन्तांचीं चरित्रें अभ्यासून देशाची भाषा व स्वतःचें भाण्डार यांत भरपूर भर घालणारे एक क्षेत्रस्थ. धार्मिक भाषेपासून रजा या अर्थी व्याख्यानें देऊन जिव्हालौल्य पुरें करीत असत.

**आजगांवकरः**—दुसरे एक संतचरित्रकार—प्रकाशकिरणें यांच्या डोळ्यांपर्यंत पोहोंचण्यास पन्नास वर्षें लागत असें म्हणतात.

**किंजवडेकर**:—तेव्हांच्या हिंदु रूढीनें वर्ज्य ठरविलेल्या मांसाशनाचा मोका 'यज्ञ' नामक पुराणविधीनें साधण्याची युक्ति काढणारे एक बोकडांचे काळ.

**करंदीकर**:—'केसरी–संस्था' नांवाच्या पुराणपाठशाळेतील एक आचार्य.

**माटे मास्तर**:—'सदाशिव पेठ,' म्हणून कांहीं काळ प्रसिद्ध असलेल्या एका पुणेरी पोट–संस्कृतीचे आधारस्तंभ.

**मराठे** ( अश्लील ):—साहित्य–सम्मेलन नांवाच्या वार्षिक उरूसांत 'अश्लीलतेविरुद्ध' ठराव नियमानें आणणारे एक इसम.

**लखुअण्णा भोपटकर**—तालिमबाजी व आवाजी राजकारणानें पुणेरी संस्कृतीला नेट देणारे एक वकील.

**भालाकार भोपटकर**—वरच्यांचे बंधु; भोजनांनीं राष्ट्राचा उद्धार करण्यास सरसावलेले एक लोकरंजक.

**रघुनाथपंत कर्वे**—लैंगिक स्वातंत्र्याचे महाराष्ट्रांतील पहिले पुरस्कर्ते; अतएव सनातनी लोकांत वरकरणीं अप्रिय, पण आंतून जबरदस्त कुतूहल निर्माण करणारे.

**दिवेकरशास्त्री**—भटजी संस्कृतीशीं बेइमान होऊन रूढींचे वाभाडे काढणारे एक 'व्रात्य' ब्राह्मण.

**राव सावरकर**—धर्माच्या रूढ समजुतींना विचारवादाचे सुरुंग लावणारे एक प्रामाणिक क्रांतिकारक.

**डॉ. केतकर**—तत्कालीन महाराष्ट्राचे मूर्तिमंत ज्ञानकोश व बेफिकीर विचारवादी.

**भाई देशपांडे**—ललितवाङ्मयांत विहरणाऱ्या आपल्या सुंदर भाषेला साम्यवादाच्या वेठीस लावणारे एक सौंदर्यविध्वंसक.

**जाधवराव**—पुराणांचे मल्लीनाथ व संशोधनाचे 'कवि'

**खांडेकर**—आपल्या मूळच्या उत्तम भाषेवर अलंकारांचीं कलमें करून काव्याचे ताटवे कल्पनेच्या देहावरच फुलविणारे एक सहृदय पंडित.

**फडकेः**—भाषेच्या मऊमऊ व आरामशीर सणगांचे एक व्यापारी.

**अत्रेः**—भाषेचीं जंगीं हत्यारें व वाद्यें वाजवून दाणादाण उडविणारा एक सात्त्विक राक्षस, शिशुपाल—व पशुपाल ).

**काणेकरः**—मूळचे कवि असून एका बेसावध क्षणाला साम्य-वादाच्या आहारीं जाऊन स्वतः सुस्त बनलेले एक जडवादी.

**मराठे** ( वसन्तराव ):—तत्कालीन पुढाऱ्यांच्या अनुचराचा एक निर्बुद्ध नमुना.

## आजची चुरशीची चढाओढ

मुंबई. ता. १ जुलै

आज रोजीं बरोबर बारा वाजतां आगाऊ जाहीर झाल्याप्रमाणें दादर—माहीमच्या 'शिवाजी पार्क' या विस्तीर्ण मैदानावर, 'सनातनी विरुद्ध नवमतवादी' हा चेंडूफळीचा चांचणी सामना मोठ्या उत्साही वातावरणांत सुरू झाला. प्रतिस्पर्धी पक्षांचे प्रतिनिधी व इतर कार्यवाह खालीं दिल्याप्रमाणें उपस्थित होतेः—

| सनातनी | वि. | नवमतवादी |
|---|---|---|
| आहिताग्नि राजवाडे [नाखवा—Skipper] | | रघुनाथपंत कर्वे [ नाखवा ] |
| पंडित सातवळेकर | | दिवेकर शास्त्री |
| चौंडेबुवा | | राव सावरकर |
| मुमुक्षु पांगारकर | | डॉ. केतकर |
| म. भा. भू. आजगांवकर | | भाई पी. वाय. देशपांडे |
| याज्ञिक किजवडेकर | | ना. जाधवराव |
| ज. स. करंदीकर | | वि. स. खांडेकर |
| माटे मास्तर | | प्रो. फडके |
| अश्लील मराठे | | प्रि. अत्रे |
| लखूअण्णा भोपटकर | | अनंत काणेकर |
| भालाकार भोपटकर | | वसंतराव मराठे |

**राखीव**—दा. न. शिखरे, वा. कृ. भावे, प्र. ह. खाडीलकर, न. र. फाटक, चि. गोपीनाथ तळवलकर, इ. इ. इ.

**राखीव**—प्रभाकर पाध्ये, मा. कृ. शिंदे, अनंतराव गद्रे, वर्तक, रा. प्र. कानिटकर, इ. इ. इ.

सनातनी विरुद्ध नवमतवादी यांच्यामधील ईर्षेचा स्फोट कोणत्या रूपानें होतो इकडे अखिल महाराष्ट्राचें सचिंत लक्ष लागलें होतें. यांची यादवी विकोपाला जाऊन हे एकमेकांचीं डोकीं फोडतात का त्याहूनही बेहोष होऊन आपापसांत समेट करतात, अशा शंकाकुशंका लोक काढीत होते; पण थंडपणें विचार करणारे ओळखून चुकले होते कीं, हे लोक हिंदु असल्यामुळें पहिला व महाराष्ट्रीय असल्यामुळें दुसरा असे दोन्ही प्रसंग या वादांत येण्याची भीति नाहीं ! तथापि एकदां निर्णय हा लागायलाच हवा होता. साहित्य—संमेलनें व वृत्तपत्रें यांतून गालिप्रदान करण्याची युद्धपद्धति आतां कंटाळवाणी झाली होती. लाडू खाण्याच्या चढाओढींची सनातनी सूचना नवमतवाद्यांनीं कबाब खाण्याचा धाक देऊन फेंटाळून लावली होती. पावसाळ्यांत पुण्याच्या रस्त्याला एकमेकांवर चिखलमार करून निर्णय लावण्याचा बूट, वृत्तपत्रांनीं 'आपल्या हक्कावर गदा येते' या सबबीवर हाणून पाडला होता. अखेर, चेंडूफळीचा चांचणी सामना करून त्यांत जो पक्ष जिंकील तो श्रेष्ठ ठरावा अशी सूचना, प्रो. फडके व लखूअण्णा भोपटकर यांनीं एकमेकांकडे एकदम पाठवली. [व या कल्पनेचें श्रेय कोणाला याविषयीं त्यांचा पत्रव्यवहार अजून चालू आहे.]

सनातनी पक्ष चेंडूफळीसारख्या बाटग्या खेळाला तयार होणें जरा कठीणच होतें; कृष्णाजिनाचे चेंडू, खादिरयूपाच्या तिकाट्या (विकेटस्) व दर्भाच्या बांधलेल्या फळ्या [बॅटस्] या आयुधांसह धाबळ्या नेसून, व डोक्यावर एरंडाचीं पानें आंथरून खेळल्यास व खेळतांना पाण्याऐवजीं पंचगव्य प्याल्यास धर्माला बाध येणार नाहीं असें शासन (रूलिंग) काशीच्या धर्मशास्त्रवेत्त्यांकडून आलें होतें; पण इतक्यांत निवड-समितींतल्या दोनचार भिक्षुकांनीं सांगितलें, कीं 'शास्त्राद् रूढिर्बलीयसी—तेव्हां या क्रीडणाची जेआहेत्ते जी रूढ संस्था आहे तिला अनुसरून व शास्त्रें तात्पुरतीं लाल अलवणांतून गुंडाळून ठेवून मैदानांत उतरावें.' तदन्वयें दरोबस्त सनातनी

फलाणीचीं कुडतीं व तुमानी पेहरून व पांढरे बूट व टोप्या धारण करून खेळण्यास आले होते. उलट, नवमतवादी कोणतीही रूढी मानण्यास तयार नसल्यामुळें आपापल्या स्वतंत्र विचारानें पोषाख करून उभे राहिले होते.

हा संस्मरणीय ऐतिहासिक संग्राम पाहण्यास शिवाजी पार्ककडे लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटत. ( प्रेक्षकांसाठीं तिकिटें लावलीं नसल्यामुळें.) महाराष्ट्रीयांचा एवढा मोठा जमाव पूर्वी कधींच एके ठिकाणीं दिसला नसेल. प्रेक्षकांत स्त्रियांचें प्रमाण बरेंच मोठें असून त्यांपैकीं बऱ्याचजणी चेंडूफळीचा खेळ म्हणजे काय, सनातनी–नवमतवादी हे कोण वगैरे चौकशा हळूच करीत होत्या. सनातन्यांचा मंडप आंब्याच्या टाहळ्या, केळीचे खांब व शिंदीच्या झांपा यांनीं सजविलेला असून त्याच्या आंतून अनुष्ठान बसल्याचे आवाज निघत होते. मंडपांतली सर्व मंडळी कडक सोंवळयांत होती व भोंवतालीं तीर्थोदकाचा एक गटारवजा खंदक केलेला होता. नवमतवाद्यांच्या मंडपावर छप्पर नव्हतें; तो लाल, पांढऱ्या, हिरव्या वगैरे निशाणांनीं सजवलेला होता. त्याच्या बाहेर मार्क्स व फ्रॉईड यांच्या भयानक तसबिरी लावून ठेवलेल्या असल्यामुळें चौकस लहान मुलेंसुद्धां तिकडे फिरकत नव्हती. मंडपाचा एक भाग [ पोलिसाच्या भयानें ] गळ्या-इतक्या उंच कनाथीआड नग्नसंघाच्या सदस्यांसाठीं राखून ठेवला होता.

बरोबर अकरा पन्नासला आहिताग्नि व कर्वे या नाखव्यांनीं ओली–सुकी केली. आहिताग्नींचा ऐटदार पोषाख गैरमाहितीमुळें थोडा चुकला होता. तुमानीचीं बटणें पिछाडीला गेलीं होतीं. तें पाहून कर्वे स्मित करीत होते; आहिताग्नींनीं त्यांना खोंचून विचारलें, ' आम्हांला हें नवीनच आहे; पण कां हो ? आपण आपल्या पुरस्कृत पोषाखांत कसे नाहीं ? ' कर्व्यांनीं गंभीरपणें उत्तर दिलें, ' नग्न राहण्याचे फायदे आम्हीं वर्णन केले तरी आम्ही नग्न राहिलें पाहिजेच असें नाहीं. '

नवमतवाद्यांच्यातर्फे ' ओली ' ही बाजू सांगून ओली–सुकी कर्व्यांनीं जिंकली. पण आहिताग्नींचा सनातनी संशयीपणा जागृत झाल्यामुळें खापरीच्या दोन्ही बाजू ओल्या नाहींत ही खात्री करून घेतल्यावर, त्यांनी कर्व्यांना विचारलें, ' काय घेतां ? ' कर्व्यांनीं आधीं टोलेबाजी पत्करली.

अकरा पंचावन्नला लांब झगे घालून पंच—श्री. वामन मल्हार जोशी व श्री. काकासाहेब लिमये—बाहेर पडले. पहिल्यांचीं मतें कोणाशींच पटत नसल्यामुळें व दुसऱ्यांचें प्रत्येकाशीं पटत असल्यानें, ही पंचांची जोडी आदर्श होती यांत शंका नाहीं. पंचांप्रमाणेंच चित्रगुप्त( स्कोअरर्स )सुद्धां निवडक होते. श्री. गं. दे. खानोलकर हे महाराष्ट्रांतील अव्वल दर्जाचे अचूक मुद्रित—परीक्षक म्हणून त्यांची निवड या महत्त्वाच्या कामाला झाली होती, व त्यांच्या जोडीला 'प्राविण्य'कार ताम्हनकर देण्यांत आले होते.

टाळयांच्या प्रचंड कडकडाटांत सनातनी संघ कंदूकनिरोधनाला [फील्डिंगला] बाहेर पडला. तितक्यांत श्री. तात्यासाहेब केळकर घाईघाईनें आले व हें स्वागत आपलेंच म्हणून टाळयांचा त्यांनीं नमस्कारपूर्वक स्वीकार केला. वास्तविक ते खेळाडू असायचे, पण आपण सनातनी का नवमतवादी हा विचार समतोलपणें करण्याच्या भरांत त्यांचें कोणीकडून खेळायचें हें शेवटपर्यंत ठरलें नव्हतें.

सनातनी नाखवा राजवाडे यांनीं आपला व्यूह [ फील्ड ] मोठ्या कौशल्यानें रचला होता. स्वतः सुरवातीचे गोलंदाज होऊन यष्टिरक्षण त्यांनीं भालाकारांकडे सोंपविलें होतें. भालाकारांच्या शेजारीं त्यांचे बंधू, आजगांवकर, व माटे मास्तर [ अश्लील मराठ्यांच्या हाताला हात लावून ] उभे होते. बोळकंडीं[ गली ]त ज. स. करंदीकर होते, चौरस पदा-[ स्क्वेअर लेग ]वर पांगारकर व मध्य—पुरोभागीं [ मिड—ऑनला ] चौंडेबुवा उभे होते. लांबवर दोन्ही बाजूंना किजवडेकर व सातवळेकर यांना दूरदूर ठेवण्यांत आलें होतें; कारण पंडितवर्यांची दाढी वामन शास्त्री सारखे न्याहाळीत असलेले पाहून त्यांच्यांत बरेचसें अंतर ठेवणें चांगलें हा विचार आहिताग्नि यांनीं केला होता.

नवमतवाद्यांची पहिली जोडी—कर्वे व अत्रे—हंशाच्या प्रचंड हलकल्लोळांत टोलेबाजीला निघाली. तितक्यांत बाउंडरीच्या कडेला भगतगणांत बसलेले मामा वरेरकर ओरडले—' अरे, या पुणेकरांची तंगडी मोडा आणि उडवा या नवमतवाद्यांची भंबेरी!' मामांनीं आपला पक्ष केव्हां

बदलला हें माहीत नसलेले लोक त्यांच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले! तेव्हां मामा वळून सर्वांना उद्देशून म्हणाले, " अरे मी सनातनीच आहें पहिल्यापासून! संगमेश्वरीं पोस्टमास्तर असतांना मला शृंगेरीपीठाचा शंकराचार्य व्हावयाला बोलवीत होते, पण—" इतक्यांत कर्व्यांच्या पहिल्या हद्दपारी[ बौंडरी ]नें सगळयांचें लक्ष मॅचकडे गेलें. [ खरी गोष्ट अशी होती कीं, मामांना नवमतवाद्यांकडून चक्रचिठ्ठी–सर्क्युलर–गेली होती, पण ' चांचणी सामन्या'पुढें त्यांनीं ' चांचणी कीं चांचपणी?' ही कोटी लिहिल्यामुळें त्यांना ताबडतोब वगळण्यांत आलें होतें.]

कर्व्यांनीं खाकी अर्धतुमान, कोट, फेल्टहॅट हा आपला पोषाख कायम ठेवला होता. ते खांद्यावर फळी घेऊन उभे राहात, व चेंडू कापून त्याचें पृथक्करण करण्याच्या शास्त्रीय जिज्ञासेनें प्रेरित झाल्यासारखा त्यांचा वार तिरकस पडत असे. राजवाड्यांच्या शेवटच्या फेंकीला एक धांव काढून ते समोरच्या टोंकाला आले. दुसरी गोलंदाजी अश्लील मराठ्यांना देण्यांत आली होती, पण त्यांच्या फेंकींत हुषारीपेक्षां आवाजच जास्त असल्यामुळें कर्वे तिरस्कारानें एकेका चेंडूची वासलात लावूं लागले. ते हळूहळू इतके गाफील झाले कीं, मागचे पंच श्री. वा. म. जोशी यांच्याशीं त्यांनीं 'नीति'च्या व्याख्येवर चर्चा सुरू केली.

मराठ्यांच्या सहाव्या चेंडूपुढें त्यांचा पाय आला व ' कसा?' या सनातनी दरडावणीला घाबरून काका लिमयांनीं एकदम वर हात फेंकला. कर्वे तंबूकडे चालले.

इतक्यांत 'पायचीत!' म्हणून कोणाचा तरी चित्कार ऐकूं आला. तो ऐकून अत्र्यांनीं चिडून फळी जमिनीवर आदळली व ' पायचीत ' 'झेल' वगैरे शब्द वापरणाऱ्या माणसाला धक्के मारून हांकून दिला नाहीं तर आपण सामना उधळून लावूं वगैरे [ अनंतराव गद्रे यांच्या-जवळ शिकल्याप्रमाणें ] गर्जून ग्वाही दिली. हें ऐकून एक फाटक्या अंगाचा दाढी वाढलेला खादीधारी इसम जीव घेऊन पळाला. [ तो एका गांवठी दैनिकाचा बातमीदार होता हें नंतर कळून आलें. ] यानंतर बराच वेळ गेला तरी नवीन फळीवाला येईना, तेव्हां आहिताग्नि ओरडले,

'अहो कर्वे, पुढला गडी येऊं द्या—'

भाई देशपांडे रागावून ओरडले,

'अहो, 'गडी' हें दास्यसूचक नांव वापरूं नका, हें समतेचं युग आहे.'

करंदीकर म्हणाले,

'मग म्हणायचं काय ?'

'दुसरं कांहींहि म्हणा—'

पांगारकरांनीं नाक मुरडून खांदा उडवून विचारलें,

'खेळाडू ?'

अत्र्यांनीं विकटहास्य केलें,

'ऐका ! अहो कौतुकम् ! सनातनी—आणि खेळाडू !'

लखूअण्णा भोपटकर त्रासून म्हणाले,

'इतका वितंडवाद कशाला ? 'भिडू' म्हणा, वाटेल तें म्हणा, पण खेळायला येऊं द्या.'

'भिडू ?' म्हणून भुंवया उचलून अश्लील मराठ्यांनीं कायसें बोलण्यासाठीं तोंड उघडलें, पण आजगांवकरांना औचित्याची वेळींच जाणीव येऊन त्यांनीं मराठ्यांच्या तोंडावर हात ठेवला.

हा सगळा प्रकार चालला असतां, कर्व्यांनीं वसंतराव मराठ्यांना खेळायला जाण्यास सांगितलें होतें. वसन्तराव खेळायला निघण्याआधीं जाऊन अनंतराव गद्र्यांच्या कानाला लागले,

'कां हो, जाऊं का ?'

अनन्तराव गर्जून खेंकसले,

'विचारतां काय ? मीं सांगितलं ना एकदां ? जा, अत्रे खोळंबले आहेत—'

घाईघाईनें वसंतराव फळी सरसावून क्षेत्राकडे धांवले. त्यांना मधेंच आजगांवकरांनीं हटकलें,

'ऑं ? वसन्तराव ! तुम्ही कधीं नवमतवादी झालांत ?'

'ह्यः ह्यः ह्यः! अनंतरावांनीं सांगितलं—म्हणतों नाहीं—ह्मणकाभाकर नवमतवादी आहे ना मी ?'

तिकाटीपुढें दाखल होतांना भालाकार व वसंतराव मराठे यांनीं बराच वेळ एकमेकांकडे रोखून पाहिलें. क्षणभर प्रेक्षकांत स्तब्धता उत्पन्न झाली. या मत्तमतंगजांच्या गंडस्थळांचा आघात होऊन वीज कडाडते कीं काय, अशी भीति सर्वांच्या चेहेऱ्यावर दिसूं लागली. तेवढी संधी साधून राजवाड्यांनीं चेंडू फेकला व कांड्या पडून वसंतराव तंबूकडे रवाना झाले! चौथे खेळाडू जाड चष्म्यांतून आकाशांत कसलेसें निरीक्षण करीत येणारे वि. स. खांडेकर होते. ते पवित्रा घेतात न घेतात तों गुलाबी निशाणाखालीं बसलेले कांहीं प्रेक्षक गाऊं लागले—

'पृथ्वी चंद्र सूर्य तारे, यानें लोळविले सारे।'

त्या गडबडींत खांडेकरांनीं रक्त सूर्यबिंबासारखा तो कंदूक वायु वेगानें तारांगणांशीं क्रीडा करायला जणुं काय प्रतिनिधि म्हणूनच प्रेषित केला—पण दुर्दैवानें तो नुसता उंचच उडाला; त्याचा पल्ला माटे मास्तरांच्या आंवाक्याबाहेर गेला नाहीं. मास्तरमजकुरांच्या मिशांच्या जंजाळावर तो अधर राहिला व त्यांच्या तोंडून निघणाऱ्या बऱ्याच शिवराळ शब्दांना क्षणभर तोबरा बसल्यासारखें झालें. परंतु पंच श्री. वा. म. जोशी यांनीं खांडेकरांना 'नाबाद' [नॉटऔट] दिलें; केशाकर्षण म्हणजे झेलणें नव्हे असें त्यांचें मत पडलें. हा निर्णय ऐकून प्रेक्षकांत मोठी खळबळ उडाली. वरेरकर ओरडले, 'अरे तो 'वाम'जोशी—तो कुठला सरळ सांगायला आला आहे. त्यापेक्षां एकादा नामजोशी पत्करला!' या दरिद्री कोटीनें मळमळल्यासारखे चेहेरे करून वरेरकरांचा भगतगण उठून गेला व ते स्वतः नव्या भक्तांच्या शोधार्थ मैदानाभोंवतीं हिंडूं लागले. येथपावेतों खांडेकर इतके थकले कीं, त्यांनीं पळ्या [रनर] मागितला, व राजवाड्यांच्या परवानगीनें नवमतवाद्यांच्या राखीव नगांपैकीं श्री. प्रभाकर पाध्ये दोन लाल ग्रंथ गुडघ्यावर बांधून क्षेत्रावर हजर झाले. तेवढ्यांत आपल्याला विनोदबुद्धि किती आहे हें दाखविण्यासाठीं त्यांनीं अत्र्यांजवळ थांबून, त्यांना काल रात्रीं पाठ केलेल्या दोनतीन हास्यकथा सांगितल्याच.

खांडेकरांनीं दोनतीन चेंडू नुसते आडवले, नंतर चौंडेबुवांकडे एक हलकेच ढकलला. या वेळीं थोडा घोंटाळा झाला. धांव आहे असें समजून प्रभाकर पाध्ये धांवूं लागले, आपल्याला पळया आहे हें विसरून खांडेकरही धांवूं लागले. चेंडू जवळच आहे हें पाहून यष्टिरक्षक भालाकार तो उचलायला त्याच दिशेला धांवले; इतक्यांत लांब टांगा टाकीत आलेले अत्रे धांव मिळत नाहीं म्हणून परत पळाले; चेंडू उचलण्यास आलेले राजवाडे त्यांना बाद करण्यासाठीं त्यांच्या मागोमाग दौडूं लागले. पांच खेळाडू एकाच दिशेला धांवत असलेले पाहून लोकांत जरा गैरसमज झाला; कित्येकांना खांडेकरांची तब्येत एकदम बिघडल्याची भीति वाटली, तर चौंडेबुवांना हे आपल्यावरच हल्ला करून येत आहेत असा किंचित्काल भास झाला.

खांडेकर–अत्रे ही जोडी बराच वेळ टिकली. शेवटीं ज. स. करंदीकरांनीं गोलंदाजी घेतली व ज्योतिष–शास्त्राच्या अचूक गोलानें खांडेकरांच्या तारका क्षणार्धांत उधळून लावल्या. [१७–३–६] खांडेकर बाद झाले तरी पाध्ये तेथून हालण्याचें चिन्ह दिसेना; त्यांनीं अत्र्यांना ‘ पळया पाहिजे का ? ’ म्हणून विचारलें. अत्रे म्हणाले, ‘ मला सामाईक पळया नको. ’ तेव्हां पाध्ये नाइलाजानें परतले.

नवीन फळीधर भाई देशपांडे एका हातांत फळी व दुसऱ्या हातावर पादकवच [ पॅड ] बांधून फरीगदग्याच्या पवित्र्यांत उभे राहिले. त्यांनीं बरेच पट्टे फिरविले. अखेर नियमांच्या किंवा बंधनाच्या पलिकडे त्यांनीं कांहींसा प्रमाद केल्यामुळें, त्यांना परत जावें लागलें. यानंतर प्रो. फडके विजारीच्या खिशांत डावा हात घालून उजव्या हातानें फळी फिरवीत फिरवीत रुबाबानें तंबूच्या बाहेर पडले. तिकाटीपाशीं जातांच जवळच्या लखुअण्णांनीं त्यांना स्वतःच्या तुमानींतले रुपये खुळखुळवून सलामी दिली. फडके व अत्रे या जोडीनें सुमारें पन्नास धांवांची भर घातल्यावर एक गुलाबी निशाणवाला मध्येंच ‘ क्लेटन हॅमिल्टन ’ म्हणून ओरडला व फडके थोडे बेसावध झाल्यामुळें त्यांनीं हलगर्जीपणें मारलेला चेंडू लखूअण्णांनीं झेलला. [ १०४–५–२१ ]

यानंतर लौकरच अत्र्यांची दांडी उडाली, तीही ते बेसावध असतांनाच; कारण सहाधांवी [ सिक्सर ] मारण्याच्या तयारींत ते आठदहा पावलें पुढें गेले असतां, प्रेक्षकांतून अनंतराव ओरडले, 'अहो अत्रे, तसेच उभे रहा, फोटो काढताहेत तुमचा; विड्यांच्या लेबलावर तो छापून खेडोपाडीं तुमची प्रसिद्धी करण्याची व्यवस्था केली आहे मीं; तुमच्या पवित्र स्मृतीचा दिव्य संदेश पोहोंचविण्यासाठीं–[ इतक्यांत आपण अच्युतरावांबद्दल बोलत नाहींं ही त्यांना आठवण झाली ] हा विडीवाला आला आहे कॅमेरा घेऊन–' तितक्यांत दुसऱ्या बाजूनें वरेरकर ओरडले, 'कोण हा कृतघ्न चांडाळ विडीवाला ? खास पुणेकर आहे हा ! जन्मभर पांच बोटांच्या फुंकणींतून तळहाताच्या फोडासारखी फुंकर घालून मीं नुसती विडी ओढली, पण या नीचानं लेबलावरसुद्धां अनुल्लेखानं मला मारलं !' अत्र्यांचें लक्ष इकडे असतां सीमोल्लंघनाबद्दल भालाकरांनीं त्यांच्या खिल्ल्या उडवल्या [ स्टंप्ड. ] या सर्व प्रकारानें संतापलेले अत्रे बॅट उगारून सनातनी टाळ्यांच्या गजरांत झुणका-भाकर–संघाच्या अंगावर धांवले; तेव्हां अनंतरावांनीं गर्जून त्यांची माफी मागितली.

फडक्यांच्या जागीं काणेकर व अत्र्यांच्या जागीं डॉ. केतकर आले. प्रेमांत पडण्याच्या बाबतींतदेखील मोजून व मापून वागावें असा पुरस्कार करणारे काणेकर खेळांतहि तितकाच हिशेबीपणा दाखवतील अशी सर्वांची अपेक्षा होतीच; त्याप्रमाणें एकेक धांव झाल्यावर चित्रगुप्ताच्या तंबूकडे वळून ओरडून 'एक' 'दोन' अशी पुकार त्यांनीं सुरू केली; त्यांच्या वतीनें प्रभाकर पाध्ये यांनीं हिशेबतपासनिसाचेंहि काम चालविलें; पण प्रेम किंवा खेळ सर्वस्वीं विज्ञानशास्त्राच्या नियमाप्रमाणेंच होत नसल्यामुळें तिसऱ्या चेंडूलाच कांहीं चमत्कारिक वळण येऊन काणेकरांचा त्रिफळा उडाला व ते पहातच राहिले. (या वेळीं 'त्रिफळा !' म्हणून विजयोन्मादानें भालाकार ओरडले, व 'अश्लील !' म्हणून कृष्णराव मराठ्यांनीं तुरट तोंडानें शेरा मारला.) आतां डॉ. केतकरांच्या जोडीला ना. जाधवराव आले. त्या जोडीनें नुसत्या गगनचुंबी टोलेबाजीला सुरवात केली. एकदां 'राम अनार्य होता !' असें कांहीं पुकारून जाधवरावांनीं

एक तडाखा द्यावा, तर थोड्या वेळानें 'महाराष्ट्र' म्हणजे 'महारांचा देश!' म्हणून केतकरांनीं दणका लगवावा. या जोडीनें आंकडा बराच फुगवला असता, पण मधेंच एक टोला मारल्यावर डॉ. केतकरांनीं आपल्या खिशांतले चणे काढून भालाकारांसह ते खाण्यास सुरवात केली; धांव घेण्यास आलेले जाधवराव अर्ध्या वाटेंतच थबकले, तिकडे गोलंदाजानें त्यांची दांडी उडविली, तें पाहून फळी खाकेंत मारून डॉक्टर मजकूर तिकडे धांवले, तेव्हां चेंडू भालाकारकडे फेंकण्यांत आला व [ खाल्लेल्या चण्यांना न जागतां ] त्यांनीं आपल्याहि बाजूच्या तिकाट्या उधळून दिल्या. निःपक्षपाती वामनराव जोशी व काका लिमये यांनीं अर्थातच दोघांहि गड्यांना बाद ठरवलें. जाधवराव चिडले; 'अखेर तुम्ही भटजीच!' ते केतकरांना म्हणाले. केतकरांनीं त्या विधानावर थोडा विचार करून कांहीं शास्त्रीय उत्तर दिलें; व ब्राह्मणजातीच्या आनुवंशिक ऱ्हासावर मानवशास्त्रदृष्ट्या चर्चा करीत ही जोडी तंबूकडे परतली.

शेवटची जोडी राव सावरकर व महादेवशास्त्री दिवेकर सावकाश बाहेर पडली. खास याच जोडीला उत्तेजन देण्यास आलेला एक किडकिडीत चष्मेवाला कंपू 'हिम्मत! तडफ! उत्कर्ष!' अशा क्षीण आरोळ्या देऊं लागला. उलट त्यांना चिडविण्यासाठींच कांहीं सनातनीच 'अल्लाहु अक्बर!' म्हणून ओरडूं लागले! पण हे दोघेही फळीधर खंबीर होते. लेखणीच्या फटकाऱ्याइतकेच जालीम त्यांच्या फळ्यांचे फटके बसूं लागले. ह. भ. प. पांगारकर, म. भा. भू. आजगांवकर, वे. शा. सं. किजवडेकर या सर्वांची गोलंदाजी त्यांनीं दशदिशा उडवून दिली. अखेर भालाकारांनीं यष्टिरक्षण सोडून चेंडू हातीं घेतला, व 'बुंदी! मोतीचूर! राघवदास!' अशा डुरकण्या फोडीत एकेक गोळा टाकण्यास सुरवात केली. मधून मधून ते स्वतः तयार केलेले शब्दहि सोडूं लागले. त्याच वेळीं पांगारकरबुवांना आपलें इंग्रजीचें ज्ञान प्रकट करण्याची हुक्की आली, अश्लील मराठे ऋतुसंहारांतले श्लोक म्हणूं लागले, व माटेमास्तरांनीं चारसहा फारसी शब्दांची कारिका उच्चारली. पण या सगळ्या सरबत्तीनें गारद न होतां धीमेपणानें सावरकर–दिवेकरांनीं आंकडा

पावणेदोनशेंवर नेला व अखेर 'इत्यलम्' म्हणून निवृत्त होऊन ते तंबूत परत गेले [१७८–१०–५४]. त्यांना खांद्यावर बसवून नेण्यासाठीं बोडक्या, चष्मेवाल्या, पैजामेधारी, खप्पड, काडीजवान नवमतवाद्यांची एक टोळी आली होती, पण वेळींच आपली कुवत ओळखून नुसत्या टाळ्या व जयजयकार इतक्यावरच या मंडळींनीं आपली उत्साहाची तलफ भागवली. या वेळेलाच उभय पक्षांनीं आपापल्या शिबिरांत उपाहार उरकून घेतला. खेळाडूंच्या सुमारें दसपट लोक त्यांचे अनुयायी म्हणून या समारंभास हजर राहिले हें सांगणें नकोच.

उपाहाराच्या तासांत देखील प्रेक्षकांचें मनोरंजन होण्यासारखे कित्येक प्रकार घडले. सनातनी व नवमतवादी या दोघांनाहि शिव्या देणारा तिसरा एक प्रबल वर्ग उत्पन्न होऊं पहात होता. गुलाबी निशाणाखालचे लोक, डॉ. आंबेडकर, प्रबोधनकार ठाकरे, व (आंत दोन्ही मांडवांत उपाहाराला बोलावणें येत नाहीं ही खात्री झाल्यावर) वरेरकर, ही मंडळी या पक्षांत दिसत होती. त्याचप्रमाणें टीममध्यें चान्स न मिळालेले बरेचसे असंतुष्ट लोकहि येथें सामील झाले होते. आंत टिफिन चालू असतां या पक्षानेंहि गंडेऱ्या, चणे, सामोसे, पाणी–पुरी, चिकी, चिवडा, उकडलेलीं अंडीं, भजीं, सरबत, थंड पाणी, फसफसणारीं पेयें, इत्यादि किरकोळ सामानाचा समाचार चालू ठेवला होता. पण या तहाच्या तासांतसुद्धां प्रत्यक्ष युद्ध्यमान पक्षांत जी चुरस लागली होती, ती खेळापेक्षांहि मनोरंजक होती. 'पार्वतीपते हरहर' 'सीताकान्तस्मरण जयजयराम!' 'पुंडलीक वरदे हरी विठ्ठल' इत्यादि सनातनी जयघोषाला बिनछपरी तंबूतून 'इन्किलाब झिंदाबाद!' 'चला घालूं नंगा नाच' 'हिंदू धर्म की जय' (!) हीं वचनें व 'दि इन्टर नॅशनल' 'शो मी द वे टु गो होम' 'शी इज फॅट ॲन्ड फेअर ॲन्ड फॉर्टी' इत्यादि गीतें, यांनीं प्रत्युत्तरें मिळत होतीं. [ अर्थात् हे आवाज काढणारे लोक प्रत्यक्ष लढवय्ये नसून नुसते अनुयायीच होते. ] सनातनी डेंकरा आणि नवमतवादी सोडाफोडीचे आवाज यांनीं रणांगण दुमदुमून गेलें होतें. अखेर तास संपत आल्यावर अनंतराव गद्रे भाषण करायला उठणार अशीं

चिन्हें पाहून र. धों. कर्व्यांनीं आपले वीर तंबूबाहेर काढले. अंपायर्स आपले पांढरे झगे घालून [ व दोन्ही मांडवांतला समाचार घेतल्यामुळें जरा कष्टानें चालत ] विकेटकडे चालले. सनातन्यांची पहिली जोडी बाहेर पडायला मात्र बराच वेळ लागला. कारण संवय नसलेल्या पाटलोणीच्या आतां गुंड्या लागत नसल्यामुळें बहुतेकांनीं पाटलोणींवर कमरेभोंवतीं काचा मारून उपरणींच बांधलीं होतीं. टॉस जिंकून आधीं बॅटिंग घेण्यांत, व आपली इनिंग्ज झाल्यानंतर उपाहार ठेवण्यांत नवमतवादी कप्तान कर्वे यांनीं फारच दूरदर्शीपणा दाखविला होता. सनातनी कप्तान राजवाड्यांनीं शत्रूचा हा डाव फार उशीरां म्हणजे जेवणें झाल्यावर ओळखला. तरी पण त्यांतल्या त्यांत सडपातळ म्हणून ज. स. करंदीकर व आजगांवकर ही जोडी सनातनी इनिंग्ज सुरू करण्यास त्यांनीं पाठविली.

हे खेळाडू कल्पनेबाहेर चिकट [ स्टेडी ] निघाले. एक तास खेळून त्यांनीं फळ्यावरचा आंकडा शून्याच्यावर चढविला नाहीं. पण इतक्या अवकाशांत बोलर या दृष्टीनें त्यांनीं खांडेकर, सावरकर, केतकर व वसंत-राव मराठे यांना मात्र निकामी करून टाकलें. अखेर कर्व्यांनीं समाज-स्वास्थ्याच्या खाजगी पत्रव्यवहाराच्या एका पानांत गुंडाळून एक चेंडू इतका 'गरम' फेकला कीं, आजगांवकर तर सफा झालेच, पण करंदीकर-देखील स्वेच्छेनें व राजीखुषीनें 'रिटायर' होऊन तंबूत परत गेले. [०–२-०] आणीबाणीचा प्रसंग ओळखून माटे व कृष्णराव मराठे ही दुसरी जोडी पाठविण्यांत आली. यांनीं मात्र पिचवर पाय टाकतांच बौंड्ऱ्या मारण्यास सुरवात केली. माटे मास्तरांनीं आपले वसंत व्याख्यान मालेच्या सनातनी सभेंत गिरवलेले टोले काढले; तर अश्लील मराठ्यांनीं गीतगोविंद, शृंगारशतक, अनंगरंग वगैरेंतील उत्तान प्रहार वापरले. अत्रे व दिवे-करशास्त्री यांचें आडदांड बोलिंगसुद्धां त्यांनीं पार धुळीला मिळविलें. लौकरच शंभराचा आंकडा बोर्डवर झळकला. पुन्हां रघुनाथपंत कर्व्यांनीं बोलिंग घेतलें व आपल्या फ्रेंच भाषेतील ज्ञानाच्या भांडारांतून अशी कांहीं एक भयंकर फेंक काढली, कीं माटे मास्तरांची बॅट लुली पडून त्यांनीं आपला कॅच जाधवरावांच्या हातांत अलगद ठेवला. कृष्णराव मराठे किंचाळले, 'अश्लील! बॉडी लैन!'

तथापि मास्तरसाहेबांनीं तंबूचा रस्ता आधींच मुकाट्यानें सुधरला होता. या वेळीं स्कोअर [ १०२–३–४९ ] असा होता. पुढचे खेळाडू पंडित सातवळेकर, वैदिक मंत्र पुटपुटत क्रीजमध्यें दाखल झाले. त्या प्रसंगीं जाधवरावांना मुद्दाम बोलिंग देण्यांत आलें. त्यांनीं ताबडतोब पंडितजींचा बळी घेतला. नंतर आलेल्या कप्तान राजवाड्यांच्या वेदोक्त बॅटिंगची फळीहि जाधवरावांनीं आपल्या पाखंडी बोलिंगनें फोडली. पुन्हां वेळ बिकट आहे हें ओळखून पांगारकर इंग्लिश बोलत आवेशानें पिचवर आले. त्यांनीं बोलरला चकविण्याची सोपी युक्ति काढली. बोलरनें स्टार्ट घेतला कीं, मुमुक्षुवर्य खांदा उडवून नाक मुरडीत; त्यामुळें बोलरची एकाग्रता न होतां त्याचा चेंडू निरुपद्रवी होई व पांगारकर एखाद्या सनातनी कोटीसह तो स्त्रियांच्या तंबूकडे मारीत. या वेळीं काणेकरांच्या बोलिंगची जरूरी कर्त्यांना वाटली. काणेकरांची ‘स्टाइल’ त्यांच्या लघुनिबंधाइतकीच आळसट असल्यामुळें पांगारकर गडबडले. काणेकर पडल्यापडल्या, पलीकडच्या विकेटपर्यंत पोहोंचेल कीं नाहीं ही पर्वा न करतां चेंडू फेंकून खांडेकरांशीं गप्पा मारूं लागायचे, पांगारकर मोठ्या आवेशानें तो चेंडू मारायला जायचे, पण बॅट आधींच निघून गेल्यामुळें टोला फुकट जायचा. मधेंच गर्दीतून कोणी ओरडला, ‘ अहो, मुद्द्याला धरून खेळा–बॅट व बॉल यांची भेट होऊं द्या ! ’ तेव्हां पांगारकर तिकडे वळून म्हणाले, ‘त्याची नको तुम्हांला काळजी–मी कांहीं असा तसा नाहीं–आय ॲम नॉट ए धिसधॅट बॅटर ! ’ एवढ्यांत काणेकरांचा एक चेंडू चुकून सरळ पडला, व दांडीच्या आधारास मुकलेले पांगारकर आपण नाशकाला नसल्याची खेदजनक जाणीव ठेवून घट्ट मिटलेल्या तोंडानें तंबूंत परतले.

यानंतर बराच वेळ गेला. सनातनी तंबूंत कांहीं गडबड झाली व अखेर एका गाईला पुढें करून चौंडेबुवा ‘ पिचवर ’ आले. गाय घेऊन येण्याविरुद्ध नियम कोठेंहि न सांपडल्यामुळें अंपायर्सचा नाइलाज झाला. चौंडेबुवांचा मार्ग अगदीं सोपा होता. त्यांनीं गाईला आपल्या विकेटपुढें उभी केली व नवमतवादाचे सनातनीपक्षावरील सर्व हल्ले परतविण्यास तिचा त्यांनीं ढालीसारखा उपयोग केला.

बाजूनें येणारे चेंडू तेवढे ते मारीत असत. पळण्याच्या वेळीं थोडा त्रास होई तेवढाच. गाय पाळीव असल्यामुळें पिचवरची हरळी ती समाधानी मुद्रेनें खात होती. मधेंच कर्व्यांनीं गाईला दोनदां रन–आउट करून अपील केलें, पण अंपायर्सनीं तें मान्य केलें नाहीं.

होतां होतां स्कोअर दीडशेंच्या जवळ जवळ गेला. एकदां गाईनें चेंडूच खाल्ल्यामुळें पळून दम लागेपर्यंत चौंडेबुवा–मराठ्यांनीं नऊ धांवा काढल्या व 'लॉस्ट बॉल' म्हणून सहा रन्स सनातन्यांकडे जमा झाल्या त्या वेगळ्याच. दुःखांत सुख म्हणजे नव्या चेंडूनें अश्लील मराठ्यांचा कॅच उडून तो देशपांड्यांनीं झेलला; व भालाकार भोपटकर हे मराठ्यांच्या जागीं आले. पण चौंडेबुवांना कळून चुकलें होतें कीं, जय आपल्या आतां हातांत आहे. त्यांनीं दर सहाव्या बॉलला रन काढण्यास सुरवात केली. स्कोअर एकशेंपासष्ट झाला. नवमतवाद्यांची हार होणारसें दिसूं लागलें. गाईची विकेट पडण्यावर सगळ्या वादाची मदार होती.

अशांत अत्र्यांना एक कल्पना सुचली. त्यांनीं कप्तानांना विनंती केली कीं, वसंतराव मराठ्यांना बोलिंग द्यावें. वसंतरावांनीं बोलिंग घेतल्यावर गाईचें लक्ष सहज समोर गेलें. समोरच्या विकेटजवळ 'रनर' भालाकार व वसंतराव यांना शेजारीं शेजारीं पाहून ती जरा चुळबुळ करूं लागली. इतक्यांत प्रेक्षकांतून वरेरकरांचा आवाज आला. 'अरे, सनातनी गाईचे पुत्र असले तर नवमतवादी गाईचे बाप आहेत बाप!' गाईनें कान टवकारले. त्याच वेळीं कर्मधर्मसंयोगानें, सनातन्यांच्या उत्तेजनार्थ आलेल्या गोरक्षणमेळ्यांतून पेटी खुळखुळावून एक आवाज आला—

'नंदसुतानें वासुदेवानें गोपीकँ रमणे ऽऽऽ......'

हें मात्र त्या गाईला असह्य झालें. एकाएकीं शेंपूट उभारून ती चौखुर उधळली व तिनें सरळ वांद्र्याचा रस्ता धरला. (ती अजून बेपत्ताच आहे, पण एका स्थानिक अविंध पुढाऱ्याचे चेहऱ्यावर मात्र हुबेहूब तिचीच भावमुद्रा–Expression–तेव्हांपासून दिसत आहे.)

झालें, क्षणार्धांत चौंडेबुवा 'आउट' झाले व त्यांच्या जागीं किजवडेकरशास्त्री आले. ते खूप अवसान आणून आले होते. पण

आयत्या वेळीं प्रेक्षकांपैकीं झुणका–भाकर संघाच्या सदस्यांतून 'बॅऽऽऽ' असे आवाज सारखे निघायला लागल्यामुळें शास्त्रीबुवांचें चित्त द्विधा होऊन त्यांनीं काकबली दिल्यासारखा सोपा कॅच काणेकरांच्या हातांत दिला ( व आश्चर्याची गोष्ट कीं काणेकरांनीं तो झेलण्याइतका उत्साह दाखविला. )

भालाकारांच्या जोडीला आतां त्यांचे बंधू आले. त्यांनीं भेदनीतीला सुरवात केली. कव्यांना ते म्हणाले, 'अहो, पक्ष कसले घेतां ? तुम्ही सगळे माझेच पक्षकार व्हा, तुमचे काणेकर जितके नवमतवादी तितकाच मी सनातनी !' पण हें बोलत बोलत देखील त्यांनीं तीनचार रन्स काढल्याच !

आतां फक्त आठ रन्स जिकायला हव्या होत्या. एक 'स्निक' लावून भालाकारांनीं धांपा टाकीत टाकीत एक रन घेतली. भावाच्या जवळून जातांना ते म्हणाले, 'अण्णा, आटप लौकर, मला भूक लागली आहे—'

या उत्तेजनानें लखूअण्णांनीं जवाहिरलाल नेहरूंशीं स्वतःची तुलना करण्यांत एक ओव्हर बौंडरी मारली.

दोन्ही पक्षांचा स्कोअर आतां सारखा झाला होता. जिंकायला आतां एकच रन पाहिजे होती. लखूअण्णांनीं महाराष्ट्र मंडळाचें नांव घेऊन एक गरगरीत बॅट फिरवली–व तो चेंडू इतका उंच गेला कीं अत्र्यांनीं तो झेलीपर्यंत एक रन पुरी होऊन बंधुद्वय दुसरी काढूं लागले होतें...... दोन्ही पक्षांची बरोबरी झाली. 'जितं मया' म्हणून उभयपक्षीय घरोघर गेले.

अंम्पायर्स श्री. वामन मल्हार जोशी व श्री. काकासाहेब लिमये हे दोघे मात्र त्या मैदानावर 'दोहोंपैकीं पहिली पुरी रन मोजून सनातन्यांची सरशी सिद्ध होते कीं नाहीं' हा निर्णय लावण्यासाठीं अद्यापि उभे राहून चर्चा करीत आहेत. त्या वाटेनें मध्यरात्रीं जाणाऱ्या वाटसराला केव्हांही त्यांचे आवाज ऐकूं येतील.

———

# सिद्ध कवच

चिन्तोपन्त जरा बावचळलेल्या स्थितींतच जागे झाले. ‘मी कोठें आहे’ हा ललितवाङ्मयांतील रूढ प्रश्न मात्र त्यांनीं स्वतःला मुळींच केला नाहीं. आजूबाजूच्या अंथरुणावरील चिरगुटांचा कुबट वास त्यांच्या घ्राणेंद्रियाची खात्री करीत होता. धुरकटलेली तक्तपोशी, तिथें टांगलेलीं धुळीनें डवरलेलीं बोचकीं, बाटल्या, डब्यांनीं फुललेल्या भिंतीच्या फळ्या, भिंतीशीं रचलेल्या सामानाच्या ढिगांतून कुठें कुठें दिसणाऱ्या खिळ्या-खुंट्यांनीं मोहरलेल्या भिंती, इत्यादि जडवस्तु त्यांच्या डोळ्यांना आश्वासन देत होत्या. एका बाजूच्या बिऱ्हाडांतील केंकाटणारीं कारटीं, दुसऱ्या बिऱ्हाडांतून धोतर वाळत घालतांना ‘फटक फटक’ या आवाजांच्या तालावर विष्णुसहस्रनाम म्हणणारे सदूभाऊ सहस्रबुद्धे, व आजूबाजूच्या सर्व दिशांनीं येणारे धुण्याभांड्यांचे आपटबार हे आवाज त्यांच्या कानांत सांगत होते—

कीं, ‘हें आपलेंच घर आहे.’ तरी पण त्यांना आज सकाळीं कांहीं तरी वेगळें वाटत होतें खास. असें कां होत आहे असा विचार करतां करतां पहिल्यानें त्यांच्या ध्यानांत आलें कीं आज घरांतल्या शान्ततेमुळें आपल्याला चुकल्याचुकल्यासारखें होत आहे. रोज, ‘अहोऽ उठा कीं आतां!’ या काशीबाईच्या कर्कश खेंकसण्यानें ते खडबडून जागे व्हायचे. झोंप पुरी झाली नाहीं ही त्यांची ठराविक कुरकुर चहाचा पहिला घोंट घशाखालीं उतरेपर्यंत चालायची व नंतर रोजची घाण्यावरची फेरी सुरू व्हायची.

पण आजचा दिवस निराळाच उगवला होता; कांहीं वेळ चिन्तोपन्त बायकोच्या कलकलाटाची वाट पहात तसेच पडून राहिले, पण शेवटीं तीही आशा सोडून ते उठले. आज अगदीं पुरी झोंप झाल्यासारखें त्यांना

वाटत होतें. हवेंत नेहमीं वाटणारी बारीक थंडी किंवा किंचित् उकाडा त्यांना आज मुळींच वाटला नाहीं. वसन्त ऋतूच्या आगमनाची सूचना देणाऱ्या वाऱ्याच्या झुळकी मात्र मध्येंच त्यांच्या शेंडीशीं खेळून जात होत्या. बाहेर कोठेंतरी स्वच्छ ऊन पडल्यामुळें घरांतही थोडें स्पष्ट दिसूं लागलें होतें; इतकेंच नव्हे तर कांहीं तरी गूढ प्रकारानें, कुठूनतरी एक एक उन्हाचा कवडसा खोलींत शिरून त्यांच्या बायकोनें पुरातनकालीं भरून फ्रेम केलेल्या 'पोपटा'वर तळपत होता. ते चूळ भरायला कुडापलीकडच्या स्वयंपाकघरांत गेले, तों त्यांना त्या दिवशींच्या फुलांच्या पुड्यांत चुकून आलेल्या एका फुलाचा मधुर वास आला, आणि अखेर तर–आश्चर्यांत आश्चर्य–चुलीवरून चहाचें भांडें उतरीत असलेल्या काशीबाईंनीं त्यांच्याकडे पाहून हळूंच स्मित केलें !

या अनपेक्षित प्रकारानें तोल जाऊन मोरींत पडतां पडतां खुंटीला पकडून चिन्तोपन्त कसेबसे सावरून उभे राहिले. त्यांचा आपल्या डोळयांवर विश्वास बसेना. आपल्याला मृगजळासारख्या नेहमीं पडणाऱ्या सुखस्वप्नाचा हा एक प्रकार असावा असें त्यांना वाटलें, व आपण थोडें खुलतों न खुलतों तोंच एखाद्या शाळेची घंटा कानांत आणून बडविल्यासारखा आपल्या पत्नीचा पहाडी आवाज आपल्या कानांवर पडून आपण जागे होऊं अशी धास्ती त्यांना एकसारखी वाटूं लागली. ते आऽ करून काशीबाईकडे सारखे पाहत होते; भिंतीला टेंकलेल्या दंडाला कांहीं खड्यासारखें बोंचत असल्याचा त्यांना अर्धवट भास होत होता, पण त्यांचें सगळें लक्ष पत्नीकडे होतें.

"इश्शऽऽ" मानेला एक 'नाजुक हिसडा' देऊन काशीबाई म्हणाल्या, "सारखें पाहून किती लाजवायचं मेलं माणसाला! जशी कांहीं मी कधीं नवं लुगडं नेसलेंच नव्हतें–"

एका गोष्टीचा उलगडा झाला! नव्या लुगड्याच्या आनंदामुळें ही तात्पुरती माफी होती. पण अजूनही बाकीच्या गोष्टींत इतकी प्रसन्नता कां बरें वाटते आहे––आणि हें दंडाला काय बोंचतें आहे मघांपासून... चिन्तोपंतांनीं दंडाला चांचपून पाहिलें.

एका निमिषार्धांत त्यांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला–' अरेच्या, हो, तें सिद्ध–कवच ! आणि आज मंगळवार, तशांत मार्च महिना ( मार्च हा मंगळ, म्हणजे मार्स या अर्थी, असें त्यांना कोणीसें सांगितलें होतें ) पुन्हां आपल्या राशीला आतां मंगळ चांगला आहे असें वर्तमानपत्रांत कळवणाऱ्या डाहपणकरानेंही लिहिलें होतें. परवांच हपीसांतही तो होराभाई कुंडली पाहून बोलला होता कीं ' मंगल हिम्मततीनी घेरमां छे अने पछी बरकतनी ठेकाणामा जवानो छे.' शिवाय आपले जोशीबुवा म्हणालेच होते कीं, हिंगाष्टक कां कायसा योग होऊन भाग्याधिपतीची मित्र-स्थानावर दृष्टी जाणार आहे म्हणून. आणि तो केरळज्योतिष पाहाणारा सत्यनारायण दुणुवल्ली–तो मद्रासी तर नुकताच म्हणाला नव्हता कां कीं ' ळकीएष्ट ष्टार्स मिष्टर—नो वरी, मच्च मणी—फ्राम णौ आन–' सगळं कसं जमून आलं होतं अगदीं, जिकडे तिकडे मंगळ! या मोक्याला आपलं नांव मंगळभाई–निदान मंगेश, व बायकोचं नांव मंगला असतं व आपण मंगलनिवास कां अशाच कसल्याशा नांवाच्या नाटकाला गेलों असतों–किंवा त्या नांवाचं आपलं घरच असतं, निदान पत्नीची मंगळागार तरी आज असती तर...' इत्यादि कल्पनांत चिन्तोपन्त अगदीं रमून गेले होते. हे विचार चालू असतांच चूळबीळ भरून टाकून यन्त्राप्रमाणें चहा पितां पितां ते अधिक अधिक खूष होत चालले होते. दरम्यान वेळींच नव्या लुगड्याची ( आंतल्या बाईसह ) तारीफ करण्याची सावधगिरी त्यांनीं दाखवून ठेवली होती; त्यामुळ काशीबाईनाही नवऱ्याची खुषी पाहून धन्य वाटत होतें.

' प्रिये पाहा रा ऽ ऽ त्रीचा...' इत्यादि बासनांत गुंडाळून ठेवलेल्यापैकीं एक ओळ गुणगुणत चिन्तोपंत बाहेर ( म्हणजे कुडाच्या अलिकडे ) आपल्या बैठकींत आले. ' प्रिये पाहा रात्रीचा समय सरुनि येत उषःकाल हा ' ही सबंध ओळ त्यांना पाठ येत होती. ह्या ओळीला कोणतेंही वृत्त लागत नसे व ही वाटेल तशी म्हणून पंत आपली संगीताची तल्लफ भागवून घेत असत. पुष्कळदां तर आसपास कोणी असतांना ही ओळची ओळ गद्यांत म्हणून श्रोत्याला ते बुचकळ्यांत पाडीत असत. यावेळीं मात्र त्यांच्या संगीताला ' आंतून ' हुंकार मिळाला.

" बारावं कां वरीस लागलंय अमदीं इतकं हुरळून जायला ? मी बाई अशानं बाहेरसुद्धां यायची नाहीं ! " कुडाआड्न काशीबाई लाडिक आवाजांत म्हणाल्या. आज कसल्यातरी कारणानें 'पोरटीं' सकाळींच शाळेंत गेलीं असल्यामुळें वरील प्रणयाला थोडा अवसर मिळाला होता. पण पन्त खूष होते वेगळ्याच कारणासाठीं; आणि आपण बायकोवर खूष आहोंत असें भासवून आपल्या आनंदाचा उपभोग, तिचा एरवींचा जळफळाट टाळून घेण्यांत तर त्यांनीं मुत्सद्देगिरीची कमालच केली होती! हळूंच आरशांत डोकावून त्यांनीं आपल्या पडत्या मिशांना खालून वर असा एक फटकारा दिला व पुन्हां दंडाला बांधलेल्या कवचावरून हात फिरवला.

त्या कवचामागें (किंवा त्या कवचांत) बराच इतिहास होता. मागें केव्हांतरी रोमान्सच्या सर्व कल्पनांना रीतसर लग्नाची काडी त्यांनीं लावली. त्याच आगीवर धडाडीच्या विचारांचीही होळी करून त्यांनीं कारकुनी पेशाची विडी पेटविली होती. कारकुनी, दारिद्य, दुबळेपणा व लग्न यांपैकीं कोणत्याही एका गोष्टीपुढें मनुष्य टिकाव धरील, पण ' किमु यत्र चतुष्टयम् ? ' व्हाइसरॉय कपच्या शर्यतींत धांवण्याची महत्त्वाकांक्षा धरणारा घोडा व्हिक्टोरियाला जुंपावा तसें चिंतोपंतांचें झालें होतें. ऊन-पावसांतून गाडी ओढण्याची कारकुनी, चौफेर दौडत जाण्याची इच्छा देखील होऊं नये असा दुबळेपणा, बेलासिस रोडच्या एकाद्या दरिद्री तबेल्यांत इतर शेंकडों घोड्यांबरोबर राहिल्याप्रमाणें बोलभाटांतल्या छत्र्याच्या चाळींत वास्तव्य, आणि गाडीवाल्याच्या चाबकाप्रमाणें बायकोच्या शब्दांचे फटके, अशा जीवनक्रमानें चिंतोपंत 'घोडा' देखील राहिले नव्हते. ते अगदीं 'घोडमं' झाले होते ! पण व्हिक्टोरियाचं घोडं देखील स्टॅंडवर उभ्या उभ्या झोंप घेत असतां स्वप्नसुखांत विहार करीत असतें...वरली व महालक्ष्मीच्या दरम्यान कोठेंतरी बांधलेल्या एका स्वच्छ तबेल्यांत आपण राहतों आहोंत, आपली हजामत, खरारा, मालीस वगैरे नीट होतें आहे, आपल्या ढोपरांना ऐटदार बांडिसें किंवा चामड्याचे गेटर्स बांधलेले आहेत, आपलें शेपुट सुशोभित रीतीनें कापलेलें आहे, समुद्रावरच्या

खारट थंड वाऱ्याबरोबरच भोंवतालच्या हिरव्या 'ल्यूसर्न' घांसाचा मधुर सुगंध दरवळला आहे, हरभरे वगैरे निवडक पक्वान्नें पुढें आहेत, आजूबाजूला ब्रीचेस घातलेले मोतद्दार आपल्याकडे अभिमानानें पाहत उभे आहेत व कालच जिंकलेल्या शर्यतीची बातमी ऐकून कीं काय पलीकडच्या तबेल्यांतील ती काळीभोर घोडी आपल्या खेंकाळण्याला प्रत्युत्तर देत आहे! ...

बिचाऱ्या चिन्तोपंतांनाही झोंपेंतल्या व जागेपणींच्या स्वप्नांशिवाय आयुष्यांत कांहीं विरंगुळा नव्हता. कारकुनीचा लगाम तोंडांत धरून संसाराची गाडी ओढीत धोपटमार्गानें जात असतां, पहिल्या वर्षाच्या टप्प्यालाच त्यांनीं दोन पक्क्या खूणगांठी मनांत बांधल्या. एक तर, सर्व सुख पैशाच्या आधीन आहे, आणि दुसरी, पैसा दैवाधीन आहे. याच दोन्हींच्या बरोबर, आपल्या स्वतःच्या दैवांत पैसा नाहीं ही तिसरीही एक खूणगांठ त्यांनीं बांधली असती तर त्यांचा इतिहास अगदीं वेगळा झाला असता—व मग हा वृत्तांत देण्याचेंही कांहीं प्रयोजन नव्हतें! पण नुसत्या पहिल्या दोन निष्कर्षांनीं ते पक्के दैववादी (व साहजिकच बेसुमार आशावादी!) बनले होते. कुंडलीविज्ञान, हस्तसामुद्रिक, मुद्राज्योतिष, संख्याशास्त्र, हस्ताक्षरपांडित्य अशा कित्येक चोरवाटांनीं काळ्या भिंतीआडच्या भवितव्यांत काय आहे हें जाऊन पाहण्याची त्यांची खटपट चालली होती. त्यांची भोळी श्रद्धा अगदीं कौतुक करण्यासारखी होती. वरील सर्व शास्त्रांतील हौशी विद्वानांच्या हातांत आपला ललाटलेख ते मोठ्या भक्तीनें ठेवीत. सर्वांवर त्यांचा सारखाच विश्वास होता. कोणाचे अजमास चुकले (व हे हमेश चुकायचेच) तरी ते पोटांत घालून चिन्तोपन्त भावी फलावर तेवढी दृष्टि ठेवायचे. त्यांनीं निरनिराळ्या तज्ज्ञांना आपली कुंडली दाखविली, हात (व एकदोनदां तर पायही) दाखविले, चेहरे वेडेवांकडे करून दाखविले, आयुष्यांतील महत्त्वाचे आंकडे सांगितले, 'अक्षरओळख' करून दिली; फार काय प्रसंग पडल्यास एकाद्या नवीन शास्त्रास अनुसरून डोक्यावरचे केस मोजणाऱ्या ज्योतिषापुढें मान वांकविण्याची किंवा अंगावरचे तीळ मोजणाऱ्या पंडितापुढें हातपाय ताणून पसरण्याचीही त्यांची तयारी होती.

या वेगवेगळ्या शास्त्रज्ञांचीं निदानें कधींही एकमेकांशीं जुळत नसत, हें सांगायला नकोच. या बाबतींत चिंतोपंतांनीं मोठें स्थितप्रज्ञ धोरण ठेवलें होतें. कोणतींही दोन गणितें करून—फार काय तेंच गणित दुसऱ्यांदा करून सुद्धां—उत्तर बरोबर येत नाहीं; (हा अनुभव त्यांना शाळेपासून होता,) तेव्हां निरनिराळ्या विषयांचीं अनुमानें सारखीं यावीं हा वृथा हट्ट त्यांनीं कधींही धरला नाहीं. प्रत्येक पंडित वेगळें सांगे, त्यामुळें त्यांना रुचिवैचित्र्य वाटे. क्वचित् दोघांनीं सारखें सांगितलें तर त्यांची निराशाच होई, चांगल्या गोष्टीत सुद्धां ज्योतिषांचें एकमत त्यांना चालत नसे. चांगलीं भविष्यें खरीं होत नाहींत ही त्यांनीं स्वतःशीं खात्री बाळगून ठेवली होती, व वाईट होणाऱ्या गोष्टी आधीं कळण्याचें कांहीं विशेष दुःखही नव्हतें. चांगलें तरी आहे काय, म्हणून यापेक्षां वाईट होईल ? शुभ भविष्याच्या श्रवणानें आनंद व्हायचा तो निदान तें खोटें ठरेपर्यंत तरी टिकतो. उलट, वाईट भवितव्याला आपली तयारीच असते, आणि तें क्वचित् खोटें ठरलें तरी बरें वाटायलाही जागा रहाते !

पण अलिकडे चिन्तोपंतांच्या या तत्त्वज्ञानाला सारखे धक्के बसायला लागले होते—वर एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें सर्व ज्योतिर्विदांचें एका मुद्यावर ऐकमत्य होऊं लागलें होतें. उठलासुटला सांगायचा कीं तुम्हांला मंगळ अनुकूल होतो आहे. मंगळ हा उग्र ग्रह ! हें त्यांना माहीत असण्याचीं दोन कारणें होतीं. एकतर मंगळाच्या मुलांमुलींच्या लग्नांतल्या ऐकीव अडचणी, आणि दुसरें पूर्वीं केव्हां तरी पाहिलेलें उग्रमंगल नाटक; तेव्हां एखादा तामसी माणूस इतरांना दमदाटी देऊन आपले लाड करायला लागला म्हणजे लहान मुलें जशीं त्याचे लाड जरा भीतभीतच सहन करतात, तसे पन्त मंगलाकडे पाहायला लागले होते—न जाणों नकळत आपली कांहीं चूक व्हायची आणि स्वारी आपल्यावरच घसरायची ! या प्रसन्न होऊं पाहणाऱ्या रक्तवर्ण अतएव धोकेबाज ग्रहाला हळू हळू चुचकारायला त्यांनीं सुरवात केली होती. मंगळाचा कसलासा मन्त्र—

'धरणीकंप संगीतम् विद्वत्क्रान्ति हिमत्रयम्—'

—पण तो त्यांना नीटसा आठवत नसल्यामुळें त्यांनीं अर्धवटच सोडून

दिला, व ' मंगल मंगल ' असे शब्द गुलाबी कागदावर एक लाख आठ हजार वेळां लिहून पुरे केले. हें ज्योतिर्विषयक लेखन संपल्यावर मंगलाच्या आराधनेचे दुसरे मार्ग पाहतां पाहतां त्यांना तें कवच आढळण्याची विलक्षण घटना घडून आली.

पन्त रोज पायीं ऑफिसांत जात असत. एके दिवशीं जातां जातां वाटेंत त्यांना मैदानाच्या कडेला एका झाडाखालीं एक नवीन दृश्य दिसलें. एका लहानशा कनाथीखालीं नाना प्रकारच्या साली, हाडें, कातडीं, बाटल्या, डब्या, दगड, व पेंढा भरलेल्या घोरपडी, मुंगसें, इत्यादि प्राणी मांडून ठेवण्यांत आले होते. त्या प्रदर्शनावर दोन भगवीं वस्त्रें धारण करणारे, दाढीमिशायुक्त, असे सिद्ध पुरुष देखरेख करीत होते. प्रदर्शनांतील बहुतेक माल थेट हिमालयांतून एका महान् तपस्व्यानें तपासून पाठविल्याची ग्वाही देणारी एक पाटी कनाथीच्या बांबूला अडकविली होती. हें सर्व दृश्य पाहून मोहित झालेले चिन्तोपन्त छत्री मिटवून आपल्या लॉंग कोटाच्या कमरखिशांतून एक खाकी हातरुमाल काढून घाम पुशीत उभे राहिले. त्यांच्यावर लौकरच त्या दोन महापुरुषांचें लक्ष गेलें.

" हिमालयका अस्सल शिलाजित्, बाबूजी ? " एका महात्म्यानें विचारलें.

चिन्तोपन्तांनीं मानेनें नकार दर्शविला.

" नारायण तैल ? " दुसऱ्यानें खडा टाकून पाहिला, पण त्यालाही तेंच उत्तर मिळालें.

पण ते दोघेही पन्तांइतकेच आशावादी होते. त्यांनीं आळीपाळीनें सूचनांची सरबत्ती सुरू केली,

" सालम्मिस्री—सफेदमिस्री ? "

" कस्तूरी ? "

" शेरकी चरबी ? "

" भुजंगकी कांत ? "

" शालीग्राम ? "

“ रक्तचन्दन ? ”

“ पंचरसी आंगूठी ? ”

“ नवग्रहोंके ताईत ? ”

इतका वेळ नुसती टेनिसची मॅच पाहणाऱ्या माणसाप्रमाणें एकदां इकडे व एकदां तिकडे मान हालवणाऱ्या चिन्तोपन्तांनीं कान टंवकारले.

“ नवग्रहांचे ताईत ? मंगळाचा ताईत ? नाहींतर आंगठी आहे का तुमच्याजवळ ? ” त्यांनीं अस्सल मातृभाषेंत विचारलें.

या वेळपावेतों ऑफिसचीं दोन खाकी वेषधारी पोरें, रस्त्यावर बैदुल खेळणारीं तीन लहान कारटीं, एक पठाण, एक ख्रिस्ती आया, दोन पाटीवाले, तीन मवाली व दोन गांवठी साहेब त्यांच्याभोंवतीं जमा झाले होते. इतका प्रेक्षकवृंद पाहून त्या साधुपुरुषांना स्फुरण चढलें. भूगोलावरच्याच पीडा काय, पण खगोलांच्या आपत्तीवरही उतारा देण्याच्या आत्मविश्वासानें एक म्हणाला, “ मंगलका ? अरे बाबूजी, मंगलकी तो ऐसी जडीबुट्टी है हमारे पास, की तुम्हारा सब मंगल हो जायगा ! ”

“ काय आहे ती ? ”

“ अरे साहेब, वो तो तुमको बहोत भारी पडेगा ! ”

या गोसावड्यानें आपल्या आर्थिक शक्तीबद्दल अशी साशंक वृत्ति दाखविलेली पाहून पन्त इरेस पेटले.

“ क्या भारी काय म्हणून पडेगा ? तुम काय असा [illegible] कीं हमारे पास पैसे नाहींत म्हणून ? गुण बताव और पैसे घे ! ”

“ अजी हुजूर, ” दुसरा संन्यासी म्हणाला, “ आपके सामने फल हम कैसे बता सकते है ? लेनेके बाद थोडे दिनोमे मालूम हो जायगा, ”

“ तर मग उसके बाद हम पैसे देवेंगे, ” असें म्हणून विजयी मुद्रेनें पन्तांनीं वळून प्रेक्षकवृन्दाकडे पाहिलें व छत्री उघडून ते चालूं लागण्याचा आविर्भाव करूं लागले.

“ खरी बात ” एक नवीन आलेला वाणी प्रेक्षक म्हणाला.

“ अरे, जरा ठेहरो तो सही, ” पहिल्या साधूनें शिफारस केली. “ चीज तो देखो ! ” त्यानें एक हिरवी–काळी झालेली तांब्याची बारीकशी

पेटी तिच्या काळ्या गंड्यासह उंच धरली, व सर्वसामान्य जनतेस उद्देशून त्यानें आपलें भाषण सुरू केलें.

त्या भाषणाचा मतितार्थ असा कीं, ही पेटी (हा ताईत किंवा हें कवच) शंकरानें तांडवनृत्य करण्याचे वेळीं पडेल म्हणून पार्वतीच्या हातांत पहिल्यानें बांधली, पण ती गणपतीनें पळवून कालांतरानें सिद्धी नामक आवडत्या दासीस दिली. तिच्याकडून युक्तीनें काढून ती नारदानें मृत्युलोकावर आणली व श्रीकृष्ण, जनमेजय, पृथ्वीराज, प्रतापसिंह, अकबर, वॉरन हेस्टिंग्ज या परंपरेनें येऊन ती पुन्हां नेपाळांत गडप झाली. वक्त्याच्या गुरूनें तपश्चर्येच्या जोरावर ती मिळवली, व आतां मुंबईच्या नागरिकांवर केवळ उपकार करण्यासाठीं ती पांच रुपयास विकण्यास काढली आहे.

हें व्याख्यान संपेपर्यंत बहुतेक श्रोतृसमाज हळूहळू आपल्या रस्त्याला लागला होता. पण ही जडीबुटी आपल्यासाठीं काढल्यामुळें उभे राहण्याची आपली नैतिक जबाबदारी आहे असें समजून पन्त तिष्ठत राहिले होते. अखेर त्यांनीं निर्विकार मुद्रेनें विचारिलें,

" चार आणाकू देंगे ? "

त्या यतीनें अविश्वास व दूषण एकसमयावच्छेदेंकरून चेहऱ्यावर दाखवीत, ताईत परत ठेवण्याचा अभिनय केला; पंत चालूं लागले, त्यांना पुन्हां परत बोलावण्यांत आलें. थोडें बोलणें होऊन ते पुन्हां निघाले—पुन्हां परत बोलावले गेले—अखेर दीड रुपयाला सौदा पटला. त्या साधुद्वयानें ग्वाही दिली कीं, या सिद्ध—कवचांत मंगलाचें सर्व गुणधर्म सांठवले गेले आहेत. हा लढाऊ ग्रह आहे, तुम्ही सांभाळा नाहीं तर हरघडी हातघाईवर याल; या कवचानें बेसुमार आत्मविश्वास उत्पन्न होतो, जगाची पर्वा वाटत नाहीं. हिम्मत अनावर होते, लोकांवर वचक बसतो तोंडावर तेज येतें आणि सर्व गोष्टींत विजय मिळतो.

तें कवच खिशांत घालून पंत तडक हपीसांत गेले—व एकदां लेजरच्या घोटाळ्यांत त्यांनीं जें डोकें घातलें, तें इतकें कीं जवळच्या जालीम अस्त्राबद्दल ते पार सगळें विसरूनही गेले ! घरीं आल्यावर त्यांनीं तें चोरून

दंडावर बांधलें होतें. पण घरच्या कलकलाटांत त्यांना त्याचा पुन्हां लौकरच विसर पडला होता. आतां मात्र मार्चमधल्या मंगळवारच्या ऐन सकाळीं तें सिद्ध–कवच चांचपून पाहून त्यांना कालच्या सर्व गोष्टी आठवल्या व त्याचा थोडाबहुत प्रत्ययही येतोसें स्पष्ट दिसूं लागलें !

कवचावरून हात फिरवून कंटाळा आल्यावर त्यांनीं उठून आरशांत पाहिलें. आजच्या जादा उजेडांत आपले डोळे पिंगट व केंस–विशेषतः मिशा भुरक्या रंगाच्या आहेत, असा गुदगुल्या करणारा संशय त्यांना आला. गालही थोडे चोळले तर गुलाबी दिसतील आणि डोळे थोडे वटारूं तर आपल्या चेहऱ्यांत फारच सुरेख फरक होईल, असें त्यांना वाटूं लागलें. नंतर थोडें मागें जाऊन त्यांनीं आरशांत बाकीचें शरीर, जितकें दिसणें शक्य होतें तितकें पाहिलें; श्वास कोंडून धरून छाती फुगवली, दंडांना गोट्या आणण्याचा प्रयत्न केला, आखडलेल्या मानेनें व ताठ पाय करून जरा इकडून तिकडे चालून पाहिलें, पुन्हां भेसूर मुद्रेनें स्वतःकडे आरशांत दरडावल्यासारखें पाहिलें. मग ते गुंडाळून रचून ठेवलेल्या वळकट्यांच्या ढिगावर एखाद्या जुन्या पिढींतल्या संस्थानिकाच्या फोटोसाठींच्या खास (किंवा कोल्हापूरच्या चित्रपटांतील एकाद्या राजाच्या) पवित्र्यांत बसले. कपाळाला आंठ्या घालून मिशा पिंजारून शक्य तितक्या उग्र मुद्रेनें, हलक्या पण करड्या आवाजांत त्यांनीं समोरच्या दोन काल्पनिक ' सबॉर्डिनेट ' लोकांना दटाविलें,

" यस ? व्हाट ? गेट औट—ड्याम फूल ! "

इतक्यांत दारांत उभी राहून पत्नी हांसूं दाबीत आपल्याकडे पाहात आहे असें त्यांना आढळून आलें. नेहमींचे पन्त असते तर अशा परिस्थितींत कान खालीं पाडून, डोक्यावरून पांघरूण घेऊन कोपऱ्यांत लपण्यापर्यंत त्यांची स्थिति झाली असती; पण आज–आज त्यांनीं सिद्ध कवच धारण केलें होतें. निर्विकार मुद्रेनें त्यांनीं पत्नीकडे पाहिलें व किंचित् भुंवया चढवून विचारलें,

" कां, दांत काढायला काय झालं ? "

या शब्दांनीं एरवीं काशीबाईनीं दांतच काय, पण नखेंसुद्धां काढून परजलीं असतीं; पण पंतांचा नूर पाहून त्या थोड्या दबल्यासारख्या

झाल्या. त्या हलक्या आवाजांत म्हणाल्या, "कांहीं–नाहीं; कांहीं नाहीं–पण असं काय करायचं ते–"?

पन्त तुच्छतेनें हांसले,

"हं: ! तुला काय समजणार आहे तें ! मी नाटकांतलं काम पाठ करतों आहे, समजलीस ?"

"नाटकांत ?–अगबाई, अन् तें कसलं काम ?"

"अऽऽ–प्रतापरावाचं—त्राटिका नाटकांत मीं प्रतापराव होणार आहे–आमच्या त्या समाजाचं नाटक आहे–रुक्मिणीमल्लमर्दन किन्नर प्रासादिक नाट्यकलार्कसेवन समाजाचं—"

काशीबाईची उरलीसुरली धिटाई या नांवामुळें पार खचून गली. शालीनपणें आंत जातां जातां त्या पुटपुटल्या,

"मला न्यायचं ना नाटकाला ?—"

"पाहीन !" वरील समाजानें उर्दू नाटक केलें असतें तर त्यांतील वीररसप्रधान भूमिकेला योग्य अशा आवाजांत पंत उद्गारले. "आणि हें बघ," हल्ल्यानें मिळालेला वरचष्मा पक्का करीत ते ओरडले, "जेवायला लवकर कर, आणखी चांगला स्वयंपाक कर कांहींतरी; रोजचं कदान्न नको, विटलों तुझ्या हातच्या त्या खरकट्याला !"

"नाहीं–खरंच–अगदीं चांगलं करतें कांहींतरी—" आंतून अगदीं मंजुळ आवाजांत व आर्यगृहिणीला योग्य अशा भित्रेपणानें काशीबाई म्हणाल्या.

विजयोन्मादानें चिंतोपंत नाचायला लागण्याच्या बेतांत आले होते. नवीन प्राप्त झालेल्या रुबाबाची पहिली धार घरांतच 'चालवून' त्यांनीं मध्यमवर्गीय पांढरपेशाची परंपरा कायम ठेवली होती. आतां या धारेचें तजेल पाणी आणखी कोठेंतरी दाखवायचा त्यांना अनिवार मोह होऊं लागला. एका बाजूच्या बिन्हाडांतल्या पोरावर जाऊन खेंकसावें का दुसऱ्या बाजूच्या सदूभाऊ सहस्रबुद्ध्यांची शेंडी खेंचून, 'लेका, तुझं ढोंग बंद कर !' म्हणून त्याला सांगावें–कां खालीं जाऊन चाळीच्या भय्याला

नाकावर एक ठोसा चढवावा...असे विचार त्यांच्या डोक्यांत घोळूं लागले. तितक्यांत त्यांना काल त्या गोसावड्यानें दिलेल्या धोक्याच्या सूचनेची आठवण झाली व आपला फाजील उत्साह योग्य कारणीं लावावा असें त्यांनीं योजिलें.

'पंचापरिधानी परस्परप्रेरक काटकसर संघ लि.' या बँकेंत चिंतोपंतांची एकशें सत्तावन रुपये सहा आणे अकरा पै ही रक्कम जमा होती. ठेवणींतला गरम शॉर्ट कोट व स्लिपर चढवून धोतराचा काचा मारून ( पंत फक्त दोनच प्रसंगीं काचा मारीत असत: एक लग्नाच्या पंक्तींतील धांवपळीच्या वेळीं व दुसरा, रेल्वेनें प्रवास करण्याच्या काळीं! ) पंत ढगेवाडींतल्या आपल्या बँकेच्या कचेरींत दाखल झाले. त्यांनीं सत्तावन रुपये सहा आणे अकरा पैची एकरकमी उचल केली! ढगेवाडीच्या बाहेर आल्यावर ते एका भव्य हेअर कटिंग सलूनमध्यें गेले व शेंडीवाल्या माणसाला एकच शक्य असलेला जर्मन क्रॉप, गुळगुळीत दाढी व ( भिंतचित्रांत पाहिलेल्या ) जॉन गिल़बर्ट छापाच्या—नाकांतून निघून ओठाच्या कडेकडेनें खालीं ओघळणाऱ्या मिशा, अशी मशागत करवून घेऊन, न्हाव्याच्या हातावर खाडकन् पैसे व एक आणा बक्षिसी टिकवून पुन्हां ते रस्त्यावर आले. स्वत:मध्यें झालेल्या फरकाची जाणीव त्यांना इतकी परिणामकारक झाली होती कीं, एखादें इंग्लिश गाणें गुणगुणणें त्यांना अपरिहार्य वाटूं लागलें; पण त्यांना 'गॉड सेव्ह दि किंग' ही एकच ओळ येत होती. तीच त्यांनीं सुरू केली. नंतर एका फॅन्सी वस्तूंच्या दुकानांत जाऊन त्यांनीं टॉयलेटचें सामान खरेदी केलें. तें घेऊन ते एका इराण्याच्या दुकानांत शिरले व ऐटींत 'एक कप पनीर' त्यांनीं फर्माविलें. पोऱ्यानें त्यांची चूक लक्षांत आणल्यावरसुद्धां न गोंधळतां त्यानीं ऑर्डरचें रूपांतर एक कप चहांत केलें व हासूं पाहणाऱ्या इतर गिऱ्हाइकांना उग्र मुद्रेनें गोरेंमोरें बनविलें. चहा प्याल्यावर तोंडाच्या कोंपऱ्यांत एक शिलगावलेली सिगारेट बसवून ते बाहेर पडले ( व विसरलेलें सामान आणून देणाऱ्या पोऱ्याला त्यांनीं एक आणा 'टिप' दिली. ) फणींद्रकरांच्या तयार कपड्याच्या दुकानांत त्यांनीं तलम धोतरें, फॅन्सी शर्ट,

एक उंची कोट वगैरे बरीच मोठी खरेदी केली; नंतर नक्षीदार चप्पल, टोपी, रुमाल इत्यादि किरकोळ सामान घेऊन, गाडी करून ते बिऱ्हाडीं आले. त्यावेळीं चाळीच्या भय्यानेंच काय, पण शाळेंतून परत आलेल्या स्वतःच्या पोरांनींही त्यांना ओळखलें नाहीं हें येथें नमूद करण्यास हरकत नाहीं.

"अय्या ऽऽऽ! नाना, हें काय?" यमी किंचाळली. पन्तांनीं "चूप!" म्हणून तिच्यावर गुरगुरून तिला गप्प केलें. नऱ्या जास्त व्यवहारी होता, त्यानें बापाच्या अवताराकडे पूर्ण दुर्लक्ष करून घोगऱ्या आवाजांत विचारलें,

"नाना, मला निळी चड्डी आणलींएत का हो?"

"तुझ्या बापानं ठेवलीय लेका निळी चड्डी—चल हो आंत!"

काशीबाईनीं दोन्ही पोरांना आंत बोलावून घेतलें,

"यारे कार्ट्यांनो आंत! माणसाला मुळीं उसंत मिळूं द्यायची नाहीं अगदीं!"

"आई, शिरा केलास होय?" यमीनें विचारलें.

"माझं पाणी उपस आंघोळीचं!" पंत गरजले—

सुचैल स्नान करतांकरतां पंतांची तब्येत फारच खुलली होती; ते गाऊं लागले,

'कुणाला का ऽऽ वळा मोही ऽऽऽऽऽ'

काशीबाई घाबऱ्या घाबऱ्या उठल्या,

"काय झालं हो?"

"काय झालं? बेअकल्यासारखं काय बडबडते आहेस—हां इकडे येऊं नकोस—दार लावून घे, त्या कारट्यांनाही येऊं देऊं नको!"

स्नान झाल्यावर स्नो, ब्रिलियंटाईन, अंगाला पावडर, रुमालावर लव्हेंडर वगैरे चोपडून अर्धा इंची केसांचा भांग पाडण्याचा हताश प्रयत्न करून, अखेर तलम धोतरानिशीं पंत सुग्रास भोजनास बसले.

त्या दिवशीं छत्र्याच्या चाळींतले पुरुष चकित होण्याची एक मोठी संधी गमावून बसले; कारण, ते लौकर आपापल्या ऑफिसांतून निघून

गेले होते. ते जर साडे अकरापर्यंत गॅलऱ्यांतून घोंटाळत राहिले असते, तर—तर त्यांनीं एका " बहकलेल्या इसमास ताबडतोब चाळींतून 'खाली' करावें " असा अर्ज चाळीच्या मालकाकडे सोवळयानें नेऊन सादर केला असता; कारण, साडेअकराच्या सुमारास चिन्तोपन्त लहाविटकरांच्या बिऱ्हाडांतून एक ऐटदार मनुष्य बाहेर पडला. त्याच्या पायांत पांढऱ्या रंगाच्या 'ग्रीशन' सँन्डल्स होत्या, काळ्या किनारीचें पारदर्शक धोतर, चकचकीत कोऱ्या क्रेपचा ओपन कॉलरचा शर्ट, त्यावर लाल ब्लेझरचा कोट व डोकीवर भगवी काश्मिरी टोपी, असा त्याचा बाकीचा थाट होता. त्यानें लव्हेंडरयुक्त रुमालानें दोनतीनदां कपाळावरचा घाम पुसला व 'धादांत वेदांत खूळावला' हा वीररसात्मक चरण गुणगुणत तो चाळीचा जिना उतरूं लागला. ( त्याच्या मिशा जॉन गिल्बर्टसारख्या खुरपलेल्या होत्या. ) त्याच्या जाण्यानें चाळींतल्या त्या मध्यमवर्गीय महिलावर्गात इतकी खळबळ उडाली कीं, उभें लावून घेऊन धुणें बडविणाऱ्या कित्येक सुगृहिणी लाजेनें डोळे वटारून त्याच्या जाण्याकडे टकमका पाहूं लागल्या. 'मेला छाकटा' असें कांहीं तरी पुटपुटत त्या सगळयाजणी, निदान काशीबाई तरी सहीसलामत आहेत कीं नाहींत, हें पाहाण्यास धांवल्या. तो गृहस्थ चितोपंत होता हें चाणाक्ष वाचकांनीं—संदर्भावरूनच ओळखलें असेल—प्रत्यक्ष पाहून ओळखणें शक्यच नव्हतें.

दंडांत आपलें कवच आहे कीं नाहीं, हें त्यांनीं पुन्हां पुन्हां चांचपून पाहिलें व छाती रुंदावून ते चाळीच्या बाहेर पडलें; एक मसालेदार पट्टी खाल्ली, एक लठ्ठ चिरूट घेऊन पेटवला व बोलभाट नाक्याच्या स्टँडवर ते ट्रॅमची वाट पाहात उभे राहिले. थोडा वेळ उभे राहिल्या-वर त्यांच्या लक्ष्यांत आलें कीं, आपल्या हातांत कांहींच नाहीं; लगेच कोपऱ्यावरच्या पेपरवाल्याकडून त्यांनीं एक आणेवालीं तीन चार वर्तमान-पत्रें घेतली; त्यांच्या घड्या काखेंत मारल्यावर त्यांनी एक काळा चष्मा विकत घेऊन डोळ्यांना घातला—व आतां मात्र आपण सुखवस्तु, रुबाबदार व 'कोणीतरी विशेष' आहोंत या आत्मविश्वासानें ते चिरूटाचे भपकारे सोडूं लागले.

उन्हाच्या तापानें ( किंवा संवय नसलेल्या चिरूटानें ) त्यांना थोडा त्रास झाल्यासारखें वाटलें; तेव्हां दुरून येतांना दिसत असलेली ट्रॅम अव्हेरून त्यांनीं 'बस'चा नाका गांठला व थोड्याच वेळांत ( व जन्मांत पहिल्यानेंच ) बादशाही आरामांत ते हपिसाच्या मार्गाला लागले. इतर प्रत्येक उतारू आपलें वर्तमानपत्र वाचीत असलेला पाहून त्यांनींही काखेंतला गठ्ठा काढला. वरचेंच पत्र कट्टर सनातनी पक्षानें काढलेलें 'जुना गणू' हें होतें. पहिलें पान उलटतांच त्यांना जाहिरात दिसली—" रु. सव्वाशे बक्षीस! 'चाई लागून पडूं लागणाऱ्या पांढरपेशा मिशांना ताठरपणें पिंजारून ठेवण्याचे उपाय' या विषयावर लिहिलेल्या सर्वोत्कृष्ट निबंधासाठीं."

या चढाओढीवर विचार करण्यांत ते गढले असतां बस ऑफिसपाशीं पोहोचली. 'मेसर्स खेमसी वाडीलाल अँड कंपनी, आयात व निर्यात करणार' हें त्यांच्या कंपनीचें नांव होतें.

ऑफिस साडेदहालाच सुरू झालें होतें. चिन्तोपंत आंत शिरल्यावर कोटांतील शिपाईलोकांच्या पहिल्या नियमान्वयें, 'असेल कोणी बाहेरचा इसम' असें समजून शिपाई लोकांनीं चिन्तोपंताकडे तुच्छतापूर्वक दुर्लक्ष केलें. ते जसे काळा चष्मा काढून आपल्या जागेवर जाऊन बसूं लागले तसा एक शिपाई ( संघाच्या दुसऱ्या नियमाला अनुसरून ) खेंकसला,

" अहो ऽ ऽ ऽ ऽ कुठं चाललेत ? "

" आपलं काम कर ! " पंत दरडावले.

शिपाई दोन पावलं मागें सरकला; त्यानें न्याहाळून पन्ताच्या चेहऱ्याकडे पाहिले—

" कोण लहाविटकर–चिन्तूतात्या ? " तो अविश्वासाच्या हलक्या आवाजांत गुरगुरला.

" तोंड संभाळून बोल! तात्याबित्या करूं नको–आगाऊ आदमी!"

सगळ्या हपिसाचें लक्ष त्यांच्याकडे वेधलें. कारकून आपापसांत कुजबुजूं लागले, इतर शिपाई गोळा झाले. अतिप्रसंगीं शिपाई जरा कचरला, पण त्याला पुनः आपल्या संघाच्या सातव्या नियमाची आठवण

झाली. ( ' सभ्य माणसाचा पाणउतारा हरप्रसंगीं न करील तो खरा शिपाईच नव्हे.') तो हिरीरीनें पुढें झाला.

" अहो शेट, कुणाशीं मिजास करतां आहांत ? मोठे बाजीरावचे बेटे माहीत आ—"

' कडाड् ' असा आवाज एकदम निघाला व त्या ऑफिसांतल्या गजबजाटांत शान्ततेचा थोडा खंड पडला. एका म्हाताऱ्या कारकुनानें दीड तास गालांत ठेवलेला पानाचा चोथा ' बक् 'कन् गिळला; दुसऱ्या म्हाताऱ्या कारकुनाचा नाकावरचा चष्मा खालीं घसरला; कांहीं मध्यम वयस्क कारकून आपला हिशेब चुकले, व कांहीं तरुण कारकून रडवई झाले. शिपायांत तर फारच खळबळ उडाली. त्यांच्या हवलदाराच्या पगडींतल्या टांचण्या आश्चर्यानें एकदम बाहेर आल्या, आणि बाकीचे एकजात सगळे, दिवाळीचे पोस्त मागायला आल्याइतक्या अदबीनें उभे राहिले.

ज्यानें श्रीमुखांत खाल्ली तो शिपाई तर मुकाट्यानें जाऊन लिफाफे चिटकवीतच बसला !

चिन्तोपंत थंडपणें आपल्या जागेवर जाऊन बसले. त्यांनीं कोट वगैरे काढून ठेवला; खिशांतला सुवासिक हातरुमाल काढून ' हुश्शऽऽऽऽ' करीत वारा घेतला व टेबलाखालीं लांब पाय करून खुर्ची मागें कलती करून ' जुना गणू ' उघडून ते वाचूं लागले !

थोड्या वेळानें इतर कारकून आश्चर्य करून कंटाळले व आपापल्या कामाला लागले. पण ऑफिस सुपरिंटेंडंट सोकरभाई मात्र गरम झाले होते, ते ओरडले, " लह्राविटकर !"

" का ऽ ऽ ऽ ऽ य ?" जागेवरून पंत गुरकावले.

" तिथून काय ओरडतो आहेस ? कम् हिअर अॅट वन्स ! फूल ! ऑफिसमध्यें दंगा कसला चालवला आहे ? हें ऑफिस आहे ! व्हॉट डू यू मीन बाय इट ?—आणि ऑफिस टाइम काय—बापाची ऑफिस समजलास—"

" शटप् !" पन्त एव्हांपर्यंत सावकाश सुपरिंटेंडंटच्या टेबलापुढें उभे राहिले होते, ते शान्तपणें म्हणाले.

"काय?" सोकरभाईच्या कानावरची पेन्सिल प्रश्नार्थक पावि-त्र्यांत उभीच राहिली !

"शट्–अप्, म्हणजे आवाज बंद करा. अरे जारे कोणाला करतोस–करतां ? आम्ही कारकून लोक म्हणजे तुम्हाला काय वाटलों ? दीड दमडीच्या शिपुर्ड्याकडूनसुद्धां अपमान सहन करावा कीं काय ? आणि ऐका–मी आज मुद्दाम उशीरां आलों–नाहीं झालं मला वेळेवर यायला ! अकरा वर्षं वेळेवर आलों म्हणून कांहीं घड्याळाचं चाक बनलों नाहीं–आम्ही तरी माणसंच आहोंत–तुम्हांला या गोष्टीचं भान राहात नाहीं—"

सोकरभाईनीं आश्चर्याचा 'आ' कसाबसा मिटला. नरमलेल्या आवाजांत ते चांचरत म्हणाले,

"बरं बरं; जा आतां जाग्यावर–माझ्या बोलण्याचा अर्थ तसा नव्हता, मि. लव्हाविटकर—"

एक कागद टेबलावरून उचलून—

"आणि तें ह्याचं हें करा बरं जरा !"

कागद घेऊन पंत आपल्या जागेवर परतले. शेजारच्या कारकुनानें टेबलाखालीं त्यांच्याशीं हस्तांदोलन केलें. दूरच्या एका पार्शी कारकुनानें त्यांच्याकडे एक चुंबन फेंकल्याची खूण केली. तिसरा एकजण जातांजातां त्यांची पाठ थोपटून गेला; आणखी एकानें मुकाट्यानें एक सिंगल चहा त्यांच्याकडे पाठवला व 'कॉंग्रॅटस्' असे शब्द लिहिलेले दोनतीन काग-दांचे बोळे त्यांच्या अंगावर येऊन पडले. अशा प्रसंगांचीं सुखस्वप्नें कल्पून त्यांत नायकाचें काम करणारे बिचारे सगळे कारकून असा प्रकार सत्यसृष्टींत पाहून अगदीं गहिवरून गेले. गाडीवाल्याला गाडीला जोडून त्याच्या जागेवर स्वतः बसून एखादा घोडा चाबकाचे आवाज काढूं लागल्यास त्या असंभाव्य दृश्यानें बाकीच्या घोड्यांत जी खळबळ उडेल ती आज ऑफिसांत उडाली होती.

टिफिनटाइमपर्यंतचा वेळ वर्तमानपत्रें वाचीत, चहा पीत पंतांनीं सुखांत काढला. टिफिनला ते एका बादशाही इराण्याच्या दुकानांत दोनतीन कारकूनभाईना घेऊन गेले. तेथें आपली स्तुति व नवीन नवीन खाद्यपेयें पोटभर झाल्यावर परत ऑफिसांत येऊन ते कामाच्या कागदांशीं नुसता चाळा करायला लागले होते. इतक्यांत त्यांच्या कानाशीं एक कारकून गुणगुणला,

" अरे, कल्याणजीनें चहाडी केली–"

कल्याणजी हा मालकाच्या बायकोचा चुलत मावस भाऊ व त्याच्या घरींच राहणारा आश्रित होता. त्याला चहाड्या करण्यासाठींच ऑफिसांत नेमण्यांत आलें होतें अशी सर्व कारकुनांची प्रामाणिक समजूत, (व म्हणूनच सगळे त्याला फुकट चहा पाजीत. ) लौकरच पंतांना आंतून बोलावणें आलें.

ते आपला सर्व पोषाख चढवून संथपणें शेठच्या खास ऑफिसांत गेले. कारकून लोकांना तेथें जाण्याचा प्रसंग म्हणजे शिव्या खाण्यापुरताच असल्यामुळें, ' कलार्क लोकांनीं कांपत कांपत गोरेंमोरें होऊन आंत यायचें हा शिरस्ता शेठ गृहीत धरून चालत असे. पंत ताठ मानेनें आंत गेले व दगडी मुद्रेनें शेठच्या टेबलापुढें उभे राहिले.

" आपण मला कशाला बोलावलेंत ? " त्यांनीं गंभीरपणें विचारलें.

शेठ क्षणभर हतबुद्ध झाला; इतका स्वाभिमानी दिसणारा हा प्राणी कारकून असेल हें त्याला खरेंच वाटेना. इतक्यांत पंतांच्या मागून आलेल्या शिपायानें हळूच सुचवलें, ' लहाविटकर. '

शेठ एकदम गरम झाला. कारकून आणि आपल्याकडे ताठरपणें पहाण्याइतका उद्धट ! शेटजीचे तिरळे डोळे आळीपाळीनें लाल होऊं लागले, त्याचें पोट वर खालीं उडूं लागलें, तो कर्कशपणें ओरडला,

" लहाविटकर ! आज सकाळला धमाल तुम्हींच उडवला–"

" शिपायानें अपमान–"

" चूप, सिपाईने कसला अपमान–तुमी कलार्क लोकला कसला अपमान? सरम नाहीं आवते? आणि गमे ते वखत ऑफिसमंदी उफडते? हराम–"

"हां!" शेठच्या टेबलावर धाडकन् मूठ आपटली गेली! त्या मुठीचे मालक चितोपंत, जमदग्नीचा अवतार धारण करून ओरडले, "सबूर! जीभ आवरून बोला! माणुसकी ठेवा, नाहींतर या इथें लंबे करून टाकीन–"

शेठ एकदम आकरसून गेल्यासारखा हातपाय पोटाशीं धरून खुर्चीतल्या खुर्चीत मागें झाला. आश्चर्य, भीति इत्यादि विकारांनीं त्याचा फुगीर चेहरा पार बदलून गेला. क्षणभर त्याचे तिरळे डोळेदेखील संकट-काल ओळखून गुण्यागोविंदानें एकाच दिशेला पाहूं लागले; शेठ पुटपुटला, "काय छाटापाणी करून आवेला काय? तोफान कसाला करते?"

"तुफान! हेः हेः हेः" पंत भेसूर आवाजांत ओरडले, "तुफान! तुफान काय, पण धरणीकंप झाला पाहिजे, म्हणजे तुम्ही–तुम्ही माजलेले भांडवलवाले शुद्धीवर याल! विलायती सामानांत पैसा घालून देशाला आग लावतां–खादी वापरतां आणि आम्हांला जनावरा-सारखे वागवतां–पण याद राखा! याचा सूड घ्यायला टोकियोहून—"

पंत एकदम अडथळले, रशियाचें मुख्य शहर टोकिओ का मॉंटे-निग्रो याचा त्यांना घोटाळा पडला; त्यांनीं तो मुद्दाच सोडून दिला. त्यांनीं दुसऱ्या रुळावर गाडी चढवली–शेठ मात्र निश्चलपणें मागें पडून भेदर-लेल्या मुद्रेनें पाहात होता. घरचा खास रामा एक वेळ अदबीनें बोलला असता तर त्याला इतकें आश्चर्य वाटलें नसतें–पण हा एरवींचा सभ्य निरुपद्रवी 'दखणी' असा भडकलेला पाहून शेठ चाटच झाला!

"तुम्हांला वाटतं कीं," पन्त श्वास घेऊन पुन्हां गरजले, "तुम्हांला वाटतं आम्ही लोक म्हणजे विकत घेतलेले गुलाम. कारण तुमच्याजवळ पैसा आहे आणि आमच्याजवळ नाहीं! पण तुमच्या पैशाची इतकी काय किंमत आहे? असल्या पैशावर मी थुंकतों. हा चिन्तोपन्त लहाविट-कर या तुमच्या पापी संपत्तीवर थुंकतो!"

येथें पन्तांनीं थुंकण्याचा आविर्भाव केला व शेठजी दचकून खिशा-वर हात ठेवून आणखी मागें झाला. पार्टिशनच्या बाहेर ऑफिसांतले बहुतेक लोक आपापलीं कामें सोडून आंतील मनोरंजक संवादाचें एक अक्षरही न चुकविण्याच्या निश्चयानें दाटी करून उभे होते. पन्तांनीं वरची पट्टी पकडली.

" पैसा ! लाथ मारीन ( येथें शेटजींनीं आणखी अंग चोरलें ) तेथें पाणी काढीन ! तुम्हाला वाटतं, कीं या पंचावन्न रुपड्यांच्या नोकरीला मी लाचार आहें ! मनांत आणलें तर तुमच्यासारखे पंचावन्न गलेलठ्ठ टोणगे गाड्याला जुंपून पैसा वाहून आणीन. कसल्या घमेंडींत आहांत तुम्ही ? "

येथें बराच वेळ गप्प असलेल्या शेटजींनीं निषेधाचे आवाज केले. चरबींत गुदमरलेल्या त्यांच्या मेंदूपर्यंत जाड कातडीच्या आंतल्या सुस्त मज्जातंतूंनीं संदेश पोहोंचविला होता कीं, हा माणूस कांहीं ठीक बोलत नाहीं ! दरिद्री माणसाला स्वाभिमान व संताप असतो, या नवीन शोधानें ते इतके गांगरले होते, कीं आपला उपमर्द होत आहे हा त्यांचा अंधुक संशय बराच बळावला.

" अरे काय, वात काय करते ? " ते रागापेक्षां विस्मयानेंच उद्गारले, " तूं कोणाच्याज्योडे भासण करते, खबर हाय ? "

" हो हो पुरी खबर आहे, पैशानीं माजलेल्या एका हाल्यापुढं—"

" हाल्या ? हाल्या ते काय ? " मध्येंच शेठजीनें कुतूहलानें विचारलें,

" हाल्या म्हणजे रेडा—म्हशीचा नवरा. " पन्तांनीं खुलासा केला

" भेंसच्या मरद ? अरे तूं आम्हांला गाळ देते ? " शेठजीला आतां कुठें खरा राग यायला सुरुवात झाली होती.

" गाळ देतों म्हणजे ? अलबत ! शिव्या देण्याचा मक्ता काय तुमच्यासारख्या पैसेवाल्यांकडेच आहे ? आणि त्या खाण्याचा आमच्या-सारख्या नोकराकडे ? बस्स, बस्स झाली तुमची नोकरी ! हा चाललों !

दुनियेंत पैसे मिळवायला हजार रस्ते आहेत. तुमच्या नोकरीवर पोट जाळायला हा चिंतोपंत जन्माला आला नाहीं !"

"अरे ज्या ! तूं काय पैसे मिळवणार–तात्या माणस–भांडवल काय है तुज्यापासी !"

"भांडवल ?" पन्त तुच्छतेनें हंसले. "आख्या मुंबईत जसं एकट्या तुमच्याचजवळ भांडवल आहे !—भांडवल भांडवल काय घेऊन बसलांत ? एका दिवसांत लाख रुपये उभे करीन !" ( ते मनांतल्या मनांत म्हणाले, 'अर्रर, दहा लाख म्हणायला पाहिजे होते !')

"लाख रुपिया ? अरे ते काय झ्याडाला लागते हाय ?"

"पण मला भांडवल असलं तरी नको आहे–माझ्याजवळ पन्नास बिनभांडवली धंदे आहेत ! त्या कंडम इन्शुरन्स कंपनीला तीन महिन्यांत लाखाचा बिझिनेस देण्याची हिम्मत आहे माझी ! माझ्या मागं लागले आहेत मोटरी घेऊन ! फिल्म कंपनीसुद्धां काढीन बघतां बघतां—"

"फिल्लम् कंपनी ?" शेटजींनीं औत्सुक्यानें विचारले, "भांडवल-वगर ? अरे, वार्ता काय सांगते ? तुज्यापासे कोई रूपाळ बायडी—मारा बाप ! सबूर !"

पन्तांनीं पायांतला स्लीपर काढून उचलल्यामुळें शेठजींनीं आपली उत्सुकता आवरली. पन्त पुन्हां ओरडले,

"तसला हरामी धंदा करायचा नाहीं मला—कोणाशीं बोलतां तें पुन्हां ध्यानांत ठेवा ! फिल्म कंपनी तरी कशाला ? ज्योतिषकार्यालय खोलीन उद्यां ! रेसटिप्स देईन–मुहूर्त देईन–फिगर्स देईन—"

"काय, काय सांगते !" शेटजी ताडकन् उभे राहून खूष होऊन म्हणाले. त्यांनीं टेबलापलीकडच्या पन्तांचा हात खेंचला. "अरे, असा ए बाजूला आनी ! पहिला केम नाहीं बोलला ?"

पार्टिशनच्या बाहेरची मंडळी आंतील वादाला हळू हळू शास्त्रीय चर्चात्मक स्वरूप आलेलें ऐकून निराशेनें आपापल्या जागेवर परतली. परवां फ्रान्समधें एक ससा पिसाळून दोन शिकारीं कुत्रें, तीन कोंबड्या व एक शेतकरी इतक्यांना चावला होता, नंतर त्याला पोलिसांनीं अटक

केली. त्या प्रकारानें चकीत झालेल्या लोकांना, तो ससा अखेर सार्जेट-बरोबर चिलीम ओढीत टॅक्सींतून निघून गेला असता तर जें वाटलें असतें, तेंच ऑफिसांतल्या लोकांना आतां वाटलें !

थोड्या वेळानें आंतल्या ऑफिसांतून शेठजी व चिन्तोपन्त बरोबर बाहेर पडून जिना उतरून शेठजींच्या मोटरींतून निघून गेले; शेठजींचा हात पन्तांच्या खांद्यावर होता !

आणि रात्रीं नऊ वाजतां पन्त डुलत डुलत हातांत कसलेंसें बंडल घेऊन आपल्या बिऱ्हाडीं परत आले. ‘ मीं ऽऽऽ हतभा ऽऽगी कान-रडा ऽऽऽऽवें ’ या पदाची शिटी वाजविण्याचा ते निरर्थक प्रयत्न करीत होते. घरांत येऊन त्यांनीं बंडल फेंकलें व तुच्छतेच्या आवाजांत ते म्हणाले—

“ हं—तोंडाकडे पहात उभी राहूं नकोस ! नान्याला सेलरसूट, यमीला सिल्कचा फ्रॉक, तुला जरीचं पातळ—आणि आटप लौकर, जेवणं करून आपल्याला गॉर्जस सिनेमांत ‘ मंगळागौर ’ पिक्चर पाहायला जायचं आहे—आणखी आठवण ठेव, उद्यां सकाळीं आठाला मला शेठजींकडे जायचं आहे—गाडी येणार आहे त्यांची; आणि ए ऽऽऽ ! ही आंगठी ठेवून दे आणि या सोन्याच्या सांखळींत हें कवच ओवून दे मला गळ्यांत घालायला—उरक चटचट् ! ”

आणि त्याच सुमारास कापाच्या मैदानावर एका कडेला दोन साधुपुरुष, शेखमेमण स्ट्रीटवर दुपारीं साडेतीन रुपये रत्तलाच्या भावानें घेतलेले ओंजळभर चकचकीत तांब्याचे ताईत ‘ जुने ’ करण्याकरितां माती आणि गटारचें पाणी या मिश्रणांत बुडवून काढीत होते.

———

# तापत्रय

## – १ –

( खिडकींत उभे राहून रस्त्यापलीकडच्या घराकडे पहात मधुसूदन व धनंजय बोलत आहेत.

पहिल्यानें थोडी अस्पष्ट कुजबूज : मधुसूदनाच्या हांसण्याचा आवाजः रस्त्यावरच्या किरकोळ रहदारीचे आवाजः )

**धनंजय**–(लांब उसासा टाकून) आज अजूनहि बाहेर आली नाहीं–

**मधुसूदन**–(हांसून) आणि आतां आली तरी काय उपयोग ? अंधार पडला, जरी ती खिडकींत येऊन उभी राहिली तरी नजरबंदीचे खेळ आतां यापुढें करतां येणार नाहींत !

**ध०**–(निरखून पाहात) आज गडबडही विशेष दिसते आहे त्यांच्या घरांत—

**म०**–विशेष कसली आली आहे ? पाहुण्यांची वर्दळ सारखीच चालू असते त्यांच्याकडे. बिचाऱ्याच्या घराचा मुशाफरखाना झाला आहे अगदीं !

**ध०**–आणि त्या बिचारीला पाहुण्यांच्या सरबराईमुळें वर पहायला वेळ होत नाहीं–

**म०**–अस्सं ! तुला तिच्याबद्दल तेवढी कळकळ ! बाकी तिच्या नुसत्या पाहण्यावर तूं खूष असलास—

**ध०**–चूप ! माझ्याकडे आडदांडपणें पाहात उभी राहण्याइतकी कांहीं ती अगाऊ नाहीं. किती नम्र, किती मर्यादशील ! मला त्या कवितेची आठवण होते—

'कुलशील तूं धजशील दृष्टि न दृष्टिला भिडवावया ।
चुकुनि परी भिडता परस्पर लागसी चुकवावया ॥'
(पुन्हां मुस्कारा टाकतो)

म०–ओहो ! तुला काव्याचीही भावना झाली का इतक्यांत ? हा एकतर्फी विरह चांगलाच डसलेला दिसतो आहे !

ध०–हा तिला पण असाच डसला असेल—

म०–उं: !

ध०–अशीच तिची तळमळ होत असली तर—

म०–हां: !

ध०–या विरहाच्या दंशानं रात्ररात्र तीही जागी रहात असली तर—

म०–विरहाच्या दंशानें नसली तरी ढेकुण डसल्यामुळें खास जागी रहात असेल–

ध०–च् च् च् ! किती खराब कल्पना ही ! प्रेमकाव्यांत ढेंकूण काय आणतोस ?

म०–मी व्यवहारी आहे. हिवतापावर विड्यांत ढेकूण घालून रोग्याला खायला देतात; तुझी ही प्रेमाची हुडहुडी उतरून टाकायला बोलण्यांत ढेंकूण आणायला कांहींच हरकत नाहीं–शिवाय त्या समोरच्यांकडे ढेंकूण आहेतही. तो महात्मा प्रातःकाळीं उठून रोज घरापुढें ढेंकण्या आपटीत असतो–

ध०–छट् ! त्या प्रेमाच्या उद्यानांत असले ओंगळ प्राणी कधींही नसतील. असलेच तर मृगाचे मखमली जीव–

म०–जे लहान मुलांच्या 'डबा' नामक रोगावर खायला देतात–

ध०–शी शी शी ! पावित्र्यविडंबक ! मूर्तिभंजक ! सौंदर्यविध्वंसक !

म०–म्हणजे काय ?

ध०–जाऊं दे, या शिव्या आहेत खऱ्या. काय म्हणत होतो–हो, ते लाल मृग, ती आपल्या कुंकवाच्या करंड्यांत ठेवीत असेल–आपलें सौभाग्य वाढविण्यासाठीं—

म०-आणि त्या सौभाग्याचा स्वामी–त्या किड्यांच्या कुरणांतील कुकवाचा धनी तूं होणार ?

ध०–तसं झालं तर मी धन्य होईन ! पण इतकं भाग्य कुठं आहे आमचं—

म०–माझ्या तरुण मित्रा, असा अधीर होऊं नको. हिम्मत धर, तडफ बाळग; या ‘पर–लक्तर’ मासिकाच्या पहिल्या पानावरचे स्फूर्ति-दायक संदेश वाचून दाखवून तुला उत्कर्षाच्या सोपानावर चढवूं का ?

ध०–खामोष ! मीं ताबडतोब या खिडकींतून उडी टाकावी अशी तुझी इच्छा आहे का ? उत्कर्षाच्या सोपानावर चढवण्यापेक्षां त्या समोरच्या जिन्यावर राजरोस चढतां येईल असा कांहीं उपाय सांग.

म०–वेड्या, उतावळ्या प्रेमी जीवाचा लगाम खेंचणें एवढेंच नायकाच्या या मित्राचें काम. आणि पुन्हां, ती जरी तुझ्यावर खूष असली तरी माझ्या मध्यस्थीनें काय होणार आहे ? विरही चक्रवाक पक्ष्यांच्या मधलें पान बाजूला करणारा कोणी पडदेओढ्या का असतो ? कौमुदीच्या मीलनासाठीं आतुर झालेल्या सागराला कोणी ‘सायफन्’नें का चढवून द्यावें लागतें ? कमलिनीची भ्रमराशी कोणी तिऱ्हाइतानें औपचरिक हातमिळवणी का करून द्यायची असते ?

ध०-(सुस्कारा नं. तीन) ब ऽऽऽऽऽ रं बुवा......

( खिडकींतून समोर विमनस्कपणें पाहतो. त्याच्या शेजारीं दुसराही उभा राहतो.)

म०-(पाहात) आज पाहुण्यांखेरीज दुसरीच कांहीं धांवपळ–अरे, नीट बघ !

ध०-(न्याहाळून) खरंच–कारे ? हा काय प्रकार आहे ?

म०–कांहीं समजत नाहीं बुवा—

ध०–त्या गृहस्थानें पोषाख तर नामी केला आहे ! खाकी ‘निकर’ आणि गंजिफ्राक ! प्रेमसंन्यास नाटकात ‘रावसाहेब, ताकद ओळखून गडबड करा’ म्हणणाऱ्या कमलाकराच्या छातीवरच्या डाकूसारखा दिसतो आहे–

म०–त्याच्या बायकोनें पण ओचेपदर बांधले आहेत, मुलगीही अस्तन्या सारून तयार आहे—

ध०–आणि–'ती' पण लढाऊ दिसते आहे !

म०–सामानाची हालवाहालव, ओढाताण, ढकलाढकल—

ध०–हरे राम ! जागा तर बदलून चालले नाहींत ?

म०–घाबरूं नको ! दोस्त, ही नुसती स्थानिक चळवळ दिसते आहे.

ध०–आणि कायरे, प्रत्येकाच्या हातांत कांहीं तरी दिसतं आहे–हीं माणसं हत्यारं घेऊन एकमेकांचे खून तर नाहीं पाडणार ?

म०–भलतंच ! तीं हिंदू आहेत हें विसरूं नको. हिंदू मनुष्यें अब्रूवर बेतली तरी हत्येची गोष्ट करणार नाहींत–नुसते हात जोडून अत्याचारी माणसाला परावृत्त करण्यासाठीं मनधरण्या करतील !

ध०–पण प्रत्येकाच्या हातांत शस्त्र खास आहे कांहीं तरी–अरे, झाडू, केरसुण्या, खराटे आहेत !

म०–हीं फक्त बायकांचीं पुरुषांविरुद्ध शस्त्रं आहेत–त्या बुवाच्या हातांत काय आहे ?

ध०–कुंचा आहे, पण तो बायकांपासून स्वतःचं संरक्षण करण्याची तयारी करतो आहे असं कांहीं दिसत नाहीं—

म०–खडाजंगीचे आवाजही येत नाहींत. सारा कारभार मुकाट्यानें चालला आहे—

ध०–आणि चालताहेत पण जपून–अगदीं हलकेच; वाघाच्या टिपणीनं–जसा कांहीं हा चौघांचा कळप आतां सावजावर झेप टाकणार !

म०–एखाद्या बेसावध झोंपलेल्या पाहुण्याला तर लंबे करायचा बेत नाहीं ना त्यांचा ?

ध०–मदतीला धांवून जाण्याची ही वेळ आहे–जाऊं का ?

म०–जा, म्हणजे त्यांतलाच एक झाडू तुला मिळेल.

ध०–मग काय करूं ? इथल्या इथेंच चुळबुळत बसू ? कांहीं सुचत नाहीं ! मध्या, तुझे पाय धरतों, तूं दिसायला मोठा पोक्त आणि सभ्य दिसतोस. रोमान्सचा–म्हणजे पांचटपणाचा–आरोप तुझ्यावर कांहीं कोणी करणार नाहीं. शेजारधर्म म्हणून चौकशीसाठीं जाऊन तूं जर ओळख पाडलीस तरच तुझ्या या दीनवाण्या मित्राला जिवन्त राहण्याची आशा आहे—

म०–पण—

ध०–टॅक्सी करून सिनेमाला नेईन–काम फत्ते केलंस तर पिरँदेली-मधें जेवायला घालीन—

म०–सैताना, मला मोह पाडूं नको !

ध०–मधुसूदन, माझे प्राण तुझ्या हातांत आहेत. याद राख, तूं जात नसलास तर मी—

म०–काय करशील ?

ध०–मला चिडवूं नको–काय तें करूनच दाखवीन–तुझा जाहिरात–दलाल होईन ! प्रत्येक वर्तमानपत्रांत तुझा ब्लॉक छापीन. काडीइतकें निमित्त नसतांना तुझ्या स्तुतीनें रकानेच्या रकाने भरून काढीन ! वाटेल तो खर्च करीन, पण तुला इतकी प्रसिद्धि देईन कीं तुझं नांव आणि तुझा चेहरा पाहून वाचक पिसाळलेच पाहिजेत !

म०–नको–त्रस्त समंधा शान्त हो ! हा मी चाललों, पण वचन विसरूं नको—( जातो. )

( इतक्यांत समोरच्या बिऱ्हाडांत एकच हलकल्लोळ होतो. जमिनीवर काठ्या केरसुण्या खराटे आपटल्याचे आवाज– ' सांपडला ! मार, मार ! गेला ! तो बघ ! कपाटामागें– असाऽऽऽऽऽऽ ! ईऽऽऽऽऽऽऽ ! अगबाई ! दूर हो !' इत्यादि वेगवेगळ्या आवाजांतल्या आरोळ्या व किंकाळ्या. )

— २ —

[ मागील प्रवेशाचे अखेरचे आवाज चालू ]

[ वरील आवाज करणारीं माणसें:—घरमालक बलराम, त्याची पत्नि रेवती, त्याचा मुलगा सुरेश ऊर्फ बेब्या व—भगिनी सुभद्रा. आरडाओरडा चालू असतां दारावर 'टक् टक् टक्' असा आवाज येतो.]

**बलराम**—( न छापण्यासारखे कांहीं शब्द पुटपुटून ) आतांच उपटले का कोणीतरी ? बेब्या, उघड बाबा तें दार.

( बेब्यानें उघडलेल्या दाराबाहेर मधुसूदन उभा असतो, तो नमस्कार करतो. )

**ब०**—( दांतओंठ खाऊन खोटें हांसत ) ह्यः ह्यः ह्यः ! या ! कोणत्या गाडीनें आलांत ? सामान मागून येत आहे वाटतं, जेवण व्हायचंच असेल—आणि आंघोळ ? चहा ठेवायला—

**म०**—( हांसून ) मी पाहुणा नाहीं. त्या समोरच्या बिल्डिंगमध्यें राहतों मी. आपल्या घरांत कांहींतरी गडबड दिसली म्हणून आलों—कांहीं मदत हवी असल्यास—

**ब०**—( जीव खालीं पडल्याचा एक जंगी श्वास सोडून ) या, या, या ! असें आंत या, बसा त्या खुर्चीवर ! तुम्ही पाहुणे नाहीं हें मला खरंसुद्धां वाटत नाहीं !

**म०**—( हांसून ) मी आपला शेजारी आहे, आपल्याला आजच्या प्रसंगीं कांहीं उपयोग व्हावा—

**ब०**—कसला प्रसंग ?

**म०**—आपल्या बिऱ्हाडांत एकदम कांहीं तरी आरडाओरडा ऐकूं आला—

**ब०**—हाः हाः हाः ! हें होय ? अहो, हा आमचा दर दोनचार महिन्यांचा कार्यक्रम आहे. आमच्या दोन कट्टया शत्रूंच्याविरुद्ध ही मोहीम आहे—

**म०**–शत्रू ?

**ब०**–होय, आमचे हाडवैरी, प्रत्येक कुटुंबवत्सल माणसाचे दुष्मन् !

**म०**–कोण, हे बदमाष आहेत तरी कोण ?

**ब०**–यांच्यांतला एक आमचें रक्त अहोरात्र पीत असतो, आमचे लचके तोडीत असतो, चोरट्या हल्ल्यांनीं हैराण करून टाकतो. दुसरा आमच्या अन्नावर तुटून पडतो, चीजवस्त कुरतडून निकामी करतो, रसद मारून टाकतो—

**म०**–अबब !

**ब०**–( वीरश्रीनें पुरा पछाडलेला ) पण आतां तीनचार महिनेपर्यंत तरी दोघांनाही मीं नामशेष करून टाकलें आहे; त्यांचीं पाळेंमुळें खणून त्यांना नेस्तनाबूद करून मोकळा झालों आहें !

**म०**–( या माणसाला वेड तर लागलें नाहीं या संशयानें ग्रासलेला व वेड्याच्या लहरीप्रमाणें वागलें पाहिजे हा पोक्त विचार करून ) हं, हं, हं ! अस्सं अस्सं ! समजलों, खरं आहे अगदीं—

**ब०**–तुम्हाला कितपत त्रास आहे हा ?

**म०**–( मुळींच कल्पना नसल्यामुळें गोंधळलेला ) अं ? आपला साधारण–आहे म्हटलं तर आहे, नाहीं म्हटलं तर नाहीं—

**ब०**–गय करूं नका अगदीं ! नाहीं तर जीव नकोसा करून टाकतील तुमचा—

**म०**–पण तुम्हीं सफा करून टाकले आहेत ना ?

**ब०**–अहो, ते आमच्या पुरते–बरी आठवण झाली ( बहिणीस ) सू, तो कचरा काढून टाक सगळा, ते मुडदे नकोत घरांत—

( केर काढल्याचे आवाजः मधुसूदन हळूच डोकावून पाहतो ).

**म०**–असं असं असं ! बागुरडे होय ?

**ब०**–वाहवा ! मग काय समजलांत ? बागुरडे आणि ढेंकूण ! ( दोघेही हांसतात. )

म०—आज तरी या दुहेरी तापांतून सुटलांत म्हणायचे. थोडी स्वस्थता मिळेल—

ब०—अहो, हळू बोला ! नाहीं तर तिसरा ताप दत्त म्हणून उभा राहील—

म०—तो कोण ? उंदीर की काय ?

ब०—उंदीर पुरवले, ते धांवरे तरी असतात. ही मी म्हणतों ती तिसरी पीडा अगदीं राजरोस बैठक देऊन बसते—

म०—माझ्या कांहीं लक्ष्यांत येत नाहीं—

ब०—पाहुणे ! ढेकूण आणि बागुरडे यांच्यांसह मुंबईच्या दुर्दैवी रयतेला त्राहि भगवान् करणारे पाहुणे, दीड वितीच्या जागेंतही साडेतीन हात देहाला स्वस्थपणें टेकूं न देणारे पाहुणे, घर खाऊन दार तोंडीं लावणारे—पाहुणे !

म०—छे, छे ! फार फुगवलेलं वर्णन आहे; आपल्याच माणसांना—

ब०—( भेसूरपणें हांसून ) आपलींच माणसं ? कोणा लेकाचीं माणसं ! अहो, आपलीं माणसं वर्षन् वर्ष पहायला मिळत नाहींत. ही सगळी उपट-सुंभांची गर्दी, आऊचे काऊ आणि मावसभाऊ ! हा कोण ? चुलत बहिणीच्या दिराचा मेव्हणा ! तो कोण जांवयाच्या आतेभावाचा मित्र !

म०—जाऊं द्या; माझ्यासारख्या परक्याला आपल्या खासगी गोष्टी कशाला—

ब०—परके कसचे आलां आहांत ?—तुम्ही पाहुणे नाहीं हें कळल्या-वर विलक्षण आपलेपणा वाटूं लागला आहे मला तुमच्याबद्दल !

म०—बाकी अनोळखी मनुष्य पाहुणा येणें धोक्याचेंच जरा—

ब०—अनोळखी काय, पण ओळखीचा सुद्धां ! माझ्या जोखमीच्या वस्तु बँकेंत ठेवून दिल्या आहेत आणि या लग्नाला आलेल्या बिहिणीवर आमच्या हिची करडी नजर आहे, म्हणून ठीक आहे ! आणि ओळखीचा माणूसदेखील पाहुणा म्हणून आला तर ओळखूं येणार नाहीं मला ! खटाऱ्याच्या बैलाला जशी खटाऱ्यांत चढण्याउतरणाऱ्यांची मोजदाद

नसते, तसं हें संसाराचं जूं मानेवर घेऊन मुंडी बगलेंत मारून निघाल्यावर मला घरांत कोण कोण आहे याचीही शुद्ध नसते ! बायकोलासुद्धां मीं फक्त अंधारांत ओळखतों !

**म०**—अरेरे, मग कांहीं करमणूक, जिवाला कांहीं विरंगुळा, मनाची कांहीं हौस, कांहींच नाहीं तुम्हांला ?

**ब०**—वाहवा, नाहीं का ? आपला हैराण चेहरा आरशांत पाहून तो ओळखूं येतो कीं नाहीं हें पाहायची करमणूक आहे, हपिसांतली महा-रकी हा मोठा विरंगुळा आहे आणि मनाची हौस म्हणजे या बदमाष फुकट्या ऐतखाऊ पाहुण्यांच्या मुडाचीं सुखस्वप्नें ! चांगले सुखवस्तु असतात बेटे, सहज चैनींत येतात—जिवाची मुंबई करायला ! आणि येतात तेव्हां संकोचाचा केवढा आव आणतात—एक विचारतो ' त्रास नाहीं ना व्हायचा तुम्हाला ? ' दुसरा स्टेशनावरून येतां येतां पैशांची शिळी भाजी घेऊन येतो आणि गांवाहून आणल्याची बतावणी करतो—जसा कांहीं याच्या बाबाच्याच मळ्यांतला माल ! तिसरा मुलांच्या हातावर खाऊला दोन रुपये ठेवतो, जसें खाणावळीचें बिल !

**म०**—मग हॉटेलांतच कां उतरत नाहींत ?

**ब०**—तिथें इतकी लाचार बरदास्त कोण ठेवील यांची ? हे लोक हॉटेलांत उतरण्याची आशा असेल तर ' यादवाश्रम ' आणि ' जहा-गिरदार-गृह ' यांची जाहिरात मी माझ्या खर्चानें सगळीकडे करीन !

**म०**—छे छे ! इतकं हताश होण्याचं कारण नाहीं—

**ब०**—अहो, तुम्हांला माहीत नाहीं—घर मांडून या तापत्रयांत तुम्हीही सांपडलांत म्हणजे समजेल !

**म०**—आपण कांहीं तरी मार्ग शोधून काढूं. माझा एक मित्र आहे. तो रसायनशास्त्राचा विद्यार्थी आहे. ढेंकुण—बागुर्ड्यांवर त्याच्या-जवळ कांहीं तरी जालिम उपाय खात्रीनें मिळेल—

**ब०**—मिळाला तर त्याला तो मागेल तें मी देईन—

**म०**—पहा बरं, असं भलतंच कांहीं कबूल करूं नका !

ब०—हरकत नाहीं—मागेल तें देईन मी त्या ढेंकुणबागुर्डीमारकाला—

म०—त्याच्या बाबतींत तुम्हीं आपले शब्द खरे केलेत तर, पाहुणे घालविण्याचें औषध मी स्वतः सांगेन. ठीक आहे; रात्र झाली—येतों आतां मी—

ब०—नमस्कार, येत जा, आतां ओळख झाली आहे—ह्यःह्यःह्यः!

म०—बरं आहे, गुड् नाइट्!

(जातो.)

— ३ —

(थोड्याच दिवसांनंतर : मधुसूदन व धनंजय)

ध०—इतके दिवस झाले तरी प्रगति कांहीं नाहीं—

म०—इतके कुठले? आठ दिवससुद्धां झाले नाहींत.

ध०—पण तेवढ्यांत तूं दोनतीनदां जाऊन चहाही घेऊन आलास— तुझाच तर डोळा नाहीं ना तिच्यावर?

म०—कृतघ्न मनुष्या! आतां मात्र कमाल झाली! दरवेळेला तुला बरोबर बोलावतों आहें, पण तूंच घाबरून घरीं बसतोस!

ध०—माझ्यावर तूं रसायन—शास्त्राचं कातडं टाकलं आहेस ना! तिथं जाऊन फजिती करायची आहे वाटतं माझी तिच्यासमोर?

म०—अरे, तिथं कांहीं 'घाल औषध आणि मार ढेंकूण' असं नको करायला? चार गप्पा मारून वेळ पुढं ढकलायची इतकंच. अरे, असा गारठतोस कां? मी आहें ना तुझा पाठिराखा—दोस्त.

ध०—पण त्या गृहस्थानें तर पण केला आहे ना, कीं बागुर्डे मारणारालाच बहीण—

म०—बहीणच नाहीं, हवें तें!

ध०—मला बाकी कांहीं नको—एक 'ती' मिळाली म्हणजे झालें!

म०—कायरे, कांहीं ओळख पटल्यासारखी वाटते का?

ध०—वाटते, पण काय उपयोग? जरा जास्त वेळां समोर येते, इतकंच. तिच्या त्या वहिनीचा आणि त्या पोराचा पाहरा मात्र नाहीं दिसत पूर्वीइतका.

म०—अरे खरंच, तुला सांगायला विसरलों. सौ. रेवतीबाई आणि चि. बेब्या गांवाला गेलीं आहेत—

ध०—काय म्हणतोस? मग ती घरांत एकटी भेटण्याचा संभव आहे म्हणायचा!

म०—पागल! घाई करून कांहीं आचटरपणा करूं नको!

ध०—मग काय करूं—इथेंच माशा मारीत बसूं?

म०—नको, तिथें जाऊन बागुरडे मार! अहाहा, किती रोमँटिक कल्पना ही! त्या घनघोर अरण्यांत जाऊन तूं त्या दोन जातींच्या हिंस्र प्राण्यांची मृगया करणार आणि मग ती सुंदरी तुझ्या शौर्यावर अनुरक्त होऊन तुला वरणार!

ध०-ठीक आहे, कर चेष्टा. आपणच बनवून आपणच हेटाळणी कर—यू ब्रूट!

(मधुसूदन मोठमोठ्यानें हंसतो, धनंजय त्याच्याकडे कांहीं तरी फेंकतो.)

म०—(एकदम) ए, ऐक, सीरियस्ली, सोळा आणे युक्ति आहे एक, इकडे ये—

(कुजबूज)

.........राहील नीट लक्ष्यांत? तूं नाशिकच्या कमळामावशीचा चुलत पुतण्या, माहिती सगळी पाठ आहे ना?

ध०—आहे—

म०—होईल का तुझ्यानें?

ध०—होऽईल—पण ओळखतीलशी भीति वाटते --

**म०**—चष्मा घालून गांधी टोपी डोक्यावर ठेवून जा, बावळटपणाचा एवढा ट्रेडमार्क असल्यावर कोणीही ओळखणार नाहीं !

**ध०**—पण त्यांचे शेजारीपाजारी ? मालकापेक्षां या चाळवाल्यांचीच काकदृष्टि जास्त चौकस असते !

**म०**—जरा दबून वाग—अँड ट्रस्ट टु लक—

**म०**—अच्छा—मग उद्यां सकाळीं ! जय श्रीकृष्णजी !

**— ४ —**

( सकाळची वेळ. बलराम व सुभद्रा चहा पीत आहेत. )

**ब०**—हुश्श्श् ! अलीकडे चारपांच दिवस काय ती थोडी स्वस्थता आहे—

**सु०**—दादा, खन्त करूं नको, उच्चार करण्याचा अवकाश कीं पस्तावा करण्याची वेळ येईल !

**ब०**—घर किती शान्त वाटतं ! तिला देखील तिकडे विश्रान्ति मिळत असेल—बाकी घरांत गर्दीची इतकी संवय झाली आहे कीं, इतका मोकळेपणा मिळून देखील चुकल्याचुकल्यासारखं होतं—

**सु०**—दादा संभाळ हं—विषाची परीक्षा फार पाहूं नको, आपल्या सुदैवाचा उच्चार करूं नये !

**ब०**—वाटल्यावांचून राहात नाहीं—जवळजवळ एक आठवडा झाला, एकही पाहुणा—( दारावर 'टक् टक् टक्' ) अस्तिक अस्तिक !

( कपाळाला हात लावून खालीं बसतो, दारावर पुन्हां ठोके. बलराम मानेनेंच खूण करतो; सुभद्रा जाऊन दार उघडते.

दारांत एक हंसतमुख ' सुचष्मित ' खादीटोपीवाला. त्याच्या
मागें सूटकेस, होल्डॉल हँडबॅग वगैरे सामान
धारण करून उभा एक पाटीवाला
सुभद्रा पाहुण्याकडे चपापून पाहते व जागच्या जागीं खिळल्यासरखी उभी राहते.)

**पाहुणा**—रामभाऊ आहेत का ?

( बलराम उठून पुढें येतो.)

**पा०**—नमस्कार! म्हटलं भेटतात का नाहीं! एकाएकीं नाशकाहून निघालों, काकू—तुमच्या कमळामावशी, खुशाल आहेत—

**ब०**—( शिकस्तीनें हस्तिदन्ती करीत ) या! अरे पाटीवाला, तें सामान या इथें ठेव...अस्सं, हं, हे घे पैसे—( पाहुण्यास ) नको नको, मी देतों! सू, जा चहा ठेव. ( पाहुण्यास ) तोंडबिंड धुवाल तोंपर्यंत—

**पा०**—थँक्स, मी चहा घेत नाहीं; नको—कॉफी, दूध, कांहीं नको. आंघोळ गार पाण्यानं—मी आपलं सगळं उरकून घेईन. तुमच्या कार्यक्रमांत व्यत्यय नको उगाच !

**ब०**—( ' काय संभावीतपणा दाखवतो आहे लेकाचा ! ' असा मनांतल्या मनांत विचार करीत) कसचं कसचं ! व्यत्यय कसला आला आहे—

**पा०**—ह्यः ह्यः ह्यः ! तुम्ही मुंबईचीं माणसं, काम कसं यन्त्रासारखं, तेव्हां आमचा उपद्रव आपला शक्य तितका कमी असावा !

**ब०**—( ' चोर किती साखर पेरतो आहे ! ' या जाणिवेनें ) उपद्रव वगैरे कांहीं नाहीं. संकोच करण्याचं कारण नाहीं—घर आपलंच आहे !

**पा०**—छे, छे, यू आर टूऽऽकाइंड !

**ब०**—नॉट ॲट ऑल—बरं, आतां आम्ही लागतों आमच्या आन्हिकाला. चला, तुम्हाला पहिल्यानें बाथरूम वगैरे दाखवतों.

( दोघे जातात. सुभद्रा बाहेर येऊन स्वतःशींच
चोरून हंसत केर काढूं लागते. थोड्या
वेळानें तोंड पुशीत पाहुणा येतो. )

पा०—चालूं द्या, चालूं द्या ! मी बाहेर उभा राहतों हवा तर—

सु०—( केर काढीत ) मी थांबलें नव्हतें—

पा०—( हळूंच ) रामभाऊ आंघोळ करीत आहेत, तेवढ्यांत बोलून घेतों—

सु०—( उभी राहून त्याच्याकडे पाहून ) हें काय ? केवढं धाडस केलंत हें ? तुम्हांला भीति नाहीं वाटली ?

ध०—( गांधीटोपी व चष्मा काढून ) भीति ? प्रेमवेड्याला भीति कसली ?

सु०—वेडे खरे—दादानं ओळखलन् तर धक्के मारून काढून देईल—

ध०—त्यांनीं ओळखायची भीति नाहीं ! शिवाय मी त्यांच्या मदतीलाच धांवून आलेलों आहें—

सु०—मदतीला ?

ध०—होय.

( हँडबॅगमधून एक कागदाचा पुडा काढतो, तो उघडून त्यांतले मेलेले ढेकूण व बागुरडे सांदीकोंपऱ्यांतून टाकून देतो. नंतर एक मूठभर पांढरी पूड जिकडेतिकडे टाकतो—– )

सु०—हें काय चालवलं आहे तुम्हीं—

ध०—मी ढेंकण—बागुरडे—संहारक या ऑफिशियल भूमिकत आलेलों आहे—

सु०—या आचरटपणाचा अर्थ मला कांहीं समजत नाहीं. तुम्हाला राजरोस येथें येण्याची छाती तरी कशी झाली कुणास ठाऊक !

ध०—तुझ्यासाठीं ! तुझ्या नजरेच्या जादूनें मला भारून टाकलं—तुझ्याकरितां अक्कल गहाण टाकन, जिवावर उदार होऊन, कांहींतरी निमित्त करून इथें आलों. सू, सुभा, सुभद्रा-माझा अव्हेर करणार कां तूं ?

सु०—तुमच्या धाष्टर्याची कमाल आहे बाई !

**ध०**–मला उत्तर नाहीं का देणार ? तुला मिळविण्यासाठीं व्यूह रचून मी येथें आलों आहे–सू, राहूं का मी ? तुला माझा तिटकारा आला असेल तर ताबडतोब निघून जाईन. माझं जीवदान तुझ्या हातांत आहे–राहूं कां जाऊं ?

**सु०**–( खालीं मान घालून, हळूंच ) मला नाहीं बाई माहीत !

**ध०**–( जवळ जाऊन ) सुभद्रा, माझी होशील का तूं ?

( तिचा हात आपल्या हातांत घेणार–इतक्यांत बाहेरून एक रिकामटेकडा शेजारी–)

**शेजारी**–काय रामभाऊ, काय चाललं आहे ? ( सुभद्रा घरांत पळते. शेजारी आंत येतो. टेबलावरचीं वर्तमानपत्रें उघडतो, सुपारी कातरून तोंडांत टाकतो, सिगारेट काढून शिलगावतो. ) रामभाऊ कुठें आहेत ? कशांत गुंतले आहेत इतके ?–ऑं ? ( धनंजयाच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पाहतो. ) का हो, तुम्ही तर समोर राहतां ना ?

**ध०**–( पहिल्यानें गोरामोरा व नंतर बेछूट होऊन ) अं ? छे–भलतंच ! मीं तर आज सकाळीं नाशकाहून आलों !

**श०**–( मनांत पक्कें ओळखून ) अस्सं !

( आंत घरांत जातो. पिंजऱ्यांत सांपडलेल्या उंदरासारखा धनंजय सैरावैरा धांवूं लागतो. आंतून आवाज, कुजबूज, बलरामाच्या आरोळ्या ‘ आं ? ’ ‘ काय ? ’ ‘ छट् ! ’ ‘ अस्सं ? ’ ‘ म्हणतां काय ? ’ ‘ नाहीं नाहीं ! ’ इ०...धनंजय खिडकीशीं जाऊन स्वतःच्या खिडकीकडे आशेनें पाहतो; त्या खिडकींत मधुसूदन येतो. धनंजय त्याला निकडीच्या खुणा करतो, गळ्यावरून बोट फिरवून दाखवतो ! ‘ चल चल ’ असे घाईचे अंगविक्षेप करतो. इतक्यांत ओला पंचा परिधान केलेला बलराम रौद्रस्वरूप धारण करून बाहेर येतो. त्याच्याबरोबर रिकामटेकडा शेजारी. सुभद्रा सचिंत मुद्रेनें दाराआडून डोकावते. )

**ब०**–( गर्जून ) काय हो, याचा अर्थ काय ?

( दुसऱ्या शेजाऱ्यांचीं मुलें येऊन खिडकीपाशीं उभीं राहतात. )

ध०–( निगरगट्टपणें ) कसला ?

शे०–( सात्विक संतापानें ) पहा पहा ! आणखी विचारतो आहे वर !

( मागच्या बाजूनें अन्तर्गृहांत शेजारणी उपस्थित झाल्याचे आवाज )

ब०–( डुरकणी फोडून ) तोतया पाहुणा !

ध०–[हंसून] अहो, पाहुणा कधीं तोतया कसा होईल ? पाहुणा म्हणून मी अस्सलच आहे, कमळामावशीचा पुतण्या म्हणून मात्र तोतया–

शे०–बस् बस ! ब्रह्मज्ञान सांगतो आहे आणिक ! पोलिसांत गुदरायला पाहिजे––

( पुरुष शेजाऱ्यांच्या मिशांचीं टोकें खिडकीच्या कडेकडेला डोकावून जातात )

ब०–धडधडीत आपले राजरोस घरांत घुसलांत --

ध०–चोरून शिरण्यापेक्षां बरं नव्हे का हें ?

[ शेजाऱ्यांच्या पोराबाळांनीं बोलावून आणलेली त्यांची मित्र-मंडळी आंत येऊन उभी रहातात. अंतर्गृहांतल्या शेजारणी धीट होऊन आंतल्या दारांतून पाहूं लागतात. मिशीच्या टोकाचे मालक-शेजारी संकोच सोडून खिडकींत उभे राहतात. ]

ब०–कल्पना नव्हती तुम्ही इतके बदमाष असाल म्हणून ! समोरच राहणारे दुसरे एकजण येतात आमच्याकडे, पण किती सभ्य माणूस––

[ इतक्यांत ‘ हॅलो-हॅलो-हॅलो ! ’ असें म्हणून तमासगिरांच्या गर्दीतून मार्ग काढीत मधुसूदन प्रवेश करतो. ]

ब०–हेच ते ! आतांच या डांबिस माणसाला सांगत होतों–

शे०–( ओरडून ) अहो, हा पण याचाच साथीदार–

म०–( चिडल्याचा खूप आवेश आणून ) काय–काय भकतो आहे हा इसम ?

ध०—( इंबरडा फोडल्यासारख्या आवाजांत ) मध्या! तूंच वांचव आतां!

म०—डोंच्यू वरी, ओल्ड मॅन; आय शॅल डील विथ धिस—रामभाऊ, ही गर्दी कसली आहे इतकी? ( खिडकींतल्या लोकांना ) का हो, तिकिटं घेतलीं आहेत का? ( मुलांबाळांना ) पळारे बाबा लोग जाव, रस्त्यावर सिनेमाच्या जाहिराती वाटताहेत. ( आंतल्या दिशेला पाहून ) सकाळीं घरकामांतून फुरसत बरीच मिळते इथल्या लोकांना!

( एकेक नाइलाजानें काढता पाय घेतात—तरी कांहीं लोचट माणसें रेंगाळतात. )

म०—( हवेंत पाहून एकदम खेंकसतो ) पदरचं खाऊन लष्करच्या भाकरी भाजण्याची फार हौस दिसते कांहीं माणसांना! अगदीं निपटून काढावीं लागतात!

( रेंगाळणाऱ्या बाजारबुणग्यांचें कूच )

म०—( बलरामास ) रामभाऊ, माफ करा हं माझ्या आरड्या-ओरड्याबद्दल, पण इथें तुमच्या खाजगी गोष्टी चालत असतांना तमासगीर कशाला? ( शिल्लक राहिलेल्या मूळच्या एका शेजाऱ्याकडे रोखून पाहतो.)

शे०—( कांगाव्यानें ) मलाही जायला सांगतां कीं काय? मींच तर ओळखला तुमच्या या लुच्च्या साथीदाराला—

म०—( ओरडतो ) दॅट विल डू! हा वाद फक्त आमच्याआमच्यांतला खासगी आहे—रामभाऊ, वी डोन्ट वॉँट धिस् आउटसाइडर हिअर—

(शेजारी बलरामाकडे आशेनें पाहतो. बलराम दगडी मुद्रेनें नाकासमोर पाहतो. शेजारी तणतणत निघून जातो.)

ब०—( कठोरपणें ) इतका वेळ माझ्या घरांत अधिकार गाजवल्यानंतर आतां माझ्याकडे लक्ष द्यायला तुम्हाला वेळ होईल अशी आशा आहे—

म०—( खोटाच हंसण्याचा आविर्भाव करून ) ओ—दॅटस् क्वाइट ऑल राइट, सर! आतां मुद्द्याचा विचार करूं. पहिली गोष्ट—हा माझा स्नेही, जोडीदार, धनंजय—हा सर्वस्वीं निर्दोष आहे—

ब०—महाराज, या गळेपडूपणानें मी बनणार नाहीं. धडधडीत माझ्या घरांत हा आहे आणि निर्दोष—

म०—मींच त्याला पाठवला—

ब०—काय ?

( दाराआडची सुभद्रा धनंजयावर डोळे वटारते तो ' नाहीं, नाहीं!' ' थांब,' ' ऐकून तर घे ' अशा खुणा करतो )

म०—हाच तो रसायनशास्त्री; झुरळांचा काळ, ढेंकणाचा संहारक, जवानमर्द शेर–इ–गिरगांम याने भेदी मेहेमान धनंजय नगरकर !

ब०—काय खरंच ! यांच्याजवळ कोणतें औषध आहे–तें दाखवूं द्या–

ध०—त्या कोंपऱ्यांत पहा, पेटीखालीं डोकावा, कपाटामागें दृष्टि फेंका—एका क्षणांत माझ्या रामबाण इलाजाची आपल्याला खात्री पटेल—एक कुंचा आणून मागचा केर जरा पुढें आणून पहा—

ब०—( पडद्याकडे तोंड करून ) सुभा, यांना जरा झाडू दे बरं—

ध०—( आश्चर्यानें ) काय—इतक्यांत ? माझं ऐकून घेण्याआधीं ?

म०—ईडिअट ! अरे मूर्खा, झाडू म्हणजे केरसुणी—

( सुभद्रा हंसू दाबीत केरसुणी आणून देते. धनंजय सांदीकोंपऱ्यांतले मेलेले ढेंकूण बागुरडें पुढें लोटतो. )

ध०—पहा हे मानवजातीचे वैरी—

म०—या माझ्या मित्राच्या जालीम अस्त्रानें गतप्राण होऊन पडले आहेत—

ध०—हा त्यांच्या पापी मुडद्यांचा खच पहा—

म०—आतां हे तुम्हांला छळायला कधींही येणार नाहींत, हिवताप आला तर औषधालासुद्धां ढेकूण मिळणार नाहीं या घरांत. ( धनंजय त्याच्यावर डोळे वटारतो. )

ब०—धन्य धन्य ! कमाल आहे !!—पण हो, काय हो हें औषधाचं ठीक आहे, पण या भल्या माणसाला चोरून माझ्या घरीं पाहुण्याच्या सोंगानं यायचं काय कारण ?

**म०**—रामभाऊ, आपलं वचन आठवा, तुमच्या शत्रूंचा निःपात करणाऱ्या माणसाला तुम्ही वाटेल तें देणार होतात—

**ब०**—मग मी कुठें नाहीं म्हणतों आहें? काय हो, काय हवं आहे तुम्हाला? सुभा, माझं पैशाचं पाकीट आण पाहूं—

**ध०**—हरहर!

**ब०**—कां हो?

**ध०**—मी—आपलं हं ऽऽऽ—आपल्या ह्या...ह्यः ह्यः ह्यः!

**म०**—मी सांगतों—त्याला आपली बहीण हवी आहे—घाबरूं नका—तुमच्याच शाखेचा आहे तो, उत्तम कुळांतला. त्याचे वडील जोहुकम संस्थानचे कारभारी आहेत—

**ब०**—म्हणजे ते आपले हे दाजीसाहेब नगरकर कीं काय? वाहवा—मग ते आमच्यापैकींच. हिच्या मामेबहिणीच्या सासूचे सावत्र भाऊ! मग त्यासाठीं इतक्या आडवळणानें कशाला? आणि हो—मुलीचीही इच्छा पाहिलीच पाहिजे या दिवसांत!

**म०**—त्यासाठींच इतकीं आडवळणं!

**ब०**—(संशयखोरपणानें) म्हणजे? इतक्यांत तुमचं सगळं ठरूनही—

**ध०**-छे छे छे—पण आपली आशेला जागा-वारा कसा वाहतो तें पाहायला—

**म०**—तुमच्या बहिणीला आतांच विचारून घ्या ना?

**ब०**—सू—ए सुभद्रे, बाहेर ये पाहूं जरा!

**सु०**—(दाराआडून) उं—हूं!

**ब०**—ऐकती आहेस वाटतं सगळं दाराआडून! या अलीकडच्या पोरी म्हणजे अगदीं—हं, मग काय ग, तुझं काय मत आहे? तुला पसंत आहेत का हे?

**सु०**—(आंतून) मला नाहीं माहिती!

**ब०**—म्हणजे?

म०—अहो, इतकं कळत नाहीं ? याचा अर्थ ' पसंत नाहींत असं नाहीं.'

( आंतून हास्याची उकळी दाबल्याचा आवाज )

ब०—ठीक—हो बरी आठवण झाली—अहो, मी माझी प्रतिज्ञा पुरी केल्यावर तुम्हीं तिसऱ्या पीडेचा इलाज सांगणार होतात ना ?

म०—अवश्य. पाहुणे घालवण्याचा. ( हांसून ) हा एक पाहुणा तर तुम्ही घालवलांतच—

ब०—पण माझ्या बहिणीचं मोल देऊन—मला बहीण एकच आहे !

म०—अहो, हा एका बहिणीला घेऊन जातो आहे, दुसरे पाहुणे एखाद्या बहिणीला भिऊन पसार होतील तशी एखादी बहीण नाहीं का दूरची कोणी तुम्हांला ?

ब०—नाहीं बुवा.

म०—मग दुसरा उपाय सांगतों, तुमच्या या पहिल्या शत्रूंना पाहुण्यावर सोडा; पाळीव ढेंकूण व झुरळाचं एक कुरण ठेवा आणि पाहुण्याच्या टोपींत, कपड्यांत सामानांत हे इमानी प्राणी भरून द्या. पाहुण्यासाठीं ढेंकणांनीं सजविलेली एक राखीव शेज ठेवा आणि त्याही-उपर नच गेला तर, पाहुण्याजवळ पन्नास रुपये उसने मागा-सकाळचा पाहुणा दुपारला पसार होईल !

ब०—आहे खरा इलाज ! बरं, हें पहिलं औषध कोणतं ?

ध०—त्याचे सर्व हक्कच मी तुम्हाला लग्नाचा आहेर म्हणून देणार आहे.

ब०—पण त्याची कांहीं कल्पना तर द्याल ?

म०—हें एक पांढरं चूर्ण आहेः एकेक ढेंकूण आणि झुरळ पकडून त्याच्या तोंडांत याचा तोबरा दिलांत कीं तो प्राणी मेलाच पाहिजे—

ब०—नांव काय त्या चूर्णाचं ?

म०—बोरिक पावडर.

**ब०**—अस्सं ! चांगलाच चोरांचा बाजार आहे. व्यापारी कावा चांगला शिकले आहांत—बरं, आतां काय राहिलं बरं ?

**म०**—भरतवाक्य आणि आशिर्वाद ! आपली भगिनी माझ्या या मित्राला देण्याचा समारंभ !

**ब०**—अच्छा, मीही जरा तुमच्यासारखाच हौशी बनतों. अग सुभद्रा, माझी टोपी आण पाहूं—

(सुभद्रेला हात धरून घेऊन येतो. मधुसूदन धनंजयाला पुढें ढकलतो. बलराम दोघांचे हात संलग्न करतो.)

**ब०**—हा भगिनीचा कर तव करिं मीं धनंजया रे दिधला ।

इ. इ. इ.

---

# खून ?

( १ )

(दैनिक 'निकाल' ता. ९ एप्रि. १९३७)

## भयंकर मृत्यु

**पेडगांव ता. ६ एप्रिल १९३७**

(आमच्या खास बातमीदाराकडन)

**येथील एक नाणावलेले नागरिक व जुने जहागिरदार श्रीमंत दुर्वासराव रुद्राव जमदग्नि हे काल सकाळीं दहाच्या सुमारास एकाएकीं शिरच्छेद होऊन मरण पावले. या वज्राघातानें सबंध गांवांत खळबळ उडाली आहे. आत्महत्त्या हें मृत्यूचें कारण असावें असा तर्क आहे. पोलीसतपास चालू आहे.**

**म्हशीला गाढव**-(बगलवाडी ता. ४ एप्रिल)

(आमच्या बातमीदाराकडून) येथील एका म्हशीच्या पोटीं गाढव जन्माला आलें. हा प्रकार पाहून घाबरलेल्या गवळयाला 'ना. भि. ना. भि.' असें म्हणून गाढव लवकरच निजधामास गेलें. मरहूम गाढवाच्या कपाळावर जन्मतःच दुबोटी गंध लावलेलें होतें. हा चमत्कार पाहण्यास लाखों लोकांची गर्दी लोटत आहे.

**प्रचंड पाऊस**-जातेखुटा (आसाम) येथें एका तासांत ५०२ इंच पाऊस पडून समुद्रांतील बोटी हिमालयाच्या पायथ्याला लागण्याइतकें पाणी झालें. पावसाच्या मारानें लोकांची सरासरी उंचीदेखील एकेक फूट कमी झाल्याचें आढळून आलें. इ. इ. इ.

२

(दैनिक '**स्तुतिप्रकाश**' ता. १३।४।३७)

## जहागिरदाराच्या मृत्यूचें रहस्य!
## पेडगांव येथील क्षोभजनक प्रकार!
## शिरच्छेद, खून कीं आत्महत्त्या ?

पेडगांव ता. ११।४।३७.

येथील जहागिरदार जमदग्नि यांचा शिरच्छेद होऊन मृत्यु झाल्याला दोन

दिवस झाले. पोलिसांनीं हें प्रकरण ताब्यांत घेतलें आहे व मॅजिस्ट्रेट यांजपुढें जबान्या चालू आहेत. या प्रकरणीं मिळालेल्या माहितीवरून वेगवेगळे तर्क निघत आहेत. मयत इसम फार तामसी स्वभावाचे होते म्हणून ही आत्महत्या असावी, असें कोणी म्हणतात; मयतांची कन्या त्यांच्या वाड्यांतील शागीर्द कृष्णा कुलकर्णी याजबरोबर लग्न करण्याच्या विचारांत होती या माहितीनें या शंकेस पुष्टी मिळत आहे. आदल्याच रात्रीं प. वा. जमदग्नि यांनीं कन्येच्या संकल्पित विवाहाला तीव्र नापसंति दर्शविली होती व कृष्णा शागीर्दाला 'चाबकानें फोडून काढण्याचा' धाक दिला होता. 'मी मेल्यावर त्याच्याशीं लग्न कर' असे दिवंगत जहागिरदारांचे वैतागाचे शब्द आपल्या मुलीला उद्देशून होते. ते कोर्टाच्या पुराव्यांत दाखल करून घेतले आहेत.

शिरच्छेदाच्या प्रसंगीं हजर असलेला हुजऱ्या सोपाना बेपत्ता असल्यामुळें पोलीस त्याच्या तपासांत आहेत. त्यानेंच पोलिसांत वर्दी दिली. पण नंतर तो कोठें दिसला नाहीं.

३

(साप्ताहिक '**आरती**' ता. २०।४।३७)

पेडगांव येथील जहागिरदार जमदग्नि यांच्या खुनासंबंधीं त्यांच्याकडील शागीर्द कृष्णा कुलकर्णी यास अटक झाली आहे. कृष्णावर कै. दुर्वासराव यांची कन्या वेणू हिचें मन बसलें होतें, व कृष्णाशीं लग्न करण्याच्या तिच्या हेतूला वडिलांची सक्त हरकत होती. जहागिरदारांचा कांटा मार्गांतून दूर करण्यास कृष्णानें वेणूच्या प्रेरणेवरून त्यांचा शिरच्छेद केला असें पोलिसांचें मत असून वेणूसही पोलिसांनीं अटकेंत ठेवलें आहे.

दरम्यान शिरच्छेदाच्या वेळीं हजर असलेला हुजऱ्या सोपाना अजून बेपत्ताच आहे. पोलीस त्याच्या कसून शोधांत आहेत. कृष्णा कुलकर्ण्याच्या धाकानें तो पसार झाला असावा अशीहि एक कल्पना आहे, कारण या साक्षीदाराला नाहींसा करणें हें आरोपीला जरूरच होतें.

४

(दैनिक 'संभावित' ता. २५।४।३७)

## जमदग्नि खुनाचा खटला

### पेडगांवांत गंभीर वातावरण

### कृष्णा कुलकर्ण्याची जबानी– वेणूची कैफियत !

### आत्महत्येची कल्पना

(पेडगांव ता. २३।४।३७) सबंध गांवांत खळबळ उडवून देणारा जमदग्नि–खून खटला आज सुनावणीस निघाला. आरोपी कृष्णा हा बराच घाबरलेला दिसत होता. आरोपी नं. २ वेणू मात्र शान्त होती. सरकारी वकिलांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें तिनें न भितां व न गडबडतां दिलीं. कृष्णावर आपलें प्रेम असल्याचें तिनें कबूल केलें.

कृष्णा मात्र भेदरून गेला होता. 'दुध्याभोपळ्याचा डेख देखील भाजी चिरतांना नीट उडवितां येत नाहीं– मालकांचं डोकं कसं उडवीन मी ?' असें डोळ्यांत पाणी आणून तो म्हणाला.

दोन्ही आरोपींनीं गुन्हा नाकबूल केला आहे. मयताचें मरण डोळ्यानें पाहलेला साक्षीदार म्हणून हुजऱ्या सोपाना याचा तपास अजून चालू आहे. तथापि तो न सांपडला तरी सबळ हेतु (Motive) व घटनेचा पुरावा (Circumstantial evidence) यांच्या जोरावर आरोप शाबीत करण्याची सरकारी वकिलाची तयारी आहे असें दिसतें.

बचाव बाजूच्या वकिलांनीं आपल्या आरोपींचा गुन्हा साफ नाकबूल केला आहे. मुलीच्या संकल्पित लग्नानें वैतागून मयत जहागिरदारांनीं आत्महत्याच केली असावी, अशी शक्यता आरोपीच्या वकिलानें पुढें केली आहे. मुलीच्या मनसुब्याखेरीज आत्महत्त्येला आर्थिक स्थिति हेंही कारण असावें असें वकिलांनीं सुचविलें. कोर्टानें कै. वा. जमदग्नि यांचे हिशेब दाखल करण्याचा जहागिरदारांचे दिवाणजीस हुकूम दिला आहे.

आश्चर्याची गोष्ट ही कीं शिरच्छेद ज्यानें डोळ्यानें पाहिला तो सोपान्या हुजऱ्या अजून पोलिसांना सांपडत नाहीं.

५

दैनिक ' **वज्रमुष्टि** ' ३०।४।३७ )

**ताज्या तारा—**

जमदग्नि-खून खटल्यांत इतके दिवस परागंदा असलेला मरहूम जहागिरदारांचा हुजऱ्या सोपाना हा आज रोजीं पेडगांव मुक्कामींच सांपडला.

६

( साप्ताहिक **पेडगांव–समाचार** ता. ३० एप्रिल १९३७ )

जमदग्नि–खटल्याचा शेवटचा दिवस.

**अनपेक्षित निकाल–**

**हुजऱ्या सोपाना सांपडला !**

पेडगांव ता. ३० एप्रिलः–आज सुमारें महिनाभर साऱ्या गांवांत खळबळ उडवून देणारा सुप्रसिद्ध जमदग्नि-खून खटला आज अगदीं अनपेक्षित रीतीनें शेवटास गेला. फिर्यादी पक्षातर्फे पुराव्याचें हुकमी पान म्हणून ज्या सोपाना हुजऱ्याचा इतके दिवस शोध चालला होता तो अचानक आज दाखल झाला.

कोर्टाचें काम बरोबर साडेअकराला सुरू झालें. पहिल्यानें पोलीस जमादार, खंडेराव गेनू पाटोळे यांची साक्ष झाली. आपल्या साक्षींत त्यानें सांगितलें सकाळीं साडेआठ वाजतां नाक्यावरच्या हॉटेलांत चहा प्यायला जहागिरदारांच्या वाड्यावरून जात असतां संशयित मनुष्य सोपाना पांडू यास वाड्याच्या देवडीवर केर काढतांना आपण पाहिलें. सदर्हू इसमासाठीं सरकारी शोध चालू आहे हें माहीत असल्यावरून आपण तावडतोब घरीं जाऊन युनिफार्म चढवून येऊन सोपाना पांडू यास अटक करून चौकीवर नेलें. चौकीवर संशयित इसमानें स्टेटमेंट पोलिसापुढें करण्याचें नाकारलें व कोर्टापुढेंच काय तें सांगेन असा जबाब दिला.

यानंतर कोर्टापुढें सोपाना पांडू याला आणण्यांत आलें. ज्या माणसामुळें सर्व खटल्याचा निकाल बदलायचा संभव होता तो दोन पोलिसांच्यामध्यें कोर्टांत येतांच सर्वांची नजर त्याच्याकडे वळली. सोपाना पांडू हा किरकोळ अंगाचा, तुरळक मिशांचा व भाविक चेहऱ्याचा एक मनुष्य आहे. तो बिलकूल घाबरला

नव्हता. सरकारनें आपली साक्ष काढली या कल्पनेनें तो मनांतल्या मनांत खूष होता, पण त्यानें कोर्टाला अदबीदाखल चेहरा थोडा बावळटच ठेवला होता.

सरकारी वकिलाच्या चेहऱ्यावर 'हा पुराव्यावर शेवटचा शिक्का' असा भाव दिसत होता पण आरोपीच्या वकिलाच्या मुद्रेवर मात्र आशा दिसत होती. हा परागंदा साक्षीदार काय सांगतो याची कोणालाच कल्पना नव्हती. कारण तो सांपडला हें लोकांना कळल्यापासून तो अटकेंतच होता व दोन्ही वकिलांना त्याची भेट होऊन देखील 'कोर्टापुढें सांगेन' हें एकच उत्तर दोघांना मिळालें होतें. इतक्या कज्जाखटल्यांनीं आंबलेले कोर्टाचे शिरस्तेदार रा. कोटस्थाने–त्यांच्या चेहऱ्यावरही उत्कटतेची किंचित् छटा दिसत होती. कोर्टाचे शिपाई अदबीनें उभे होते. पोलिस शिपाई ('अटकेंतला इसम पळून जाण्याचा प्रयत्न करून आपणास त्याला पकडण्याची संधि मिळेल का' अशा चोरट्या आशेनें) सावध उभे होते. इतर वकील (व कांहीं अशील) आपापसांतली कुजबूज बंद करून जरा पुढेंच कलून बसले होते.

कोर्टानें एकदां तीक्ष्ण दृष्टीनें पिंजऱ्यांतील साक्षीदाराकडे पाहिलें. सोपाना पांडू यानें नाकासमोर निश्चल पाहण्याची युक्ति अंमलांत आणली होती. शपथ वगैरे झाल्यावर सरकारी वकील साक्षीदाराची सरतपासणी करण्यास उठले.

सरकारी वकील–तूं जहागिरदारांकडे हुजऱ्या आहेस हें खरें कां ?

सोपाना पांडू–जी.

स. वकील–तुझ्या मालकांची मान कापली गेली त्यावेळीं तूं तिथें होतास कां ?

सोपान–तर ! मीच चौकीवर वर्दी द्यायला धांवलों, नव्हं कां ?

स. वकील–मग इतक्या दिवस कुठें होतास–नाहींसा का झाला होतास ?

सो.–घोड्याच्या मागें गेलों होतों–(कोर्टात हंशा. न्यायाधीश चष्म्याच्या वरून सगळीकडे बघतात. शांतता.)

स. व.—ही थट्टामस्करीची वेळ नव्हे, तूं कोर्टांत उभा आहेस—

सो.—मग मी नव्हं म्हनतों काय ? घोड्याच्याच मागें गेलों होतों—

स. व.—कुठल्या घोड्याच्या ?

सो.—मालकांनीं आदल्याच दिवशीं नवा घोडा घेतला होता—मोठं खस्याळ जनावर, आणीपर्यंत गांवाला तीन चकरा दौडवलंन मालकाला त्यानं. घोडा घरीं आणून मालक म्हनले, 'सोपान्या, घोड्यावर ध्यान ठेव. तो जर सुटला तर चाबकानं फोडीन.' मी म्हनालों, 'जी धनी—

स. व.—तुझी कुळकथा नको आहे इथं, घोड्याच्या मागें कुठच्या गेला होतास तें सांग—

सो.—हाच तो घोडा ! मालकांना अपघात झाला तेव्हां मी थेट चौकीकडे धावलों. जहागिरदारांना इजा झाली म्हणून लोकं गोळा व्हायला लागलीं, तेवढ्यांत तो घोडा कसा सुटला कोण जाणे. चौकीवरून जो मी परत येतों आहे तों रस्त्यांतून माझ्या बाजूनंच जोरांत गेला ना तो ! मीं म्हटलं, !' गा ह्यो घोडा थेट मालकांच्या घोड्यावानीच दिसतुया. वाड्यांत येऊन पाहिलं-घोडा-नाहीं—मग धांवलों ना त्या घोड्याच्या मागें—नाहीं तर मालक म्हनले होते चाबकानं फोडीन म्हणून—

स. व.—अरे पण मालक घरांत मरून पडलेले असतां ?

सो.—( एकदम प्रकाश पडून ) अरेच्या—तें माझ्या ध्यानांतच राहिलें नाहीं बघा मालकाच्या धाकापुढें—(कोर्टांत हंशा.)

स. व.-पण इतकं दिवस कुठे होतास !

सो.-त्या घोड्यानं मला रानोमाळ हिंडवलंन. तीन तालुक्यांतून मीं त्याचा पाठलाग केला-

स. व.—मग कुठें सांपडला तो तुला?

सो.—'घोडा गेला' म्हणून परत आलों आणि पाहिलं तर घोडा आपल्या जाग्यावर येऊन उभा !

स. ब.-बरं; मालकांची मुंडी उडाली तेव्हां तूं कुठें होतास ?

सो.—तिथेंच.

स. व.—( एकदम ) तूंच खून केलास कां ?

सो.—साहेब, मी तरवार धरली आहे कुठें जन्मांत कधीं ? इतकं सफाई काम आपल्याच्यानं नसतं झालं !

स. व.—मग तूं काय करीत होतास ?

सो.—मी ओटीवरच्या भिंती झटकत होतों.

स. व.—जहागिरदार काय करीत होते ?

सो.—ते तरवार साफ करीत होते—

स. व.—ते कशासाठीं ?

सो.—दोनचार तरवारी घरांत पडल्या होत्या गंजत—मालक कुठल्याशा फिल्म कंपनीला विकणार होते, त्या सगळ्या देवघराच्या अंधारांतून त्यांना काढून दिल्या मींच. देवघरापुढें ते बसले होते—

स. व.—कृष्णा शागीर्द तेव्हां कुठें होता ?

सो.—मला—मला माहिती नाहीं—बसला असेल कुठं विडी फुंकीत ! (हंशा. कोर्टानें कोर्ट रिकामें करण्याची धमकी दिली.)

स. व.—वेणूबाई कुठं होत्या ?

सो.—मला माहिती नाहीं.

स. व.—कृष्णा व वेणूबाई अंधेऱ्या देवघरांत असतीं तर तुला कळलें असतें कां ?

सो.—कामांत लक्ष असल्यावर नसतं कळलं—

स. व.—मालकांचें शीर उतरलें हें तुला केव्हां कळलें ?

सो.—'खिस्स !' असं झालं नि तरवार पडल्याचा आवाज आला—माझी पाठ होती मालकांकडे तेव्हां. मालक रागांत असले म्हणजे मी नेहमीं त्यांच्याकडे पाठ करूनच काम करतों. त्या दिवशीं ते आधींच चिडले होते—

स. व.—कां ? मुलीवर कीं कृष्णावर ?

सो.—त्यांच्यावर नाहीं तेव्हां. एक माशी सारखी त्यांच्या मानेवर बसून चावत होती म्हणून कावले होते—

स. व.—मरून पडायच्या आधीं ते तुला कांहीं बोलले कां ?

सो.—सकाळीं साताला म्हणाले होते कीं 'भिंती साफ कर नाहीं तर उभा जाळीन हरामखोरा' म्हणून—

स. व.—अगदीं तूं वळून पाहायच्या आधीं कांहीं म्हणाले—

सो.—मला कांहीं नाहीं म्हणाले—

स. व.—दुसऱ्या कोणाला ?

सो.–आपल्याशींच पुटपुटले कांहीं तरी–

स. व.–तूं ऐकलेस ते शब्द ?

सो.–ऐकले–पण आतां–आठवत नाहीं.

सरकारी वकीलांनीं आपल्याला जास्त कांहीं विचारायचें नाहीं असें कोर्टाला सांगितलें व ते खालीं बसले.

बचावाचे वकील फेरतपासणीस उठले.

वकील–जहागिरदार जिवाला कंटाळून जीव देण्याच्या, मरण्याच्या अशा गोष्टी बोलत होते का कधीं ?

सो.–स्वतः मरण्याच्या नाहीं–पण आम्हां चाकरांना जिवे मारण्याच्या गोष्टी ते नेहमीं बोलायचे.

व.–देवघराशीं ही गोष्ट झाली. देवीच्या पायावर त्यांनीं मस्तक वाहिलें हें खरें कीं नाहीं ?

सो.–भलतेंच ! आज आठबारा वर्षांत आईसाहेब गेल्यापासून देवी देवघरांतून काढून माळ्यावर टाकली होती सरकारनीं–देवघरांत ते जीन-खोगीर ठेवीत असत.

व.–बरं, मरणाआधीं ते कांहींसे पुटपुटले ना ? तें आठव–

साक्षीदार मयताचे शेवटचे उद्गार आठवीत असतों कोर्टात अगदीं टांचणी पडण्याचा आवाज येण्याइतकी शांतता होती. त्या आठवणाऱ्या शब्दांनीं दोन आरोपी–जिवांचा सोक्षमोक्ष लागणार होता. जहागिरदारांच्या मृत्यूच्या खऱ्या कारणाचा छडा लागणार होता–मृताची मनःस्थिति कळणार होती.

सो.–(एकदम) आठवलं ! मालक फारच संतापले होते. ते बरोबरच म्हणाले–

उत्कंठतेची परमावधी झाली. स्वतः कोर्टानेंच विचारलें–

काय म्हणाले ? काय म्हणाले ते ?

सो.–ते म्हणाले–" अरे ! काय शिंचं चावतंय् सारखं !– " उचलली तरवार नि–

———

# एका इजारीचें आत्मवृत्त

मला तो दिवस चांगला आठवतो आहे. रस्त्यांत एक मोटार-ड्रायव्हर ओळखीचा भेटल्यामुळें, ऑफिसांतून येतांना भाजी न घेतां व वहाणेची तुटलेली वादी न शिवतांच मोटारींतून वाडींत येऊन पोहोंचलों होतों. त्यामुळें श्रीझावबा राममंदिरांत दर्शन घेण्याचें आणि येतांना जानवी जोड व फुलवाती आणण्याचेंहि अजिबात राहिलें होतें, आणि मोटारींतून येण्याच्या आनंदावर ' आंतून ' चांगलाच उतारा मिळाला होता. असो.

ड्रायव्हर मित्रानें दिलेली एक कडक विडी ओढून मोठ्या आरामांत मी मागें टेकलों होतों व पाय पुढें पसरले होते. एका गर्दीच्या रस्त्याला आमच्यापुढें म्युनिसिपालिटीची कचऱ्याची एक अजस्र लॉरी होती व वहातुकीच्या गर्दीमुळें आम्ही बराच वेळ त्या लॉरीमागें होतों. कचऱ्याच्या ढिगावरून बाहेर मागच्या बाजूला एक लक्तर लोंबत होतें. त्याच्यावर अनेक रंग असून शस्त्रक्रियादि इतरही संस्कार झाल्याचे दिसत होतें. त्या लक्तराचे स्वतंत्रपणें शिवलेले दोन भाग मुळांतूनच विभक्त झालेले दिसत होते. बराच वेळ जबरदस्तीनें तिकडे पहावें लागल्यामुळें मला सुरवातीला आलेली शंका खरी ठरली—ही एकेकाळीं एकाद्या द्विपाद प्राण्याच्या कटिदक्षिण भागाचें यथाशक्ति संरक्षण करणारी—

" होय, मी एकेकाळची तुमान आहें, " तें लक्तर खिन्नपणें हांसल्याप्रमाणें फडफडून म्हणालें. " पण तुमानीप्रमाणेंच लेंगा, पैजामा, झोळणा, सुतना, इजार या अवस्थांपासून तंगतुमान, चुडीदार पैजमा, सुरवार, ब्रीचेस् जोधपूर्स, पँट, पाटलोण, शॉर्ट येथपर्यंत माझे आश्रम झालेले आहेत. कारण माझा मालक जरा—हा होता. शॉर्ट किंवा लांडी या माझ्या अखेरच्या अवतारांनतरही, व्यायामाची चड्डी आणि मग लंगोट्या येथपर्यंत माझी विटंबना करण्याचा त्याचा दुष्ट विचार होता. पण मी

अगदींच जर्जर आणि गलितांग झाल्यामुळें माझ्याकडे त्यानें किंचित् दुर्लक्ष केलें व त्याच्या बायकोनें मुकाट्यानें मला कचऱ्यांत फेंकलें. त्याचें लक्ष असतें तर त्यानें तेंहि तिला करूं दिलें नसतें; सोधणें व नंतर पोतेरें इतका माझा अधःपात करून मग गळणारी मोरी थांबविण्यास बोळे म्हणून माझ्या चिंध्या त्या बहाद्दरानें वापरल्या असत्या-पण सगळें कांहीं पहिल्यापासूनच सांगतें. तुम्ही पतितांचे मोठे कनवाळू दिसतां, माझी करुण कहाणी ऐकून तुमची सहानुभूति तरी मला मिळेल!......"

मी वर्णानें आणि संस्कारानें हिंदूच आहे, [त्या तुमानीनें सुरुवात केली] व हालअपेष्टांचें व्रत न कुरकुरतां—म्हणजे न टरकतां—सहन केल्यामुळें मला पूर्वजन्मांचीहि आठवण आहे. कपास, या माझ्या आठवणींतल्या पहिल्या जन्मापासून मला चमत्कारिक माणसांचाच अनुभव आहे. माझें बोंड तोडायला आलेला काळा पण गोंडस हात एकाएकीं हिसकला जाऊन खिदीखिदी हंसण्याचे दोन आवाज कसे ऐकूं आले आणि त्या दिवशीं मला कुणी न तोडतां दुसऱ्या दिवशीं एका रांकट हातानें कसें ओरबडलें तें मला अजून आठवत आहे. सरकी टाकण्याच्या अवस्थेंतही मला बायकांच्या थट्टामस्करीचे आवाज ऐकूं आले व दाबलेल्या गठ्ठयांत एक दोन महिने काढीत असतां त्या मंजुळ आवाजांची आठवण करून मी कशी तरी कालक्रमणा करीत होतें. गठ्ठा फुटून बाहेर पडण्याचा माझा दिवस फार धामधुमीचा गेला. गठ्ठयांतून बाहेर पडतें न पडतें तोंच पिंजून माझे पेळू नि सूतदेखील झालें; पण सुदैवानें उभ्या धाग्याच्या नळकांड्यावर गुंडाळली गेलें म्हणून थोडी विश्रांति तरी मिळाली. माझा ज्या ज्या माणसांशीं संबंध आला त्यांचीं तोंडेंदेखील नीटशीं पाहायाला मिळालीं नाहींत. नळकांड्याला विळखा घालून मी पडलें होतें तो गिरणीचा भाग मोठा शान्त व एका बाजूला होता. माझ्या आसपास 'जरा खाज़गी बोलण्यासाठीं' आलेल्या माणसांच्या बारीक व जाड आवाजांची कुजबूज सारखी ऐकूं यायची. एकाएकीं एके दिवशीं मीं कापड बनलें; पण पूर्वसुकृत म्हणायचें. कापडांतसुद्धां मला ब्राह्मणजात म्हणजे धुवट पांढरा रंग मिळाला. 'पुळचट' आणि 'पोषाखी' म्हणून वखारींत खाकी, काळ्या, जाड्याभरड्या

कापडांच्या ताक्यांनीं माझी खूप चेष्टा केली, पण एकदां कपडा बनलें कीं यांचा संपर्कही होणार नाहीं या समाधानांत मीं वखारींत दिवस काढले.

किरकोळ विक्रीच्या कापड-दुकानांत दाखल झालें तेव्हां कुठें खरी मी 'समाजांत' आलें. आतांपासूनच मला शुद्ध भाषा हळूंच बोलणाऱ्या अशक्त व बावळट लोकांचा सहवास सुरू झाला. एके दिवशीं एक मनुष्य दुकानांत आला.

'हें पहा, स्वस्त पण मजबूत, साधं पण दिसायला चांगलं असं, फार पातळ नाहीं फार जाड नाहीं, आणि पन्ह्यांत भावाच्या मानानं जरा जास्तच भरेल असं पांढरं कापड एका तुमानीचं द्या.'

"क्षणार्धांत माझा ताका पुढें झाला. त्या माणसानें चष्म्यांतून मला बरेंच न्याहाळलें, माझी कड चिमटींत धरून पानाला चुना लावल्यासारखी खेंचली, एके ठिकाणीं जरा घांसून पाहिलें, नंतर दोन्ही हातांनीं दोनतीनदां 'फट् फट्' करून माझी ताकद अजमावली.

'कां हो, खळ दिसते आहे—'

'छे, छे, धुवट कापड आहे अगदीं, तलम–'

'कामाला उपयोगी का?'

'पायजम्याचंच चालू कापड...'

'कांहो, पायजमा, पण पॅन्टसारखा शिवला तर किती वार लागेल?'

'लागेल तीन सव्वातीन वार–'

'छे, छे, मीं अडीच पावणेतीन वारांत तुमान शिवून घेतली आहे.'

'तीन वार घ्या—'

'नाहीं नाहीं, पावणेतीन वार द्या–हो पण भाव काय?

'नऊ आणे—'

'कसचे नऊ आणे–अडनेडा हिशोब, आठ आणे–'

'फिक्स्ड् रेट आहे आमच्याकडे–'

'बरं साडेआठ आणे? नाहीं? बरं, द्या तर मग—'

माझा तुकडा फाडणाऱ्या त्या कात्रीच्या वारानें माझी या गृहस्थाबरोबरची साडेसाती सुरू केली. मी एकंदर साडेसात महिने त्याच्या-जवळ होतें. विजारीच्या विश्वांत महिने वर्षांसारखे जातात ! त्या माझ्या मालकाचा कापडदुकानांतला संवाद व नंतर त्यानें शिंप्याला दिलेल्य गुंतागुंतीच्या सूचना, यांवरून माझ्या नशिबीं काय आहे ही कल्पना मला तेव्हांच आली.

शिंप्यांच्या हातांतून पुरी होऊन कपडा किंवा पेहराव या रूपांत मी अवतीर्ण झालें, तेव्हां इतर कपड्यांच्यापुढें माझी मलाच लाज वाटूं लागली. मालकाच्या हुकुमाअन्वयें त्या शिंप्यानें माझा अवतार अगदीं भयंकर बनवला होता. माझ्या वरच्या कडांना खांदेपट्ट्यांसाठीं गुंड्या होत्या. व भोंवतीं कमरपट्ट्यासाठीं कापडी कड्या होत्या. मला नाडीची पन्हळहि होती व बटणांची पट्टीही होती. मध्यभागीं कट्यारी-सारखा चांदवाही होता व दोन्ही बाजूंना खिसेही होते—पृष्ठभागीं तिसरा चोरखिसा होता तो वेगळाच. बाह्यांच्या खालच्या कडा दुमडलेल्या होत्या. सुधी राहील तोंवर पाटलोण नाहीं तर पैजामा, असें मालकाचें सुरवातीचें धोरण होतें.

पाटलोण या नात्यानें माझी नालायकी मालकाला एकदोन दिवसांतच पटली. पहिल्यानें त्यानें खांदेपट्ट्यांनीं अलगद तरंगत ठेवल्यासारखी मला वापरून पाहिलें, पण कमरेशीं मी अगदीं फटकून वागल्यामुळें आपली ढिलाई त्याच्या लौकरच ध्यानांत आली. मग त्यानें कांतडी पट्ट्याच्या दाबानें कमरेशीं माझें संघटन करण्याचा उपाय केला; पण या वेळीं माझ्या दुभंगलेल्या दक्षिणविभागांनीं बंड पुकारलें. समोरच्या धारेचें [ क्रीजचें ] असिधाराव्रत माझ्या झुळझुळीत कापडाला बिलकूल मानवलें नाहीं. अमुकच तऱ्हेची घडी असावी या सनातनी तत्त्वाला झुगारून देऊन ते पाय बेछूट नवमतवादी बनले. वाऱ्याच्या प्रत्येक झुळुकीबरोबर ते फडफडूं लागले. त्यांच्या टोंकांनीं तर आपला उच्च वर्ण विसरून दुमडलेली घडी सोडून खालच्या हरिजनवर्गाच्या बुटांशीं गुजगोष्टी कर-ण्यास सुरुवात केली.

तशांत धोब्याकडून—माझ्या मालकाचा धोबी तो !—आल्यावर माझ्या घड्या समोर येऊन सुताराच्या पट्टीसारख्या मिटण्याऐवजीं बाजूला जाऊन एखाद्या उघड्या दरवाजासारख्या रुंदीचें प्रामाणिक प्रदर्शन करूं लागल्या. तेव्हांच मालकानें पाटलोण या सरकारी दर्जापासून पदभ्रष्ट करून मला पैजाम्याच्या खानगी नोकरींत टाकलें.

आतां माझ्या मानगुटीं नाडा बसला; पण सुदैवानें दोनतीन धुण्यांतच तो मऊ आल्यामुळें माझें व त्याचें बरें जमलें. पैजामा, तुमान किंवा इजार या स्थितींत मीं बराच दीर्घ काल घालवला व त्यामुळेंच ‘ इजार ’ या नांवानें ओळखलें जाण्यांत मला मोठा अभिमान वाटतो. [ इजारदार नामक मुलकी हुद्दा माझ्यामुळेंच निर्माण झाला हें मी येथें नम्रपणें नमूद करतें. ] मला व नाड्याला त्रास होता त्या बटणाच्या पट्टीचाच काय तो. आतां नुसत्या शोभेसाठीं उरलेल्या माझ्या कडेच्या व त्या पट्टीच्या बटणांनीं आमच्याशीं मोठा ताठरपणा धरला होता. नाड्याला तीं एका वशिल्यानें लागलेल्या नोकरासारखा तुच्छ लेखीत, व माझें अवतारकार्य—मालकांचें लज्जा रक्षण—हें केवळ आमच्या-वर अवलंबून आहे, अशी बढाई तीं बटणें मारूं लागलीं.

कर्मधर्मसंयोगानें त्यांची व्यवस्था मालकानें परस्परच लावली. आप-ल्याच ऐटींत असणारीं तीं बटणें आपल्या कामांत कुचराई करूं लागलीं व वरचीं निरुपयोगी बटणें तर मालकाला चांगलींच बोचूं लागलीं. एके दिवशीं अगदीं फजितीचा प्रसंग आलेला केवळ आमच्यावर प्रेमाची पांखर ठेवणाऱ्या मालकाच्या सदऱ्यानें बचावला; साहजीकच मालकानें चिडून सगळीं बटणें उडवलीं व जरूर तेथें मशीनच्या टिपा मारून घेतल्या. यामुळें आमचा तर नैतिक विजय झालाच, पण स्वैरपणें दोन दिशेला वाहणाऱ्या माझ्या पायांना एकेठिकाणीं जखडून ठेवायला त्या शिवणींची मला फार मदत झाली.

वर सांगितलेल्या माझ्या भोंवतींभोंवतीं गुलगुल गोष्टी सांगणाऱ्या मालकाच्या सद्याची आणि माझी चांगलीच गट्टी जमली. तोहि बिचारा मऊपणामुळें ‘डिग्रेड’ होऊन शर्टचा सदरा झाला होता. मीं पॅन्ट असतांना

दोन दिवस त्याचा सांभाळ केला होता. ती ओळख ठेवून त्यानें इमानीपणानें आतां इजार झालेल्या माझ्यावर मायेचें पांघरूण ठेवलें होतें. त्या सद्ऱ्या-बद्दलच्या सुखस्वप्नांत मी दंग असे. जर कधीं मालकाला एकदम एखादा मेकॅनिक होण्याची लहर आली तर एकसंधी तुमान—कुडत्यांत ओव्हरॉल-मध्यें आमचें मधुर मीलन झालें असतें, पवित्र शिवणविधीनें आम्ही एक-मेकांशीं संलग्न झालों असतों—पण इतकें कुठलें माझें नशीब? असें भाग्य एखाद्या निळयाजांभळ्या जाड्याभरड्या कापडाच्याच तुमानकुडत्यांना लाभायचें!

माझा इमानी नाडा आतां म्हातारा होऊं लागला होता. शिवाय मालकाचाही त्याला भारी कांच असायचा; त्या नाड्याच्या सहनशक्तीवर फार ताण पडायचा. शेवटीं एके दिवशीं आमचा मालक 'खो खो खो' म्हणून मोठ्यानें हंसूं लागतांच—पर्वणीच म्हणायची ही एक!—एकाएकीं नाड्याच्या आयुष्याची दोरी तुटली! मोठा कठीण प्रसंग तो; बेछूट हंशाच्या भरांत एकदम इजारीचा नाडा—विशेषतः मालक उभा असतांना—तुटणें हें त्वरित गांभिर्यासाठीं एक अमोघ अस्त्र आहे. माझ्या त्या नत-द्रष्ट मालकाची त्या क्षणाला मला देखील दया आली. विमानाचें इंजिन एकाएकीं हवेंत बंद पडावें, पडद्यावरची फिल्म एकदम निश्चल चित्र म्हणून दिसावी, किंवा खवळलेल्या दर्याचें क्षणार्धांत गोठून बर्फ बनावें तशी माझ्या मालकाची मुद्रा त्या वेळीं झाली. अशा प्रसंगीं कराव्या लागणाऱ्या विविक्षित अंगविक्षेपाचा त्यानें जागतिक विक्रम केला याबद्दल मला मुळींच शंका नाहीं.

नाडयाच्या जागीं एक चिवट व कुरेंबाज नाडी आली. तीही स्त्री असल्यामुळें माझें नि तिचें अर्थातच पटलें नाहीं. आमचें घर्षण माल-काला देखील जाणवलें!

मला वापरण्यांत तसें पाहिलें तर मालक अगदीं पाय राखून वागत असे. धुण्यानें कपडे फाटतात असें त्याचें मत असल्यामुळें, मला स्नान दोनतीन दिवसांनीं एकदां घडत असे; त्याचप्रमाणें कुठें व कसें बसायचें या बाबतींत त्याला पात्रापात्र विचार नसल्यामुळें हळदीच्या डागांपासून

शाईच्या ठिपक्यांपर्यंत त्याच्या घरांतील (-व बाहेरील ) सर्व बैठकींची नोंद माझ्याजवळ होती. दोनदोन महिन्यांनीं एकदां धोब्याकडून आल्यावर कांहीं दिवस मात्र माझें यश धवल राहात असे; एरवीं 'मालकानें मला बिलकुल यश दिलें नाहीं' असें एखाद्या बेकार सिनेमा नटाप्रमाणें सांगण्यास मला कांहीं हरकत नाहीं. 'माणसाची परीक्षा बैठकीवरून होते' या इंग्रजी म्हणीची सत्यता माझ्याइतकी कोणालाही पटली नसेल. माझ्या मालकाला स्वैपाकघरांतील पाट, बाहेरची सत्रंजी, कचेरींतली खुर्ची आणि चौपाटीची वाळू या मुख्य बैठकी होत्या, त्यांची मला संवय झाली होती; पण ही स्वारी अन्यत्र जागा मिळेल तिथें, 'बसा म्हटलें कीं लवंडले' या कोटींतली असल्यामुळें, सृष्टीच्या इतर विविध रंगांची छाप माझ्यावर नेहमीं पडत होती.

माझा पांढरपेशा, समाजांतील त्या वर्गाप्रमाणेंच पूर्वीइतका निर्मळ राहिला नाहीं, हें कटु सत्य मालकाला हळूं हळूं पटूं लागलें व शिल्लक टाकलेल्या पैशांनीं जमीन घेऊन लौकरच पस्तावलेल्या व कातावलेल्या माणसाप्रमाणें तो माझ्यावर वेगवेगळे शास्त्रीय प्रयोग करूं लागला. शास्त्रीय दृष्टि असलेला मनुष्य इजारीवर देखील प्रयोग करूं शकतो हें मला आतां पटलें. व नशिबावर हवाला ठेवून येईल तें पाहायला मी तयार झालें.

पहिल्यानें नैसर्गिक हिंदूप्रवृत्तीप्रमाणें त्यानें मला फिक्का बदामी रंग दिला; पण त्या रंगानें त्याच्या कारकुनीचे डाग लोपेनात, म्हणून त्यानें मला निळींत बुडवलें; पण आतां माझें 'कामगार' स्वरूप त्याच्या कारकुनी वृत्तीला खपेना, तेव्हां सर्वभक्षक अशा खाकी रंगांत माझ्यांतलें सगळें काळेंबेरें, बरें वाईट सामावून टाकण्याची युक्ति त्यानें काढली.

'खाकी रंगाची तुमान' ही सर्वस्वीं विसंगत कल्पना अमलांत आणल्यानें त्याच्या मनाला तें जास्तच डांचूं लागलें. खाकी पाटलोण म्हणावी तर कचेरींतला शिपाई आठवायचा; खाकी तुमान म्हटली तर श्रमजीवी दलितवर्ग डोळ्यांपुढें उभा राहायचा! माझ्या मालकाला

( कोणत्याशा मित्राच्या मित्राकडून मिळवून आणलेल्या पासावर ) मुंबईचे देशी बोलपट पाहायची खोड होती. फिरोज मूव्हिटोनचा ' वर-दे-झकत् ' हा वीर-रसपूर्ण लढाऊ रजवाडी बोलपट पाहिल्यावर त्याच्या वीरश्रीचा घाव पहिल्यानें माझ्यावर पडला. गुडघ्याखालचे माझे पाय निमुळते करून त्यानें मला सुरवारीच्या पतितवर्गांत ढकललें; मला जोधपूर्स, ब्रीचेस वगैरे नांवांनीं गौरवून त्यानें कांही दिवस दिवेलागणीनंतर पेहरण्याचा प्रयत्न केला; पण एका स्टुडिओवाल्यानें त्याला ' एक्स्ट्रा ' समजून कंपनीचा पोषाख गांवांत वापरण्याबद्दल दम भरल्यामुळें माझ्या या कुचंबणेचा शेवट झाला.

आतां गुडघ्याखालचे माझे पाय छाटून त्यानें मला लांडी बनविलें. मळखोर घरकाम करतांना, बायकोच्या मेहनतीवर देखरेख करतांना, एकदां खोली रंगवतांना, पुढेंपुढें झोंपतांना, एकदां प्रवासांत, नंतर पाटलोणीच्या आंत, व अखेर तेल माखून स्नान करतांना असा त्यानें माझा पुरा उपयोग करून घेतला. माझ्या मुख्य शिवणी इमानी राहिल्यामुळेंच अर्थात् माझ्या हातून येवढें कार्य झालें.

मालकाची म्हातारी खुर्ची माझा मोठा मत्सर करीत असे. अखेरीस एके दिवशीं तिनें आपल्या खिळ्याचें नख माझ्या नरडीला लावलें ! तेव्हांपासून माझी तब्येत जी खालावली ती कायमचीच. धागेदोरे पुष्कळ केले, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. आयुष्याची उभी वाट मी मालकाच्या पायांनीं चालले होते, ते माझ्यामुळेंच उघडे पडायला लागलेले पाहून मला खेद झाला; त्याचप्रमाणें माझे सर्व जुने रंग आठवणी सांगणाऱ्या म्हाताऱ्यानें उडविलेल्या जुन्या रंगासारखे अंगावर ठिकठिकाणीं उठून दिसूं लागले. शेवटीं मालकाचें दुर्लक्ष झालें व मालकिणीनें मला असें पेन्शनींत काढलें.

इजारीला चित्रपटाप्रमाणेंच ' पकड पाहिजे ' हा माझ्या आयुष्याचा निष्कर्ष मीं काढला आहे. कथानकाला ' पकड नाहीं ' म्हणून लब्धप्रतिष्ठितपणें लेखकाला सांगणारे चित्रपट—कारखानदार जरी नुसती स्वतःच्या तुमानीची पकड सांभाळतील तरी त्यांच्या डबघाईस आलेल्या

कंपन्या जगूं शकतील. भारतवर्षांतल्या कोट्यवधि पुरुषांच्या [ व स्त्रियांच्या ] अंगांवर खेळणाऱ्या माझ्या भगिनींना माझा एकच संदेश आहे कीं, 'भोंगळ लेंगा होऊन एक वर्ष जगण्यापेक्षां आखाड्याची चड्डी होऊन एक तास जगणें बरें...'

\+ + +

बोलतां बोलतां ती जीर्ण तुमान गोष्टिवेल्हाळ माणसाप्रमाणें अगदीं रंगांत येऊन आमच्या गाडीच्या नाकावर येऊन बसली. त्याच वेळीं माझ्या ड्रायव्हर मित्रानें पुढची गाडी हालल्यामुळें आपलेंहि एंजिन सुरू केलें. इतक्यांत त्याचें लक्ष त्या इजारीकडे गेलें.

'×...! ×—! ×××! ' तो आश्चर्यानें म्हणाला. 'हें सालं पटकूर कुठून आलं इकडे ? थांबा हं ! उतरून काढून टाकतों.'

तो तसें करणार इतक्यांत बाजूनें जाणारा एक मनुष्य म्हणाला,

'अहो, टाकून कशाला देतां ? गाडी पुसायला उपयोगी पडेल–'

'माझे मालक !' म्हणून उन्मादिनीसारखें विकट हास्य करून ती इजार जोराच्या वाऱ्याबरोबर फडफडत उडून गेली.

———

# काळजाचा विकार

## – १ –

[ संध्याकाळचे सहा वाजण्याची वेळ. केशव पोषाख करीत असावा असे आवाज येत आहेत. कपड्यांना ब्रश करण्याचे आवाज, रुमालावर सेंटचे फवारे उडविण्याचे आवाज, केसावर फणी फिरवितांना ती पडल्याचा आवाज ( व केशवाचा चिडून 'ओ ब्लास्ट !' असा उद्गार ) पोषाख चालू असतां केशव कांहींतरी गाणें गुणगुणत आहे.

**माधव**–(मधेंच खोलीबाहेरून) केशव ! आर् यू रेडी ? ( दार उघडून खोलींत येऊन ) चल, वेळ झाली–हें काय, अजून तुझे कपडेही झाले नाहींत ! आटप लौकर, नाहीं तर गर्दी होईल फार–तिकिटं मिळणार नाहींत–हरी अप् !

**केशव**-झालंच–हा एवढा कोट घातला ( अंगांत चढवीत ) कीं–

**माधव**–नवा शिवलास वाटतं ?

**केशव**–हं ऽऽ आजच आला पिएट्रोकडून–हं चल–पण अरे ! पॅन्ट न घालतांच येत होतों ! थांब हं, आतां हे बूट घातले कीं–इन् ए जिफी–च् च् च् ! आतां बूट सांपडत नाहींत–

**माधव**–सांपडत नाहींत ? त्या कोपऱ्यांत तर तीनचार डझन बूट दिसताहेत–

**केशव**–ईडियट ! थिएटरवर जायचं आहे आपल्याला, या सूटला शोभेल असा बूट एक तरी आहे का त्यांत ? ( ओरडून ) फ्रान्सिस !

[ आंतून आवाज 'जी साब' फ्रान्सिस येतो. ]

**केशव**–काळा बूट कुठं आहे ? आण लौकर–

**फ्रान्सिस**–पॉलिश करूक नेला होता हा घे सायबा—[ कपडा मारून पुसून बूट ठेवल्यांचा आवाज ]

**माधव**–हंऽऽऽऽ–हे–सिनेमाचे जोडे काय ? अस्सं, अन् कायरे, खायचे जोडे कुठं आहेत–म्हणजे खाण्याच्या वेळचे !

**केशव**–हं ! [ वांकून लेसेस बांधीत असतां ] कर बुवा टिंगल !

**माधव**–टिंगल ? श्रीमंतीची टिंगल कधीं होते ? श्रीमंतीचं–'कौतुक', टिंगल गरिबीची–

**केशव**–[ ओरडतो ] आ ऽऽऽऽऽऽऽऽऽऽऽ ! [कळवळून उठून उभा राहतो, व छातीखालीं उजव्या बाजूला दाबून धरतो– ]

**माधव**–( चपापून उठून ) कायरे, काय झालं ? ( त्याच्या-जवळ जातो )

**केशव**–( धांपा टाकीत ) एकदम कांहीं तरी भयंकर- चमक आली –या इथं—

**माधव**–( सचिन्त मुद्रेनें हळू ) कुठेरे ? या बाजूला कोट काढ पाहूं–

**केशव**–[ कोट काढून ] हं या उजव्या अंगाला, बरगडीच्या खालीं–हार्ट–डिसीझ तर नव्हे हा ?

**माधव**–वेड्या ! हार्ट इकडे कुठं आलं.

**केशव**–मग ?

**माधव**–( आठवीत ) अंऽऽऽ–तें बरोबर पोटाच्यावर छातीच्या मध्यभागीं येतं–

**केशव**–कशावरून ?

**माधव**–अरे, बंदुकीच्या गोळीचा नेम बरोबर–कुठं बरं ?– छातीच्या सेंटरला नाहीं का धरीत ?

**केशव**–[ गोंधळून ] बरं तें जाऊं दे–मग हा हार्ट–डिसीझ नाहीं ?

**माधव**–शक्यच नाहीं–हार्ट त्या बाजूलाच नाहीं–आणि पुन्हां, हार्ट–डिसीझ तुला होणं शक्य नाहीं–तूं श्रीमंत आहेस ?

**केशव**–च् च् च् !

**माधव**–कारे वाईट कसलं वाटलं इतकं ?

**केशव**–[ अर्धवट स्वतःशीं ] काळजाचा विकार होऊन मरायचा चान्स नाहीं—

**माधव**–हें वाईट वाटतं आहे होय तुला ?

**केशव**–हार्ट–डिसीझ-तडकाफडकी मरण–वर्तमानपत्रांत नांव ! कित्तीतरी मोठे लोक छातींत कळ येऊन मरतात—

**माधव**–खरंच, अरेरे, मोठेपणाचा एक चान्स गमावला खरा ! बरं, कारे, कळ कशी आली ?

**केशव**–जोरांत–

**माधव**–अरे तसं नाहीं, कोणत्या स्थितींत, काय करतांना ?

**केशव**–याच स्थितींत तुझ्याशीं बोलतांना—

**माधव**–तूं कुठं होतास ?

**केशव**–घरीं—

**माधव**–च् च् च् ! अरे, कुठं म्हणजे या खोलींत कुठं—

**कशव**–त्या खुर्चीवर–हो, आठवलं, बुटाच्या लेसेस बांधीत होतों–

**माधव**–पुन्हां तसाच बसून तसाच वांक पाहूं.

**केशव**–नको नको.

**माधव**–घाबरूं नको, मी आहे—

**कशव**–पण–

**माधव**–[ ओरडून ] **वाक**–( केशव तोच अगविक्षेप पुन्हां करतो)

**केशव**–[ उठून आश्चर्यानें ] अरे, या वेळेला कांहींच झालं नाहीं !

**माधव**–पुन्हां कर पाहूं—

[ केशव पुन्हां करतो ]

**केशव**–आतांही कांहीं नाहीं !

**माधव**–आणखी एकदां–

**केशव**–बस्स् ! बनवतोस काय मला ?

**माधव**–[ गंभीरपणें ] ए बाबा, अशी कधीं कधीं येणारी कळ फार धोक्याची —

**केशव**–[ घाबरून ] कां ?

**माधव**–अरे चालू–एकसारखी कळ असली म्हणजे पकडायला सोपी जाते; पण ही चमक–हिचा कांहीं भरंवसा नाहीं, आज आहे तर उद्यां नाहीं.

**केशव**–मग आतां काय करायचं ?

**माधव**–चमकच ठिकाणावर नसली तर डॉक्टर पाहणार तरी काय ? आणि ती येईल तेव्हां डॉक्टर नसायचा !

**केशव**–( चमत्कारिक आवाजांत ) माधव, हें कांहीं लक्षण ठीक दिसत नाहीं !

**माधव**-कांरे बुवा ? आतां काय झालं ?

**केशव**–माझे-ग–गुडगे मुडपायला लागले आहेत, घ–गाम फुटतो आहे–हातापायाला–सुया बोंचल्यासारखं होतं आहे—

**माधव**–( एकदम हंसू लागतो ) हाः हाः हाः हाः हाः !

**केशव**–( ओरडून ) चूप ! राक्षस ! इथं माझा प्राण जायची वेळ आली आहे. आणि तुझी मोठी करमणूक होते आहे ?

**माधव**–( हांसत हांसत ) अरे दीडशहाण्या–मी तुला बनवलें आणि तूं बनलास ! तुला कांहींसुद्धां होत नाहीं. चल ऊठ, कोट घाल, शो चुकेल आपला—

**केशव**–नाहीं नाहीं, आतां कसचा शो ! तिथं थिएटरमध्यें अंधारांत कांहीं खालीं पडलं आणि तें उचलायला तिथं वांकलों कीं पुन्हां कळ यायची ! बसल्या जागींच एखादे वेळीं सगळा कारभार आटपायचा ! तूं जा एकटा—

**माधव**–आणि तूं काय करतोस ?

**केशव**–मी डॉक्टरकडे जातों, आत्तांच्या आत्तां–

**माधव**–अरे मूर्खा, तुला मी पुन्हां सांगतों—

**केशव**–नकोरे बाबा, विषाची परीक्षा नको—

**माधव**–पागल ! ठीक आहे, मला तुझ्या नादीं लागायला वेळ नाहीं–माझा सिनेमा चुकेल. सो लॉंग —

**केशव**–चीरिओ–फ्रान्सीस, ए फ्रांसिस, माझा ओव्हरकोट, मफ-लर, जाड बूट, सगळं काढून दे मला–आणि एक टॅक्सी बोलाव–

– २ –

[ स्पेशॅलिस्ट डॉक्टरची रोगी तपासण्याची खोली. स्पेशॅलिस्ट, एक डॉक्टर व केशव. पहिल्यानें अर्धेएक मिनिट भयाण स्तब्धता.]

**स्पेशॅलिस्ट**–आतां जरा उपडे पोटावर निजा—

( केशव तसें करतो; 'बद् बद् बद्' 'कट् कट् कट्,' 'थप् थप् थप्' इ. आवाज )

**स्पे०**–जीभ पाहूं ?–हूंऽऽऽऽऽ–आतां म्हणा, 'खंडेराव खांडके–'

**केशव**–'खंडेराव खांडके—'

**स्पे०**–थांबा, डॉक्टर, [ हलकेंच ] इथं हात टाकून 'पॅटस्पोलिक रिॲक्शन' पहा. [ केशवास ] हं, आतां म्हणा 'खोफनाख् खोरासानी !'

**केशव**–( जरा मोठ्यानें ) 'खोपनाख् खोरासानी !'

( स्पेशॅलिस्ट डॉक्टरकडे पाहातो— )

**डॉक्टर**–( समजल्याच्या आवाजांत ) हा ऽऽऽऽ......

**स्पे०**–( केशवला ) पुन्हां म्हणा 'खलिफा–इ–खंबायते–खैरियत'

**केशव**–( आवेशानें ) 'हरिफाई कंभावती ही रयत'

**स्पे०**–( डॉक्टरास ) डिड् यू नोटिस ? इंटरेस्टिंग—

**डॉ०**–व्हेरी !

**केशव**–माफ करा हं, डॉक्टरसाहेब; पण—

**स्पे०**–जस्ट ए मिनिट, जरा कान इकडे करा—

( कसलें तरी यन्त्र जोडल्याचा ' खट् खण् ' असा आवाज )

**स्पे०**–आतां डाव्या नाकपुडीच्या वरच्या बाजूला दुखतं आहे का ?

**केशव**–( निश्चयी आवाजांत ) नाहीं.

**स्पे०**–( थोडा वेळ थांबून ) आतां ?

**केशव**–( थोड्या खालच्या आवाजांत ) नाहीं.

**स्पे०**–पुन्हां लक्ष द्या......आतां ?

**केशव**–( हताशपणें ) ना...हीं

( स्पेशॅलिस्ट व डॉक्टर कांहीं कुजबुजतात. )

**स्पे०**–( मोठ्या सहनशीलपणें वागत आहोंत अशा आवाजांत ) आतां ?

**केशव**–( बेछूटपणें ) दुखत आहे !

**स्पे०**–( विजयी स्वरांत–डॉक्टरास ) डिडंट आय टेल यू ?

**डॉ०**–क्वाइट् !

**स्पे०**–आतां ही नळी मी तुमच्या या गुडघ्यामागें लावतों, आंकडे मोजा पाहूं–

**डॉ०**–वन्–टु–थ्री—

**स्पे०**–तुम्ही नाहीं, पेशन्टला सांगितलं.

**केशव**–चार पांच सहा सात आठ नऊ दहा अक्रा बारेंरा—

**स्पे०**–पुरे पुरे पुरे. ( डॉक्टरास ) ' सोलोटेमिक नॅमिॲनिटस–'

**डॉ०**–( कळल्यासारखी मान डोलवतो ) वंडरफुल् !

**स्पे०**–आतां हें पहा, या बांकावर पाय पसरून बसा, आणि मागं वळून उजवा हात डाव्या बाजूनं आणून त्यानं डाव्या पायाचा आंगठा धरा. ( केशव तसें करण्याची धडपड करीत असल्याचे आवाज–तो बाका-वरून खालीं पडतो. )

**स्पे०**–नेव्हर माईंड ! ( डॉक्टरला ) यांचे हात पाठीमागं धरा पाहूं ( डॉक्टरनें तसें केल्यावर स्पेशॅलिस्ट केशवाच्या छातीवर एक जोराचा गुद्दा चढवतो )

**केशव**–( आश्चर्य, भीति व धक्का हें व्यक्त करणाऱ्या आवाजांत ) आँ ? कक्—!

**स्पे०**–( टाळी वाजवून ) राइट हो! जस्ट ॲज आय थॉट! ( एकदम गंभीर होऊन ) दॅट विल डू. उठा, बटणं लावा. त्या खुर्चीवर बसा. मी विचारीन त्या प्रश्नांचीं नीट विचारपूर्वक खरीं उत्तरं द्या. या डॉक्टरनीं माझ्याकडे तुम्हाला आणलं, आतां पुन्हां मजजवळ सगळं मोकळ्या मनानं सांगितलंच पाहिजे.

**केशव**–मीं—

**स्पे०**–( जोरानें ) तुमची केस फारच चमत्कारिक आहे; पण आय शॅल डू माय बेस्ट, यू नीड नॉट वरी. आतां सांगा, लहानपणीं तुम्ही कधीं उंचावरून उकळत्या तेलाच्या कढईत पडलां होतात का ?

**केशव**–नाहीं.

**स्पे०**–कधीं चुकून सल्फ्यूरिक ॲसिड प्याला होतात ?

**केशव**–नाहीं !

**स्पे०**–घोड्याचं मांस तुमच्या खाण्यांत कधीं येतं ?

**केशव**–नाहीं.

**स्पे०**–हीलियम गॅस श्वासोच्छ्वासांत गेला होता ?

**केशव**–नाहीं.

**स्पे०**–कधीं चमत्कारिक स्वप्नें पडलीं होतीं ? फॉर इन्स्टन्स, जसे कांहीं हिरव्या पंखाचे बैल चिरूट ओढीत पाण्यावरून चालत जात आहेत अशीं ?

**केशव**–नाहीं.

**स्पे०**–( न डगमगतां ) आतां एक महत्त्वाचा प्रश्न विचारतों— सावकाश, थंडपणें, आठवून उत्तर द्या. तुम्हाला मधूनमधून ‘ आपण स्त्री आहोंत ’ ‘ आपल्याला मुलें आहेत ’ ‘ आपल्याला मुलें आहेत ’ आपल्या शरीराला—

**केशव**–( चिडून ) आय से ऽऽऽऽ ! व्हाट्‌ डू यू मीन ?

**स्पे०**—( विजयानंदानें ) ओ. के. ! मला नुसती तुमची ' रिफ्लेक्स क्लॅप्टोप्रॉक्झिमिक रिॲक्शन ' पाहायची होती. थँक यू——

**केशव**—प ऽऽऽऽऽ——

**स्पे०**—ओ येस, नाउ फॉर ट्रीटमेंट तुम्हाला फार काळजीपूर्वक राहायला पाहिजे. तुम्हांला हवं असल्यास मी डॉ. रोखीला कन्सल्टेशनसाठीं—

**केशव**—तें झालं, त्यांनींच तुमच्याकडे यायला सांगितलं——

( स्पे. व डॉ. यांची कुजबूज )

**स्पे०**—इझंट सो ? बरं; आतां, रक्त—तपासणी, मलमूत्रपरीक्षा, केसांचं पृथक्करण, एक्स—रे फोटो, घामाचा रिपोर्ट, पायाच्या नखांची टेस्ट, डोळ्यांचं टिपण——

**केशव**—( बरेचसे कागद फडफडावीत ) हिअर यू आर—सर्व रिपोर्टस् आहेत इथं.

**डॉ०**—मीं पहिल्यानंच केली आहे ती व्यवस्था——

**स्पे०**—( कठोरपणें ) ओ ऑल राइट,...तेव्हां स्टुपेंडिक्ससाठीं ऑपे[illegible]न —

**कशव**—( ओरडून ) मला ऑपरेशन नको. बरा नाहीं झालों तरी चालेल. आय वोंट बी कट अप् ! ( उठतो ) मी चाललों——

**स्पे०**—हरकत नाहीं, हरकत नाहीं, बसा आपण दुसरी वाट काढूं. आतां लक्षपूर्वक ट्रीटमेंट ऐका, तुम्हाला बरं व्हायचं आहे ना ? गुड, काळजीपूर्वक राहून, उपचार नियमितपणें घेणं आपल्या हातांत आहे, मग त्याउप्पर कांहीं झालं तर नाइलाज आहे ! पहिली गोष्ट; स्विट्झर्लंड-मध्यें जाऊन वर्षभर रहाणं शक्य आहे का तुम्हाला ?

**केशव**—नाहीं.

**स्पे०**—काश्मीरमध्यें सहा महिने ?

**केशव**—नाहीं.

**स्पे०**-सिमला, मसुरी, उटी अशा ठिकाणीं ?—नाहीं ? बरं, निदान

महाबळेश्वर, माथेरान, पंचमढी, लोणावळा ? खंडाळा, कार्ला, वेसावा, चेम्बूर–निदान समुद्राच्या कांठावर नाहीं तर डोंगरावर कोठें तरी ?

केशव–माउंट अबूचं जमेल चारसहा महिने.

स्पे०–फाइन्! तिथं मी बरोबर देईन त्या माणसाच्या देखरेखी-खालीं राहायचं, मीं लिहून देईन त्या औषधाच्या निदान छत्तीस बाटल्या, हीं अठ्ठेचाळीस इंजेक्शन्स, दुसऱ्या औषधाचे बारा डबे, वाफारा, मालीस, गार्गल्स, वॉशेस् हें सगळं वेळच्या वेळीं करायचं. आक्रोड, द्राक्ष आणि चिकन एक्स्ट्रॅक्ट याशिवाय कांहीं खायचं नाहीं. माउंटअबूला अशी चार महिने पुरी विश्रांति झाल्यावर मी देतों हें पत्र घेऊन डेहरा-डूनच्या मी सांगतों त्या एका डॉक्टरकडे जायचं आणि इतक्यानंतर कांहीं उपयोग नाहीं झाला तर–देवाची मर्जी! थांबा एवढें लिहून देतों–

( स्पेशॅलिस्ट लिहीत असतां बाहेर रस्त्यावर भिकारी गातो )

तेरे गठडीको लागा चोर
मुसाफिर जाग जरा
तूं कहेता है ' दुखता है ये, '
वो कहेता है ' दर्द यही है '।
दो दिनमें ये लूट कर लेगा,
सब रुपिये और नोट ॥ मु०–॥

स्प०–काय त्रास आहे! डॉक्टर —

( डॉक्टर खिडकीजवळ जातो )

डॉ०–ए चले जाव. क्यौं खालीपिली मगज खाता है ?

भि०–साब! धरम—

डॉ०–अरे ये दवाखाना है—

भि०–हुजूर, मै डॉक्टरके पाससे रहेम नहीं चाहता–क्या मै पागल हूं ? मै बिचारे बीमारोंसे धरम मांगतां हुं–

डॉ०–चल जा!

( भिकारी गाणें पुरें करतो. )

**बनके पागल तू आयेगा,**
**अपना कागज ये लिख देगा**
**फिर पीछे और गले पडेगा,**
**लाख मचानें शोर ॥ मुसाफिर० ॥**

( केशव उठून जड पावलांनीं चालूं लागतो. )

**डॉक्टर**-( हलक्या पण जाड आवाजांत )-त्यांची फी-वीस रुपये-

( कडकडीत नोटांचे आवाज )

**स्पे०**-ओ थॅंक्स, ही ट्रीटमेंट आणि हें त्या डॉक्टरला पत्र-गुड लक् !

**डॉ०**-( केशवला हळूच ) तुम्ही जा आतां, मला जरा काम आहे इथं.

( केशव गेल्याचें दार वाजतें. )

**स्पे०**-येस ? हो खरंच, मोड आहे का तुमच्याजवळ ? ट्वेन्टी पर्सेंट नाहीं का ? ( नोटेच्या व रुपयाच्या देवघेवीचे आवाज )

**डॉ०**-( घुटमळत ) पेशंटबरोबर माउंट अबूला—

**स्पे०**-सॉरी. ती व्यवस्था मीं नर्स रेणुकाबाईसाठीं केली आहे. तपासण्या, रिपोर्टस् जर माझ्या मध्यस्थीनं करविल्या असत्यात तर पाहिलं असतं-बरं आतां आय ॲम बिझी—? बाळू ! पुढचा पेशन्ट—

— ———

— ३ —

माउंटअबू : पर्वताच्या एका कड्यावर.
वारा; पक्ष्यांचे आवाज वगैरे.

**कमला**—( मोकळेपणाची, एकटेपणाची जाणीव असल्यासारखी खुषींत, लहरींत गात आहे )

**हांसे मज ही लतिका।**
**तरुहृदीं राहि निजसुखांत विरता :**
**प्रीतीसमाधीमाजी, जीवासी विसरुनि ।।**
**मजला गमे ही हिणवीत विरहा ।।**

**केशव**—( धापा टाकीत येतो. आश्चर्याच्या अतिशयोक्तीनें ) अरे तुम्ही इकडे कोणीकडे ?

**कमला**—( हांसून ) इतकं ढोंग करायचं कांहीं कारण नाहीं. मला पाहूनच तुम्ही इकडे वळलेलं पाहिलं मीं !

**केशव**—पण एकट्याच ? एवढ्या जंगलांत ?

**कमला**—पांच मिनिटांच्या रस्त्यावर तर होटेल आहे आपलं. बाबा खोलींत विश्रांति घेत आहेत—आणि मी स्वतःचं रक्षण करायला चांगली खंबीर आहे !

**केशव**—इतके दिवस झाले—तुमची ओळख करायची संधी पहात होतों—

**कमला**—मला पण कंटाळा आला होता—पण तुम्ही पहावं तर नेहमीं त्या भयंकर बाईबरोबर—माफ करा अं, त्या तुमच्या कोणी नाहींत ना ?

**केशव**—खुशाल काय वाटेल तें म्हणा. तुम्ही विचारतां त्या अर्थानं ती बया माझी कोणी नाहीं !

**कमला**—आहेत तरी कोण त्या ?

**केशव**–ती–ती माझी नर्स आहे !

**कमला**–नर्स ? (मोठ्यानें हांसते) मग दुधाची बाटली कुठं आहे तुमची ?

**केशव**–(हांसून) तुम्हीं थट्टा करावीत अशीच स्थिति आहे खरी (निश्वास टाकून) पण काय करणार, जगण्यासाठीं सगळीं धडपड केली पाहिजे. ट्रीटमेंटखालीं आहे मी, नाहीं तर त्या हिडिंबेला मिनिटभर तरी आसपास उभी करीन असं वाटतं का तुम्हांला ! पण मरणोन्मुख मनुष्य जिवाच्या आशेनं वाटेल तें करायला तयार होतो––

**कमला**–(एकदम गंभीर होऊन) असं काय भलतंच अभद्र बोलतां कांहीं तरी ? चांगले धडधाकट आहांत–तुम्हाला कांहीं होत असेल असं वाटत नाहीं.

**केशव**–अहाहा ! तें जर खरं असतं तर ––

**कमला**–(हळूंच) तर–तर काय ?

**केशव**–तर मग मला डर नव्हती–मीं हवं तें केलं असतं.

**कमला**–हवं तें ?

**केशव**–होय हवं तें (शब्दांप्रमाणें कृति करीत) हे हात असे घट्ट पकडले असते, माझ्या दृष्टीला दृष्टि भिडवायला लावली असती. कमल, वर पहा !––आणि तूं माझी होशील कां म्हणून विचारलं असतं–छे, विचारायला देखील थांबलों नसतों–उचलून नेली असती !

**कमला**–(खालीं पहात) मरणोन्मुख माणसांत बराच दम आहे म्हणायचा !

**केशव**–(एकदम तिला सोडून निराश आवाजांत) पण मला तसं कांहीं करतां येत नाहीं. मी अगदीं थोड्या दिवसांचा सोबती असेन ! माझं प्रेम म्हणजे प्रेमाचं मृत्युपत्र–तें तुला त्रास देण्यापुरतंच माझ्या मागं राहील.

**कमला**–केशव –

**केशव**–[हर्षानें] काय म्हणालीस ? पुन्हा म्हण––

**कमला**–( हलक्या आवाजांत ) केशव !

**केशव**–कमला !

[ अर्थपूर्ण आवाज ]

**केशव**–अहाहा, आतां मीं सुखानं मरेन !

**कमला**–( चिडून ) नॉन्सेन्स–मला तुमचं हें आजारीपण बिलकूल खरं वाटत नाहीं–काय झालंय् हो तुम्हाला ?

**केशव**–सांगतों ऐक, प्रेमाच्या माणसाशिवाय मोकळ्या मनानं कोणाजवळ सांगायचा–आपल्या आजाराचा तपशील ? ये, या बांकावर बसूं–पण तुझे बाबा नाहीं ना यायचे ?

**कमला**–नाहीं–पण तुमची ती महामाया ?

**केशव**–ती या वेळेला आली तर तिला या कठ्ठयावरून ढकलून देईन !

[ बसतात. ]

**कमला**–सांगा मला आतां सगळं–

**केशव**–कांहीं तरी भयंकर रोग—काळजाचा विकार असावा मला !

**कमला**–भलतंच !

**केशव**–खरंच, आठ–दहा दिवस झाले–हाच सूट होता माझ्या अंगांत–नवा आला होता शिवून, आणि बुटाच्या लेसेस बांधायला असा वांकलों—( किंचाळतो ) अयाऽऽई !

**कमला**–( घाबरून ) अगबाई ! काय झालं ? केशव–असं काय ? मी आहें ना ? पडा असे...माझ्या मांडीवर डोकं ठेवा.

( तो धांपा टाकतो, ती त्याला वारा घालते. )

**कमला**–आतां बरं वाटतं आहे का ?

**केशव**–अहाहा, मी मरायच्या आधींच स्वर्गांत आहें का ?

**कमला**–लागलांत पुन्हां बडबडायला ! काय झालं आतां ?

**केशव**–त्या दिवशीं जशी भयंकर कळ आली होती तशीच आता आली–आऽऽऽऽ ! ( कण्हतो. )

**कमला**—तो कोट काढा पाहूं ( केशव कोट काढून देतो ) सांगा पुढं.

**केशव**—मग मीं माझ्या डॉक्टरकडे गेलों, त्यानं मला दोनतीन स्पेशॅलिस्टांकडे नेलं. शेवटच्या स्पेशॅलिस्टानं मला ही ट्रीटमेंट त्या नर्सच्या देखरेखीखालीं दिली आहे. आतां येथन—

**कमला**—स्पेशॅलिस्ट कोण तो ?

**केशव**—डॉ. टोचा.

**कमला**—वाहवा !

**केशव**—कां ?

**कमला**—तुम्हीं वाचलं नाहीं का पेपरमधें ? अहो, तो खोटा डॉक्टर होता. पोलीस त्याच्या डिग्रीज तपासायला गेले तेव्हां त्या सगळ्या खोट्या निघाल्या. फक्त एक वायरमनचं लायसेन्स सांपडलं त्याच्यापाशीं आणि तो स्वतः आतां वेड्याच्या इस्पितळांत आहे. बरं, आणि तुमचा डॉक्टर कोण ?

**केशव**—डॉक्टर बांडिसकर—

**कमला**—डिग्री काय त्याची ?

**केशव**—वा, तो एल्. एम्. एस्. आहे—नॅशनल, मला वाटतं वर्धा युनिव्हर्सिटीचा.

**कमला**—चांगला उद्योग ! तरी बरं, घोड्याच्या डॉक्टरकडे नाहीं गेलांत !

**केशव**—पण माझं दुखणं खरं आहे ना ?

**कमला**—तें पाहूं आतां—कळ कुठें आली होती—

**केशव**—या इथं—अरे हें काय—इथं रक्ताचा थेंब आहे—अरे बापरे ! आर्टरी—धमनी तुटली—आयुष्याची दोरीच तुटली !

**कमला**—शट् अप् ! त्या जागेवर कोटाचा आंतला खिसा येतो ना !

**केशव**—हो पण—

**कमला**—मग या खिशांत—अय्याऽऽऽऽ—हें काय !

**केशव**—टांचणी ?

**कमला**–टांचणी! वांकलांत तेव्हां बोचली. शिंप्याकडचा नवा कोट होता ना!

**केशव**–माय गुडनेस्! त्या गाढवानं–त्या पिएट्रोनं मला या सगळ्या फेऱ्यांत पाडलंन्–खून करतों जाऊन त्याचा—

**कमला**–( हळूच ) पण या फेऱ्यानंच इथं आलांत ना!

**केशव**–इथं आलों–ओ–बाय जव्ह! ( मोठ्यानें हांसतो ) इथं आलों–ओऽऽऽमाय डार्लिंग–आय ॲम सो हॅपी!

**कमला**–हां-हां-हां हें काय कोणी येईल ना—

**केशव**–आय डोन्ट केअर!

**कमला**–( मिष्किलपणें ) ट्रीटमेंटची वेळ नाहीं झाली का?

**केशव**–खरंच, पाजी, बदमाष!–तुला नाहीं म्हणत, त्या डॉक्टरांच्या सोनेरी टोळीला. त्या स्पेशॅलिस्टाला जाऊन दाखवूं का चांगला हात–?

**कमला**–जाऊं द्या! त्यांच्यामुळेंच आपण भेटलों ना इथं? आणि त्यांनीं तरी पोट कसं भरायचं—?

**केशव**–असा आमचा सुपडा साफ करून?

**कमला**–सुपडा साफ व्हायला काय झालं–दरिद्री लोक का कधीं स्पेशॅलिस्टाकडे जातात?

**केशव**–नाहीं, पागल श्रीमंत जातात–खरं आहे? कां? पण फारशी तरफदारी करते आहेस? तूंही स्पेशॅलिस्ट नाहींस ना?

**कमला**–( हळूंच ) स्पेशॅलिस्ट नाहीं का? एक रोगी बरा नाहीं का केला मीं? काळजाचा विकार नाहीं ना राहिला आतां?

**केशव**–( हांसतो ) यू लिटल् बॅग ऑ मिश्चिफ! पण ही टांचणी मीं कोठें ठेऊं? सोन्यानं मढवून गळयांत घालूं, का हृदयालाच टोंचून ठेवूं!

**कमला**–नको हं–पुन्हां डॉक्टर आणि पुन्हां दुसरी नर्स असे थेर नाहीं चालू द्यायची मी—

**केशव**—आतां तूंच माझी नर्स ! ही टांचणी ठेवतों या खिशांत पुन्हां–अरे हें काय ? हो, हें त्या डेहराडूनच्या डॉक्टरला स्पेशॅलिस्टानं दिलेलं पत्र, फोडून पाहूं या या चोरानं काय लिहिलं आहे—

**कमला**—द्या मी वाचतें—

"डिअर डॉक्टर," (तो म्हणतो, कीं ) पत्र घेऊन येणारं चांगलं गब्बर कुळ आहे. हवें तितकें कापायला हरकत नाहीं. पैशाच्या अजीर्णा-शिवाय कसलाही रोग नाहीं या पेशन्टला–तुम्ही त्याच्याकडून काढाल त्यांतले तीस टक्के मात्र मला—

**केशव**—चोर ! ड्यांबीस !! डाकू !!!

**कमला**—स्टेडी ! स्टेडी ! मी एक युक्ती सांगूं कां ? हें पत्र दुसऱ्या पाकिटांत बंद करा अन् तुमच्या त्या नर्सजवळ देऊन तिलाच पाठवा त्या डेहराडूनच्या डॉक्टरकडे–शंभर रुपये खर्चाला दिलेत कीं जाईल !

**केशव**—हिअर हिअर ( कमालीच्या बावळटपणानें ) आणि मग ?

**कमला**—आणि मग काय ? स्टयूपिड !

**केशव**—ओऽऽऽऽ—आय् सी !

( अस्पष्ट आवाज ! )

**कमला–ह्वा संगम प्रेमी जीवांचा**
**मग धाक कशाला दुनियेचा**
**केशव–पर्वा नच कोणाची आतां**
**ये ठेवा सौख्याचा हाता**
**कमला–साहिल्या विरहाग्नि ज्वाला, भोग आतां संपला–**
**केशव–शान्ति देती आज देहा, प्रेमधारा शीतला—**
**दोघे–पसरोनी पंखा विहराया,**
**आकाश पुरेना विहगां या**
**जाऊं मार्गानें ऐशा,**
**प्रेमाच्या पसरूं संदेशा**

———

# न आलेला गड (व न गेलेले सिंह)

याच दिवसांतली गोष्ट. उन्हाळा संपून पावसाळा सुरू होण्याच्या बेतांत होता. आकाशांत काळे ढग जमून नुसते दम देण्याचे आवाज काढीत होते. विजा चमकत होत्या. वसंतऋतूंतली कोंवळी पालवी थोडी कमी कोंवळी दिसूं लागली होती. लोकांनीं घरांत चोखून रस्त्यावर फेंकलेल्या साली—कोयावर घसरून गाफिल लोक मधून मधून पडत होते. लग्नाकार्यांचा मोसम संपल्यामुळें बरेचसे वाजंत्री सनयावर गवसण्या चढवून खांद्यावर धोपट्या चढवीत होते. पोराबाळांच्या कटकटीनें ज्यांना उच्छाद आणला आहे असे पालक, घरोघर शाळा केव्हां सुरू होतील ही आशेनें वाट पहात होते. डॉक्टर—वैद्यांनीं अजीर्णावरचीं औषधें मागें घेऊन हिंवतापावरचे इलाज पुढें काढून ठेवले होते. उन्हाळ्याच्या सुट्टींत कोर्टें बंद झालीं तरी बाहेरगांवीं जाण्यास असमर्थ असलेले शेंकडों रिकामटेकडे वकील आपल्याला जणूं काय 'फौजदारी प्रॅक्टीसमुळें गांवच सोडायला मिळाला नाहीं' अशा ऐटींत हिंडत होते, पण घरीं मात्र हळूच आपापल्या पगड्यांमधून 'पायशॉ' मारीत होते. दुकानदार बाहेरगांवचे पाहुणे गेले या खिन्न विचारानें चढविलेल्या किंमती उतरवीत होते. मास्तरकीच्या अर्जांनीं संस्थांतून व कोचिंग—क्लासेसच्या जाहिरातींनीं रस्त्यांतून, रद्दीचे खच पडत होते. मॅट्रिक पास झालेले विद्यार्थी 'डबल ब्रेस्ट'चे हिरवे पिवळे कोट शिववीत होते व नापास झालेले शाळा बदलून तपकीर ओढायला शिकूं लागले होते—थोडक्यांत म्हणजे पुणें शहराचा जून महिना चालू होता.

अशा या काळांत आम्हीं सिंहगडला पायीं जाऊन येण्याचा मनसुबा केला.

इथें हें सांगायला पाहिजे कीं, आमच्या पुण्याला बहादुरीच्या इयत्ता साधारणतः येणेंप्रमाणें ठरल्या आहेत—

१. मधें आडवी तंगडी घालून लोकांच्या सायकलवरून बुधवारांत चक्कर मारून येणें.

२. पुणें शहरापासून तीन मैलांच्या त्रिज्येनें जें काल्पनिक वर्तुळ निघेल त्याच्या चौरस क्षेत्रफळांतील कोणत्याही आंबराया किंवा पेरूच्या बागा लुटून एका वर्षांत तीनदां तरी कैऱ्या किंवा पेरू आणणें. (एकदां टोपी गेल्यास वरच्या वर्गांत पास.)

३. पर्वती किंवा चतुःश्रृंगी ऐन यात्रेच्या दिवसांत एका दमांत चढून येणें.

४. होळीसाठीं नांवाच्या पाट्या, बाजा, खिडक्यांच्या फळ्या, खुर्च्या, दुकानांचे दादर, खांब, खटारे वगैरे आदल्या रात्रीं गोळा करून आणणें; तें नच साधल्यास रात्रीं म्युनिसिपालिटीचे कंदील, केराच्या पेट्या वगैरे अस्ताव्यस्त उडवून देणें; सांपडतील तीं कुत्रीं, गाढवें, गाई, म्हशी वगैरे कोणा–कोणाच्या वाड्यांतून सोडून देणें.

५. चिंचवड व आळंदी हे प्रवास सायकलवरून करून येणें. ( अर्थात् यात्रेच्या दिवसांत )

६. गणपतीच्या दिवसांत जास्तींत जास्त खासगी व वर्गणीचे कार्यक्रम फुकटांत पहाणें.

७. सिंहगडची सफर करणें.

सिंहगडची सफर ही परीक्षा मॅट्रिकच्या आसपासच होते. तसें दोन्ही परिक्षांत साम्य बरेंच आहे. पायीं सिंहगडाला गेल्यासारखें वर्गांत नियमानें बसून, पुस्तकें वाचून, अभ्यास करून धोपट मार्गानें पास होणें. सायकलनें जाणें म्हणजे गाईडस् व नोटस् घोकून आयत्या वेळेला स्पेशल कोचिंग क्लासांना जाऊन 'सुटणें', आणि सर्व्हिस मोटरनें जाणें म्हणजे हजार खटपटी करून, वशिला लावून हर प्रयत्नांनीं सटकणें. यांपेक्षांहि हुशारीचा मार्ग म्हणजे मंडपांत कॉपी करण्यासारखें, पुण्यापासून चार मैलावर विठ्ठलवाडीलाच दोन दिवस मुक्काम करून सिंहगडावरच्या हवेची तारीफ करीत परत येणें.

माझा स्वतःचा मार्ग वेगळाच होता. मी परीक्षा जशी संथपणें वाऱ्या करीत करीत उतरलों तसा सिंहगडही बैलगाडींतूनच आस्ते आस्तेच करून घेतला. लहान होतों तेव्हां मी, मला चांगला आठवतो आहे तो प्रवास. पहांटे तीनच्या सुमाराला परत येतांना गाडीवाल्याला झोंप लागलेली पाहून मीं गाडी हांकली देखील होती थोडा वेळ—आणि झोंपेंतून जागा झाल्यावर ( गाडी पुण्याकडेच परत जाते आहे ही खात्री करून घेतल्यावर ) गाडीवाल्यानें मला शाबासकी पण दिली होती. आतां सध्यां योग्य रोजगाराचें कांहीं जमत नसलेलें पाहून मला कधीं कधीं वाटतें कीं, बैलगाडीवानाचा धंदा जमला असता आपल्याला; निदान त्या सरावानें दोन उपसंपादक ठेवून एखादें वर्तमानपत्र काढायला हरकत नव्हती. पण जाऊं द्या, आपल्याजवळ मासिक काढायचीसुद्धां तयारी नाहीं, मग बैलगाडीच्या गोष्टी कशाला !

मी व माझे इष्टमित्र एकेकदां सिंहगड पाहून आलेले होतों. पण हौसेखातर जसे कांहीं चमत्कारिक लोक वेगवेगळे विषय घेऊन पुन्हां पुन्हां एम्. ए. होतात, तसे आम्ही हौसेखातर पुन्हां जाणार होतों. [ बाकी हौसेखातर लोक काय करतील याचा नेम नाहीं. कोणी आंबटशोकी बायकांना माहेरीं पाठवून खाणावळींत जेवतात; तर कांहीं विक्षिप्त पेन्शनर ज्ञानप्रकाशांतील दुखवट्याच्या सभांचे उभें दैनिक पान वाचून काढतात. कित्येक उपद्व्यापी गृहस्थ तर सुखाचा जीव दुःखांत घालून पहांटे साताला उठून पळायला देखील हौसेखातर जात असल्याचें ऐकतो. )

आमच्या हौसेच्या मागें कांहीं नाजूक कारणेंही होतीं. आमच्यांतले सर्वांत वडील गृहस्थ जे अण्णाकाका, त्यांच्या परीक्षेच्या निकालाचे हे दिवस होते. त्या निकालाबद्दल सालाबादप्रमाणें त्यांना योग्य तीच कल्पना असल्यामुळें, ऐनवेळीं वडिलांपासून थोडें दूरच असावें हा पोक्त विचार त्यांनीं केला होता. मुलगा परीक्षेंत पसार झाला नाहीं हें वडिलांना कळण्याच्या वेळीं पुण्यांतूनच पसार होणें अण्णांनीं पत्करलें होतें. त्यांचा धाकटा भाऊ शास्त्रीबुवा हा प्रीव्हिअसमधून नुकताच पास झाला होता, पण 'कॉलेज लाइफ'ची त्याचीं रम्य स्वप्नें विरवून टाकायचा त्याच्या

वडिलांचा दुष्ट हेतु त्याला दिसूं लागला होता; वडिलांच्या मतें त्याला सब–असिष्टन सर्जनच्या 'नॉन मॅट्रिक कॉलेजांत' घालावें किंवा 'वर्कशॉप'च्या घिसाडी कोर्समधें घुसवावें असें होतें. दोन्ही बाजूच्या 'ॲडमिशन'च्या तारखा चुकवायला ही सिंहगडची संकल्पित सफर फार उपयोगीं पडणार होती. त्यांचा मावसभाऊ चि. माधव यानें आपला हेतू जाहीर केला नव्हता; पण आम्हांला त्याबद्दल पक्का संशय होता. त्याचे सगळे दोस्त कॉलेज–त्रैमासिकाचे साहित्यिक होते, त्यांच्या ओळीला बसायला ग्रामीण जीवनावर एखादें अचाट खंडकाव्य रचण्याची चोरटी तयारी दिसत होती ही! स्वारी बहुतेक 'खेडेगांवी वातावरणाच्या निरीक्षणासाठीं' आमच्याबरोबर येत होती. नंबर चार बन्या; हा वरील तिघांचा भाचा पाहुणा आला होता, तो एकटाच मागें कसा ठेवायचा म्हणून त्यालाही बरोबर घेतलें होतें. उरतां उरलों मी. मी नेहमींप्रमाणें रिकामटेकडा असल्यामुळें व मागें राहिल्यास एकट्याला पत्ते खेळणें शक्य नव्हतें म्हणून, या मोहिमेंत सामील झालों होतों.

एका सुरेखशा रात्रीं वडील माणसांना न कळवतां आम्ही कूच करणार होतों; आपापल्या आयांना कळविणें प्राप्तच होतें. कारण वाटेच्या दशम्या मिळवायला अन्य मार्ग नव्हता. त्या म्हणत होत्या, 'पावसाळा आला आहे, कसला नसता उपद्व्याप करतां?' आम्ही म्हणत होतों कीं, 'छे, अजून उन्हाळा संपत नाहीं, हुश्श! उकडतं आहे किती! आणि आम्ही दोन दिवसांनीं परत देखील येऊं...' इ. इ.

आम्हीं सर्वांनीं रुबाबदार पोषाख केले होते. बूट, होजेस, खाकी लांडी तुमान, पांढरा शर्ट व वर खाकी हॅट, या पोषाखांत आणि हातांतली छडी व गळयांत कॅमेऱ्याच्या पट्टयाला लावून टांगलेली पाण्याची पिशवी या आयुधानिशीं अण्णाकाका नुकतेच पूना मेलमधून उतरल्या-सारखे दिसत होते. शास्त्रीबोवांनीं हिरव्या फेट्यासह पांचवी इयत्तेंत उतरून ठेवलेला स्काउटचा पोषाख परिधान केला होता. माधवनें वरील सर्व पोषाख पांढरा ठेवून गांधी टोपी व एका कविमित्राचे टेनिस–शूज वापरले होते; बन्यानें एकाचे बूट, दुसऱ्याचे मोजे, तिसऱ्याची अर्धी

विजार, चौथ्याचा शर्ट व आणखी एकाची यू. टी. सी. ची हॅट घेतली होती [ व यांपैकीं एकही चीज त्याच्या अंगाला येत नव्हती ]. मीं फार विचारपूर्वक व धूर्तपणें पोषाख केला होता. पहाड चढण्यासाठीं स्विट्झर्लंडला जाणारे लोक 'विक्राळ खिळयांचे बूट' वापरतात हें माहीत असल्यामुळें, शेजारच्या सदू सुदाम्याचा क्रिकेटचा बूट मुद्दाम मागून घेतला होता. उबदार स्टॉकिंग्ज, पांढरी हाफ्पँट, 'एक्स्पोजर' होऊं नये म्हणून शर्टच्या आंत स्वेटर व डोकीवर माधवाला एकटेपणा वाटूं नये म्हणून गांधी टोपी [तिरपी] बसवली होती. अण्णाशिवाय वरच्या तिघांनीं वेगवेगळया चालकाठ्या घेतल्या होत्या. पण मीं मात्र अरण्यांतली प्रवासाची जबाबदारी ओळखून व 'अगदींच कांहीं गांधी टोपीवाला नाहीं' हें दाखविण्यासाठीं घरांतली धुणीं वाळत घालण्याची कांठी उचलली होती. सामान नेण्याच्या बाबतींत बरीच चर्चा झाली. बारा वर्षें मुंबईच्या कॉलेजांत काढून अण्णा अस्सल मुंबईकर झाले होते, त्यांनीं आपली सूट केस व होल्डऑल तयार केला. पण ही चालत जाण्याची सफर आहे हें आम्हीं त्यांच्या वेळेवरच लक्ष्यांत आणलें, तेव्हां नाइलाजानें तें सामान त्यांनीं सोडलें. नाहीं तर त्यांनीं प्रवासाला जायचें आहे या विचारानें, झोंपण्याचा सूट, उद्यांचे कपडे, परवांचे कपडे, दुसरी हॅट, रेनकोट, टॉयलेटचें सामान, वाचायला दोनतीन पुस्तकें, सिगारेटचे दोन डबे, हांतरूण पांघरूण वगैरे सर्व जय्यत तयारी केली होती. मीं त्यांना कठोरपणें सांगितलें कीं, ही काटकपणाची वेळ आहे, वाटेनेंसुद्धां चैन करायची नाहीं, अगदीं सडें जायचें आणि परत यायचें; पण अण्णा म्हणाले थोडें सामान हवेंच, व तें सगळयांचें एके ठिकाणीं या होल्डऑलमधें बांधूं म्हणजे सुटसुटीत काम होईल; पण तें न्यायचें कोणी? बाकीच्यांनीं अर्थपूर्ण दृष्टीनें माझ्याकडे (कारण मी जरा ऐसपैस बांध्याचा आहे) व माधवकडे (तो अगदीं लहान व जरा नाजुक आहे) पाहण्यास सुरवात केली. त्यांचा बदमाष डाव दिसत होता कीं माझ्या ताकदीच्या स्तुतींत कांहीं वेळ माझ्या, व माधवाला धाकदपटशा दाखवून कांहीं वेळ त्याच्या डोक्यावर तो होल्डॉल द्यायचा व आपण मात्र सडसडीत पुढें चालायचें. मी व माध-

वानें जेव्हां सफरींतून अजीबात पाय काढण्याचें ठरवलें, तेव्हांच त्या तीन कटवाल्यांनीं आपआपलें सामान वाहण्याचें कबूल केलें. अण्णांना पाठीवर सामान वाहण्यास योग्य असा फॅशनेबल ' हॅव्हरसॅक ' उभ्या पुण्यांत न मिळाल्यामुळें आम्हाला निघायला एक दिवस उशीर झाला. अखेर शक्य तितकी फॅशनेबल म्हणून फोनोच्या रेकॉर्डस् ठेवण्याची पेटी [ तिला दुर्बिणीचे पट्टे लावून ] अण्णांनीं ती पाठीवर अडकवली; शास्त्रीला त्याची खाकी बगल-पिशवी होतीच; माधवनें आपल्या साध्या पोषाखानुरूप असें गाठोडें पाठीवर घेतलें होतें, बन्यानें आपलें सामान पट्ट्या-पट्ट्याच्या गोणपाटाचे दोन पितळी कड्यांचे एक पांडूतात्या-पाकीट [ उर्फ कल्याण ब्याग ] घेऊन त्यांत भरलें होतें. माझी चीजवस्त एका जुन्या उशीच्या अभऱ्यांत होती.

आणि अखेर तयारी पुरी होऊन व योग्य तो दिवस येऊन त्या रात्रीं हळूच आम्ही आपापल्या घराबाहेर पडलों. एखाद्याच्या बाबांनीं सहज अचानक हटकून ' कायरे कुठं चाललास ?' म्हणून विचारलें असतें तर आमची ही इतिहासप्रसिद्ध मोहीम तिथेंच थंडावली असती. रात्रीं साडेदहाची वेळ निघण्याची ठेवली होती. साडेअकराला निघतां निघतां गोविंदराव गपाट्याच्या हॉटेलांत एकदां चहा घेऊन निघावेसें ठरलें. कारण रात्रीं वाट चालायला हुषारी तर राहिली पाहिजे! चहा घेतां घेतां गप्पा इतक्या रंगल्या कीं, दुसरा कप मागवणें प्राप्तच आलें. तकवा जास्त टिकवण्यासाठीं म्हणून थोड्या वेळानें आणखी एक शिंगल घेतला. झोंप येऊं नये म्हणूस एक, व बरोबरचें फराळाचें राखून खाण्या-साठीं आणखी एक कप पिण्याची खबरदारी घेण्याशिवाय इलाजच नव्हता. नंतर सिंहगडच्या वाटेवर गोविंदरावाच्या चहासारखा चहा मिळणार नाहीं ही आठवण झाल्यावर 'शेवटचाच कप' घेऊन मात्र आम्ही उठलोंच. मोठ्या उत्साहानें सिंहगडची वाट— पण मधेंच एक अपशकून झाला. सुमारें तीस कप चहा व बाहेरगांवाहून पुण्याला आलेल्या बन्यानें स्वतःसाठीं मागविलेले कित्येक खमंग पदार्थ, मिळून झालेल्या बिलाचे पैसे आमच्या पांचजणांत न निघाल्यामुळें खजिन्याची

भरपाई करणें अवश्य होतें. शास्त्रीबोवांना घरीं पाठवून अण्णाच्या ड्रॉवरमधले पैसे हळूच काढून आणणें भाग पडलें. तिथेंच आम्हीं ठरवलें कीं चारचार आणे वर्गणी करून सव्वा रुपया जमवायचा व त्यांतून शक्य तितक्या काटकसरीनें खर्च करून उरलेले पैसे परत पुण्याला आल्यावर वांटून घ्यायचे. सिंहगडच्या पायीं सफरीचा अंदाजी खर्च, माणशीं चार आणे यावा अशी आमची आशावादी कल्पना होती! आपल्याजवळ पैसे ठेवण्यास प्रत्येकजण तयार झाला, पण सर्व कुळें ओळखीचीं असल्यामुळें ज्यानें त्यानें आपापले पैसे आपल्याचजवळ ठेवावे असें ठरलें. या चर्चेच्या वेळांत एक पावसाची सर येऊन गेली. बन्या हॉटेलांतल्या बांकावरच झोंपत होता, व त्याचा हळूच घरीं सटकण्याचा बेइमानी विचार दिसत असल्यामुळें मी त्याची गर्दन घट्ट पकडून ठेवली होती. साडेबारा पाऊणला आम्हीं खरोखरीच सिंहगडचा रस्ता धरला.

चन्द्र ढगाआडून डोकावत होता. नुकतीच पावसाची सर पडून गेल्यामुळें हवेंत गारवा आणि प्रसन्नपणा आला होता. गांवांतले रस्तेसुद्धा (रात्रीची वेळ असल्यामुळें व एकही मनुष्य नसल्यामुळें) सुंदर दिसत होते. कुत्रीं कोठें तरी आडोशाला जाऊन बसलीं होतीं. फोनो बंद झाले होते. लहान मुलें मधून मधून रडत होतीं. झाडावरून थेंब गळून ते नाकाच्या शेंड्यावर किंवा सदऱ्याची गळपट्टी व मान यांच्या सांदींत नेम धरून पडत होते. गांवाबाहेरच्या रस्त्याला आल्यावर अनेक अज्ञात प्राणी आपापले आवाज काढूं लागले होते. निसर्ग जणूं काय—सारांश इतकाच कीं, अशा वेळीं व अशा ठिकाणीं प्रायः जें जें घडतें तें तें घडत होतें.

माझे मित्र संगीतप्रिय असल्यामुळें गांवाबाहेर सुमारें अर्ध्या तासाची रपेट संगीताच्या तालावर जोरदार झाली. शास्त्रीचें अलगुज, बन्याचा तोंडवाजा, पाण्याच्या पिशवीवर अण्णांनीं धरलेला ठेका, माधवाच्या काठीची हालचाल व माझें उत्तेजन अशा शिस्तींत आम्ही जात होतों. सर्वानुमतें पहिला मुक्काम करावा असें ठरलें. एका ओढ्यावरील पुलाच्या कठड्यावर आम्ही टेकलों.

" चांगलाच पल्ला गांठला आपण ! " कपाळावरचा घाम पुशीत अण्णा म्हणाले.

" निदान दोन तास तरी चाललों कीं ! " माधव उद्गारला.

" आठ दहा मैल झाले असतील ? "

" म्हणजे खडकवासल्याच्या जवळजवळ आलोंच म्हणायचे. "

" चुकलं आपलं; मधून मधून वळून पाहिलं असतं तर पुण्यापासून किती दूर आलों तें दिसलं असतं. "

" आतां इथून कसचं दिसतं पुणं ! पर्वतीसुद्धां गेली पार दिसेनाशी होऊन ! "

" या–या डोंगराआड असेल ती. "

" हा डोंगर कुठला आलारे इथं ?"

" खडकवासल्याजवळचा तो डोंगर ! '

" पण दिवे, देवळं दिसताहेत वर. "

" किल्ला तर नाहीं एखादा ?"

" पण त्याच्यावर आतां वस्ती ? "

" कां सिंहगडलाच आलों आपण ? "

" छट्, आणखी थोडा पुढं आहे तो आणि मोठा आहे बराच. "

" मग ही टेकडी––"

" हुबेहूब पर्वतीसारखीच आहे, बरं का ? "

" शक्य आहे, " अण्णा म्हणाले. " या दख्खन पठारावरच्या खडकाचा हा ठराविक नमुना आहे––" ते मागें एकदां इन्टर सायन्सच्या वेळीं भूस्तरशास्त्राचे विद्यार्थी होते.

" पण देवळंहि तशींच ? "

" महाराष्ट्रांतील हिंदु देवळांची बांधणी– "

अण्णा एकदां इतिहासाचेही विद्यार्थी होते.

" अरे ही पर्वतीच ! "

बारकाईनें पाहिल्यानंतर तें कठोर सत्य मानणें आम्हांला भाग पडलें. आम्ही पर्वतीटेकडीच्या दुसऱ्या बाजूला आलों होतों इतकेंच. पुण्याच्या हद्दीपासून कांहीं फार लांब नव्हतों. सगळया पेन्शनरांना एकदम खोकल्याची ढांस लागली असती तर त्यांचा सामुदायिक आवाज आमच्या कानांवर आदळला असता, आणखी दोनतीन तासांनीं ' सकाऽऽऽळ–त्रिकाऽऽऽऽळ ' या कर्कश आरोळयांच्या कक्षेंत आम्ही आलों असतों, त्यापुढेंही दोनतीन तासांनीं रस्त्यावर नेऊन आपटलेल्या ' ढेकण्यां'चा गंभीर शहरी खणखणाट आम्हांला ऐकूं आला असता, घरोघर पेटणाऱ्या चुलींचा घासलेटी धूर आम्हांला दिसला असता, व तो दर्प आमच्यापर्यंत पोहोंचला असता...

विनाकारण विश्रांति घेतली या विचारानें आम्हीं पुन्हां वाट सुधारली; आतां सिंहगडच्या पुढें गेलों तरी हरकत नाहीं, पण विश्रांति म्हणून घ्यांयची नाहीं असा निश्चय केला. विठ्ठलवाडीवरून जात असतां टॅक्सीचें दार उघडून आंत बसणारा मनुष्य रस्त्यावर अचानक दिसलेल्या ओळखीच्या माणसाकडे ज्या खूप तुच्छतेनें पहातो तसें पहात आम्ही गेलों. आमचा बॅंड बंद झाला होता. या वेळपर्यंत आम्ही मुकाट्यानेंच चालत होतों. विठ्ठलवाडी गेल्यावर गप्पा सुरू केल्या.

वाटचालीचे श्रम विसरायला रसभरित गप्पांची फार मदत होते; त्यांतून विषय ' भुताखेतांच्या गोष्टी ' हा असला तर विचारायलाच नको; अंगावर शहारे आणणाऱ्या अनेक गोष्टी आम्हीं एकमेकांना सांगितल्या. सर्व गोष्टी अगदीं खऱ्या आणि अगदीं जवळच्या माणसाकडून विश्वसनीय रीत्या घडल्याबद्दल हमी असलेल्या होत्या. अण्णांच्या एका प्रोफेसरच्या सासूला विलायतेंत चेटूक झाल्याचें अण्णाला एका तेव्हांच्या विद्यार्थ्यापासून कसें कळलें तें ऐकलें. शास्त्रीच्या चुलतभावाच्या एका मेव्हण्याच्या नोकराला उशाशीं एक बाई येऊन बसण्याचा अनुभव कसा आला, ती हकीगत आम्हांला कळली. माधवानें आपल्या एका कविमित्राच्या [ ज्याचा बूट त्यानें घातला होता त्याच्या ] कानाशीं नेहमीं कोणीं कणिका व सुनीतें पांडव–दिडकी वृत्तांत गुणगुणल्याचा सारखा भास

होत असल्याची खबर दिली. बन्यानें आपल्या शेजारच्या कोंडोली गांवापासून वेणपूरला किर्रर झाडींतून रात्रीं बाराला बारा मैलांचा पायीं प्रवास करणाऱ्या शेठजीला अमुक एका वडाखालीं आपल्या खांद्यावर एकदम कोणी उडी मारून बसल्याचा भास कसा झाला व पुढचे तीन मैल त्यानें 'विक्रमावकाशांत' ( Record timeमध्यें ) कसे तोडले हा इतिहास कथन केला. मीं स्वतः आमच्या शेजारच्या वाड्याच्या भितीवरून रात्रीं साडेबाराला एक भीषण पांढरी आकृती जातांना कधींकधीं कशी दिसत असे, तें भूत घालवायला वाड्याच्या मालकानें कोंबडीं वगैरे कशीं कापलीं ( व नंतर मुकाट्यानें ती कोठूनशी पकवून आणून कशी पचवली ), नंतर अगदीं अनपेक्षित रीतीनें, तिसऱ्या मजल्यावरच्या बिऱ्हाडांतील माणसानें खिडकीबाहेर जळकी विडी टाकलेली त्या सफेद आकृतीच्या अंगावर कशी पडली, तेव्हां ती आकृति 'अग बाई!' म्हणून ओरडल्यामुळें, ती एक प्रौढ पुरुषद्वेष्टी कुमारिका रात्रीची मच्छरदाणी पांघरून पलीकडच्या वाड्यांतल्या एका हरिभक्तपरायणाच्या 'सेवे'ला जात असल्याचें कसें उघडकीस आलें, वगैरे वृत्तांत मीं निवेदन केला. याखेरीज खवीस, समंध, भूतपिशाच्च, हडळी, डाकिणी वगैरेच्या गोष्टींचीही सर्वांची उजळणी झाली.

हवेंत थंडी जरा जास्त वाटायला लागली होती. एक प्रकारची चमत्कारिक शांतता वाटत होती. एक कुठलासा अभद्र पक्षी कसलेसे अमंगळ आवाज काढीत होता. हळूहळू आपण बोलूं नयेसें आम्हांला वाटूं लागलें होतें; रस्त्यावरच्या चांगल्या उजेडाच्याच भागांतून जाणें बरें वाटत होतें. शक्य तर कांहींच आवाज करूं नये अशी इच्छा होत होती. झाडींतून मध्येंच कोणी खदखदां हंसलें व मध्येंच कोणी किंकाळी फोडली असा भास झाला. अण्णांनीं सिगरेट पेटवली, पण तिच्या धुराचे माणसासारखे आकार झाल्याचें वाटून त्यांनीं ती टाकून दिली. बन्यानें मोठ्या ऐटींत निर्भयपणा भासवायला गाण्याची लकेर म्हणून मारली पण शास्त्रीनें चिडून त्याला गप्प केलें. आम्ही अगदीं एकमेकाच्या जवळजवळ चालत होतों. चंद्र बेटा कुठें गेला होता कुणास ठाऊक. बाजूच्या झाडींत कांहीं खुसफुसल्यासारखी चाहूल लागत होती...

चालतां चालतां एके ठिकाणीं रस्त्याच्या कडेला चांगली मोकळी जागा व तिच्याभोंवतीं रस्त्यासाठीं ओतून ठेवलेले खडीचे ढीग होते. माधव एकदम जाऊन एका खडीच्या ढीगावर बसला " उहुहु ! तुम्ही अशा गोष्टी बोलत असाल तर मी एक पाऊल-- "

—तो मोठ्या त्वरेनें उठला, त्या ढिगांतली खडी नुकतीच फोडलेली व अणकुचीदार होती. तो एका वाळूच्या ढिगावर बसला व त्यानें आपलें वाक्य पुरें केलें,

—" एक पाऊलदेखील पुढं येणार नाहीं. "

" अशा गोष्टी म्हणजे ? हो खरंच ! तुला 'तशा' गोष्टी हव्या असतील–कांहीं हरकत नाहीं, ऊठ, बन्या—"

इतक्यांत त्रासून पुटपुटत माधवनें पुन्हां उडी मारली; वाळूच्या ढिगावर लांडी तुमान घालून अस्ताव्यस्त बसण्याचे परिणाम तो भोगीत होता. तो एकदां सपाट जमिनीवर बसला; पण गवत ओलें असल्याची सर्द जाणीव झाल्यामुळें वैतागून अखेर रस्त्याच्या कडेला असलेल्या 'आर बी' हीं अक्षरें कोरलेल्या दगडावर त्यानें आपलें डळमळीत आसन ठेवलें. (आर. बी. या अक्षरांचे दगड सरकारची इमानें इतबारें नोकरी केलेल्या रावबहादुरांच्या स्मरणार्थ कोरलेल्या त्यांच्या स्मारक–शिला असतात हें वाचकांना माहीतच असेल. लहानपणीं आमच्या समोरच्या त्या थेरड्या रावबहादुराचा 'आठवण–दगड' आपल्या जवळपासच कोठें तरी असावा व आपण त्याला जातां येतां ठोकर मारावी अशी माझी फार इच्छा होती; कारण त्या बुड्ढ्यानें त्याच्या पोपया काढल्याच्या वहीमावरून माझी टोपी व तुमानीचा पट्टा काढून घेतला होता–म्हातारड्यानें तो परत देखील दिला नाहीं. स्वतःच्या नातवाला वापरायला दिल्यान् त्यानें त्या वस्तू ! रस्त्यावर दुतर्फा रावबहादुरांच्या आत्म्यांना उभारलेलीं हीं आश्रयस्थानें या रस्त्यानें एखादा साहेब गेला तर त्याच्यासाठीं हार देखील पुढें करतां येत नाहीं या विचारानें जागच्याजागीं चुळबुळत असतील, व ते पुन्हां हालवून घट्ट पुरून ठेवायला पी. डब्ल्यू. डी. ला वरचेवर खर्च करावा लागत असेल.

असो, माधवला दगडावरच सोडला आहे– ) माधवाची समजूत घालायला मी जवळच बसलों; मला दुजोरा देण्यासाठीं शास्त्री बसला व आम्हांला बसलेले पाहून अण्णांनीं वडिलकीच्या नात्यानें बन्याला बजावलें कीं, पांचच मिनिटें बसायचें, हा एवढा एकच मुक्काम.

शास्त्री म्हणाला कीं, "नुसतंच काय बसायचं, जरा तोंड तरी हालवूं–भूक नाहीं, पण सहज आपलं—"

सुमारें अर्ध्या तासानें शास्त्री व अण्णा या दोघांचे बोजे सपशेल खाली झालेले आढळले. जादा पदार्थ म्हणून घेतलेले सर्व खलास झाले. सफरीस अन्नाचा तुटवडा पडणार कीं काय ही शंका माधवनें काढली. पण अण्णा म्हणाले, 'भिऊं नको, दशम्या भरपूर आहेत, आणि गडाच्या पायथ्याशीं आपण रसद वाढवूं, हाल होऊं देणार नाहीं.' आम्ही चालूं लागलों. सुमारें अर्धा तास चालल्यावर पावसाचे कांहीं शितोडे आले. बन्या म्हणाला 'उंः! दोन दोन तास अशा पावसांत क्रिकेटची मॅच नाहीं का खेळत आपण?' हें ऐकून आणखी एक पांच मिनिटें पुढें चाललों. एवढ्यांत आमचे कपडे सावकाशपणें भिजले. माझी ही भिजण्याची तिसरी खेप; सदऱ्याच्या आंत स्वेटर [उर्फ 'घाम्या'] घातला होता; त्यानें आपलें काम बजावल्यामुळें एका मुक्कामांत तो काढून सदऱ्याच्या वर मीं चढवला होता. दुसऱ्या मुक्कामापर्यंत सदराही भिजल्यामुळें दोन्ही कपडे काढून हातांत घेऊन मीं चाललों होतों. हा पाऊस सुरू झाल्यावर ते कपडे पुन्हां अंगांत घातले. कपडे भिजले तर भिजले, अंगावरच वाळतील; निदान सामान तरी सुरक्षित राहूं द्या म्हणून बोलत बोलत आम्ही चालत होतों. कोणाचें सहज लक्ष गेलें तों, अण्णांच्या पाठीवर रेकॉर्ड–पेटीचा गडद तपकिरी रंग उतरत होता. [तेवढ्या पावसांत गृहस्थानें त्या पेटींतूनच एक स्वच्छ परीटघडीचा शर्ट काढून अंगांत घातला!] बाकी इतरत्र नासधूस विशेष नव्हती. माझा उशीचा अभ्रा मात्र ठिकठिकाणीं 'उतरून' त्यांतून दशम्यांचे कोपरे हळूच डोकावीत होते. शास्त्रीची कांखपिशवी, बन्याचें पांडुतात्या–पाकीट व गरम मफलरखालीं झांकलेलें माधवचें गाठोडें हे बोजे मात्र कमीजास्त

प्रमाणांत जलाभेद्य [ वॉटरप्रूफ ] असल्यामुळें सहीसलामत राहिले. पाऊस पडतच होता.

शेवटीं सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें एक युक्ति करायचें ठरलें. सगळ्यांचे बोजे माधवाच्या डोक्यावर देऊन त्याला मध्यें चालवायचें व चौघांनीं आपापल्या काठ्यांना एका चादरीचा एकेक कोपरा बांधून माधवावर कनाथ धरून चालायचें. माधवाचा या युक्तीला जोराचा विरोध होता, सर्वांचा बोजा डोक्यावर घेऊन चालायचें त्यानें साफ नाकारलें.

"चांगला न्याय आहे!" तो कुरकुरला. "मी आपला गरीब सांपडलों म्हणून घाला आमच्या डोक्यावर! घेरी येईल मला !"

"तसं नव्हेरे, पण तूं ठेंगणा आहेस सगळ्यांत, वर चादर धरायला जागा राहील—"

"पुन्हां इतका मान कधीं मिळाला आहे कुणाला? तूं खालीं चालणार आणि आम्ही मात्र तुझ्या डोक्यावर छत धरून !"

"जसा कांहीं एकादा छत्रचामरधारी सम्राट् !"

"किंवा कुणब्याचा नवरदेव—"

"आणि सोपं आहे काम अगदीं. आम्ही चौघे जखडलेले, तूं मात्र स्वतंत्रपणें ऐटींत चांदव्याखालीं चालशील !"

माधवला गत्यंतरच नव्हतें. थोड्याच वेळात शत्रुपक्षाकडील सन्मान्यपणें स्वाधीन झालेल्या अम्मलदारासारखा माधव चालूं लागला. आमची उंची, काठ्यांची लांबी व त्या घट्ट धरण्याची पकड या गुणधर्मांत एकवाक्यता नसल्यामुळें थोडा त्रास झाला; पण हळूंहळूं सर्व जमलें. पिछाडीला बन्या व मी हे सावध सरदार खऱ्या अश्विनीकुमारांच्या चालीनें चालत असून, काफिल्याच्या आघाडीवर अण्णा व शास्त्री हे भाऊ भाऊ अक्षरशः जयविजयासारखे चालले होते. अण्णांची छडी वरच्या कनाथीचा आधारस्तंभ या नात्यानें कुचकामाची असल्यामुळें, ते चादरीचा एक कोपरा उंच केलेल्या हातांतच धरून "न खलु न खलु बाणः सन्निपात्योऽयमस्मिन्" असें दुष्यंताचें निवारण करीत जाणाऱ्या दुय्यम ऋषीसारखे जात होते. वाटचालीला संगीत नव्हतें. पण

माधवाची कुरकूर व आमचा हंशा या नादांत वेग चालू रहात होता. या एकंदर मिरवणुकीपुढें एक महाराची वाजंत्री ‘सख्या सजणा मनमोहना’ या चालीच्या चिजा वाजवीत जाणें तेवढेंच कमी होतें.

या खेपेला आम्हीं बरीच रपेट मारली. चालतां चालतां डुकली येण्याचा अनुभव येऊं लागला होता. सारखें चालत राहून आपण जन्मभर चालतच होतों असें वाटूं लागलें होतें. या बेसुमार चालण्यानें आपण कोठें जाऊं असे विचार डोक्यांत येत होते. पश्चिमेकडे मुखें करून या अखंड चालण्यानें एकदम पायाशीं अरबी समुद्राच्या लाटा खेळूं लागल्या असत्या तर कोणाला विशेषसें आश्चर्य वाटलें नसतें. वेळ कसा जातो तें कळत नव्हते, पंधरा मिनिटें म्हणजे पुरी रात्र वाटत होती. आम्ही चालण्यांत इतके गुंगलों होतों कीं पाऊस थांबून चांगला अर्धा-पाऊण तास झाल्यावरसुद्धां माधवाच्या डोक्यावरचा भार उतरण्याचें भान आम्हांला राहिलें नाहीं. तो कुरकुरत होता, पण त्यांत नवीन काय होतें? अखेर मध्येंच मोठ्यानें ओरडून सर्व बोजे बाजूच्या खड्ड्यांत फेंकून देण्याचा विचार जेव्हां त्यानें जाहीर केला तेव्हां आम्हीं आपआपलें सामान परत घेतलें —

—व संकेत ठरल्यासारखा पुन्हां जोराचा पाऊस आला.

पण आतां आम्ही बेछुट झालों होतों. जिवावर उदार होऊन [ व दशम्यांवर पाणी सोडून ] आम्ही पुढें चालूं लागलों.

ती धर्मशाळा व तें टोलनाकें आलें तेव्हां आम्हांला वाटलें पायथ्याचें डोणजें नाहीं, निदान अर्ध्या वाटेवरचें खडकवासलें तरी असेल; पण छेः! कोणा तरी विघ्नसंतोषी विधीनें पृथ्वीवरील सगळीं अन्तरें ताणून दसपट लांबवलीं होतीं. तें ठिकाण खडकवासल्याच्या अलीकडे पांच मैलावरचें कसलेसें खेडें होतें. पण पावसाच्या निमित्तानें तिथल्या धर्मशाळेंत [ म्हणजे तीन बाजूस भिंती असलेल्या एका पडवींत ] निवाऱ्याला गेलों व कसेबसे कुठें तरी टेकून जागा असेल तेथें हातपाय पसरून अस्ताव्यस्त झोंपीं गेलों.

पण झोंप काय इतकी सुखानें मिळते आहे? निवाऱ्यासाठीं त्या धर्मशाळेंत किमान पक्ष सत्तेचाळीस मावळे, दोन बैल, तीन शेळ्या व

आणखी अस्पष्टपणें दिसणारा एक प्राणी होता. त्यांतल्या एका शेळीनें शास्त्रीच्या लांब केंसाबद्दल कांहीं स्वार्थी गैरसमज करून घेतल्यामुळें शास्त्री किंचाळला व आम्ही जागे झालों.

त्या धर्मशाळेंतले मावळे मोठे अल्पसंतोषी लोक होते. नेसत्या लंगोटीइतक्या मर्यादित निवाऱ्यावर ते खूष होते. त्यांना घरच्यासारखें वाटत होतें. आडपडदा कांहीं नव्हताच त्यांच्यांत. आपापलीं सुखदुःखें ते आजूबाजूच्या लोकांना अगदीं खुल्या दिल्यानें [व खुल्या आवाजानें] सांगत होते. त्यांचे सर्व व्यवहार त्या ठराविक क्षेत्रफळांत होऊं शकत होते. चावट बन्यानें त्यांच्यामध्यें एकदम विजेच्या हातबत्तीचा झोत सोडून त्यांच्या खाजगी जीवनावर प्रकाश पाडण्याचा निंद्य प्रयत्न एकदां केला, त्याबरोबर इतकी खळबळ उडाली कीं वर सांगितलेल्या कोंपऱ्यांतल्या अस्पष्ट प्राण्यानें निषेधार्थी ‘हॉं ऽऽऽ!’ असें गर्जून आपली खातरजमा स्पष्टपणें करून दिली. धर्मशाळेंत पडलों असतांनाच मला, माधवला व बन्याला, आपण लोकांचे ( व किंचित् वेगळ्या आकाराच्या पायांचे ) बूट घातले आहेत ही तीव्र जाणीव झाली. बन्याला बूट वाजवीपेक्षां मोठा होत असल्यामुळें त्याचीं पायाचीं बोटें चालतांना दुमडूं लागलीं होतीं, माधवाला ‘टेनिस व चिखली रस्त्यानें चालणें या दोन कामगिऱ्या अगदीं परस्परविरोधी आहेत’ ही समज त्याचा–नव्हे त्याच्या कविमित्राचा–बूट देऊं लागला होता. मीं घातलेला सदू सुदाम्याचा क्रिकेट बूट त्या मूर्खानें इतका लहान कां घेतला होता कोणास ठाऊक, माझे पाय त्या घट्ट बुटावर अक्षरशः जळत होते. पण एकदां बूट काढला तर पुन्हां तो पायांत जाणार नाहीं या खात्रीनें व बाकीचा प्रवास अनवाणी करण्याच्या नापसंतीनें मीं बूट काढले नाहींत. बन्यानें माधवच्या मोज्यांचा जोड ज्यादा म्हणून पायावर चढवला, व फराळाच्या सामानांतल्या रद्दी कागदांनीं बुटांतील पोकळी भरल्या. पाऊस थांबलेला असल्यामुळें पुन्हां आमचा ‘काफिला–इ–खुळचट्’ रस्त्याला लागला.

या वेळीं एकंदर उदासीन वातावरण होतें; चन्द्र मंद व कींव केल्यासारखा चेहरा करून आम्हांला अंधुकपणें रस्ता दाखवीत होता. फौजेच्या

शिस्तींत ढिलाई आली होती. एकमेकांपासून अव्यवस्थित अंतरें ठेवून थांबत टेकत, लळत लोंबत, कण्हत कुंथत असे पांच असामी त्या रस्त्यानें जात होते. अण्णांची 'ह्याट' मागें लोंबत होती, शास्त्रीनें पटका असा गुंडाळला होता कीं, जणुं काय शोकाच्या भरांत अरेबिअन् नाइटस्मधल्या एखाद्या पात्रासारखा तो जमिनीवर आपटून पुन्हां आपला त्यानें कसातरी डोकीवर ठेवला होता. मीं माझी धुणें वाळत घालण्याची काठी गुराख्यासारखी आडवी मानेवर घेऊन, दोन हात त्यांत अडकवून, गुडघ्याला गुडघा घाशीत चाललों होतों. बन्यानें जरा थारेपालट म्हणून आपलें पांडुतात्या-पाकीट डोक्यावर घेतलें होतें. आणि माधव ! माधवनें तर एकंदर वाता-वरणाला पूर्णता आणण्यास आपल्या आकृतीनें फारच मदत केली होती. गांधी टोपीची चुंबळ त्यानें खिशांत घातली होती, मफलर डोक्यावरून हनुवटीखालीं बांधला होता, पाठीवर बांधलेल्या गाठोड्याच्या ओझ्यानें तो वाकला होता; डाव्या हातानें काठी टेंकीत व उजव्या हातांत ते मित्राचे चावणारे बूट अधांतरीं त्यांच्या वाद्यांनीं धरून तो मुकाट्यानें वाट चालत होता. पापपुण्याचें गाठोडें पाठीला बांधून, धाकधूक करणाऱ्या जीवाला मुठींत धरून, चित्रगुप्ताच्या हपिसांत हजेरी द्यायला जाणाऱ्या मोक्षाच्या यात्रेकरूसारखें त्याचें तें मार्गक्रमण होत होतें. कांहीं वेळानें हात अडतो म्हणून बुटाच्या वाद्या एकमेकांना बांधून त्यानें टाळ अडकवल्यासारखे ते बूट गळ्यांत घातले. तेवढ्या स्थितींत 'ते बूट एकमेकावर आपटून इकडे येण्याची बुद्धि देणाऱ्या चांभाराच्या देवाचें भजन कर' म्हणून त्याला कोणीं सुचविलें.

आम्ही चालत-नव्हे रखडतच-होतों. नेपोलियनच्या, रशियांतून परत येणाऱ्या सैन्यांतले शिपाई म्हणून आम्हाला ( शंभर पावलांवरून ) कोणी समजलें असतें. ( जवळ आल्यावर मात्र आमचा नूर त्यांनीं ताबडतोब ओळखला असता. ) वाटेंत एक बराच सपाट प्रदेश लागला. त्यांतून नक्षीदार वळणें घेत जाणारा रस्ता दूरवर दिसत होता. दूर टेकड्या, झाडी वगैरे धुरकट चंद्रप्रकाशांत अस्पष्ट व मोहक दिसत होतीं; अर्थात् ही सगळी घरीं आल्यावरची आठवण

आहे. त्या वेळेला कांहीं लक्षांतही येत नव्हतें निसर्गाच्या सौंदर्याचें रसपान करण्याची ती वेळ नव्हती. आमचें ध्येय होतें खडकवासलें. इतकें कुरूप, गद्य, व ओबडधोबड नांव सबंध मराठी भाषेंत नसेल; पण आम्हांला त्याची नुसती कल्पना नंदनवनासारखी वाटत होती...

एका वळणाजवळ एक चांगलें भक्कम चौरस, ऐसपेस घर एकटेंच उभें होतें. त्याच्या तळमजल्याच्या एका खिडकींत एक दिवा शांत व 'उबदार' प्रकाश देत होता; जणुं काय कोसचे कोस चालून येऊन शिणलेल्या वाटसरूची सरबराई तयार ठेवल्याची सूचना तो देत होता.

" मिशनऱ्याचं घर आहे हें एका " कोणी तरी घोगऱ्या आवाजांत म्हणाला.

आम्हाला वाटलें, पर्वा नाहीं. हा धार्मिक भेदभावच हिंदुस्थानची पायओढ करतो आहे. समजा, त्या मिशनऱ्यानें आमचें बाहेर येऊन स्वागत केलें व गरम पाण्याचें स्नान, भरपूर फराळ व शुभ्र चादरीअभ्रे असलेले मऊ बिछाने दिले, तर तो खिस्ती असला तरी काय झालें ? खिस्ती धर्म कांहीं तसा वाईट नाहीं; हो, इतका पाहुणचार करणारा तो मिशनरी असला, तर त्यानें शब्द टाकल्यावर खिस्ती होण्यास नाहीं म्हणायला जरा जडच जाईल आपल्याला, आणि समजा घेतला बाप्तिस्मा—

त्या रात्रीं तेथें कोण असेल त्या मिशनऱ्याला एखाद्या मार्क, ल्यूक किंवा जोसेफनें दृष्टांत दिला असता—किंवा नुसता ढेंकूण चावल्यामुळें जागा होऊन तो जरी बाहेर आला असता, तर प्रभू येशूच्या कळपांत पांच चुकलेलीं कोंकरें ओढून घेण्याचा त्याला चांगला मोका होता. त्याच्या घराजवळून जातांना आकाशांतल्या बापाला एक आरोळी द्यायचा अनिवार मोह आम्हांला झाला होता. तो आवरण्याच्या प्रयत्नांत मला इतका संताप आला कीं, वाटलें चीनमध्यें मिशनऱ्यांची वाट लावण्याचा राजमार्ग या रस्त्यालाच समजावें व तो बंगला लुटून आराम करावा. [ पण मी हिंदु असल्यामुळें हा विचार अर्थातच येतां-*येतांच नाहींसा झाला.* ]

अखेर एकदांचें खडकवासलें आलें. धरणाजवळच्या बागेंत आम्ही कसेबसे शिरलों. अर्थात् या वेळीं अंधार पडून पाऊस सुरू झालाच होता, व पाहणी करण्याच्या भरांत अण्णा धरणांत जलसमाधी घेण्याचे थोडक्यांत बचावले. आम्हांला त्या बागेंत आडोसा यथातथाच मिळाला. एका झाडाखालच्या मोठ्या लांकडी चौरंगावर आम्हीं आपलें सामान व देह टाकून दिले. कपडे, अन्नपाणी, वगैरे कशाचीही पर्वा वाटत नव्हती— पडणें, पसरणें व न उठणें हें एकच ध्येय होतें. त्या चौरंगाखालीं संकीर्ण प्राणी होते, वरती झाडींत कांहीं ' खसखस ' होत होतें, पाणी ठिबकत होतें, पावसाच्या व धरणाच्या सांडपाण्याचा घो घो आवाज होत होता, पण आम्हाला विश्रांतीच्या वेडानें पछाडलें होतें—झोंप झोंप ही एकच गोष्ट डोळ्यापुढें होती. आम्ही लंबायमान झाल्यावर माझी शेवटची आठवण म्हणजे अर्ध्या खाकी तुमानींतून उघड्या पडलेल्या माझ्या मांडीवर एक चरचरीत पायांचा जंतु सावकाश चढत होता; पण मला क्षिति नव्हती...

+ + +

पश्चिम दिग्विजयाची मोहिम या ठिकाणींच विराम पावली. आम्ही सिंहगडाच्या दिशेला खडकवासल्याच्या पुढें एक पाऊलही गेलों नाहीं. शिवाजी महाराजांनीं उच्चारलेल्या ऐतिहासिक उद्गारांच्या अगदीं उलट आमची कृति झाली. गड आला नाहीं, कारण सिंह गेलेच नाहींत. ' पर्वत महमदाकडे आला नाहीं तर महमदानें पर्वताकडे जायला पाहिजे ' ही इस्लामी म्हण आम्हीं खोटी ठरविली. [ हें हिंदुमहासभा व चातुर्वर्ण्याश्रम या संस्थांच्या निदर्शनास आम्ही नम्रपणें आणतों.] दुसऱ्या दिवशीं उठल्यावर एका बैठकीलाच उरलेलें पाथेय कसें खलास झालें, मग संध्याकाळच्या पोटपूजेसाठीं गांवांतून आणलेल्या शिध्यावरचे पाक–प्रयोग रात्रभर आम्हांला कसे भोंवले, नंतर तेथील 'देसी मिठाई'चे सुपरशिद्ध कारखानदार, (इथें राकेल पन मिळेल), नथ्थूशेट घीणाभाई यांना उदार आश्रय द्यायला गेलों असतां चुरमुऱ्याचे लाडू व साखरेचीं चित्रें यापलीकडे त्यांच्या पाककलेची भरारी धावत नसलेली

पाहून चुरमुरे खातच कसे बसलों, सर्व्हिस मोटारनें गुपचूप माधव कसा पळून पुण्यास गेला, त्याला शोधण्याच्या निमित्तानें अण्णा कसे निसटले, व मुख्य खजिना त्यांच्याबरोबर गेल्यामुळें आम्हाला पायीं परतणें कसें भाग आलें, कालव्यांत उडी टाकून प्रवाहावर नुसतें तरंगत पुण्यास पोहोंचण्याची शक्कल बन्यानें कशी काढली, [ त्या मूर्खाला असें वाटत होतें कीं काय कोण जाणें, कीं शहरापर्यंत पाण्याच्या मार्गानें जाऊन घरांतून तोटी सोडल्यावर आजींपुढें दत्त म्हणून उभें राहतां येईल ] त्याला मी व शास्त्रीनें पाण्यांत ढकलल्यावर जलमार्गानें प्रवास करण्याचा विचार त्यानें ताबडतोब कसा बदलला, अखेर आम्हीं तिघे खुष्कीच्या मार्गानेंच दरमजल दरकूच करीत पुण्याला परत कसे आलों, पण त्या आधींच्या रात्रीं धरणाजवळच्या बागेंतून हकालपट्टी झाल्यामुळें टेकडीवरच्या मरीआईच्या पडीक देवळांत कशी रात्र काढली, त्या रात्रीं वहिवाटीच्या हक्कानें त्या देवळांत निजत असलेल्या जनावरांचे वरचेवर होणारे हल्ले आम्हीं कसे परतवले, सकाळीं उठून पुण्यास हळूहळू परत आलों तेव्हां पुणें किती सुंदर दिसलें, पुण्यास पोहोंचल्यावर गडाची चढण, वरची हवा, वरून दिसणारा देखावा, मनांत येणारे विचार, गंगाटांक्याचें पाणी, टिळकांचा बंगला, राजारामाची छत्री, आम्हीं नेटानें मारलेल्या मजला, सोसलेले हाल—पण अखेर पुरी केलेली प्रतिज्ञा, वगैरे गोष्टींची सविस्तर चर्चा ओळखीच्या मंडळींत फाजिल विनय दाखवीत कशी केली वगैरे वर्णन लिहिण्यास एक ग्रंथ पुरणार नाहीं, [ व तो कोणी वाचणारही नाहीं ] म्हणून इथेंच आटपतें घेतलेलें बरें. सांगायचें एवढेंच कीं, आम्हीं सिंहगडाला कितपत गेलों याची अधिकृत हकीकत आज बाहेर पडत आहे. या हकीकतीनें सावध होऊन, प्रवासाच्या बढाया मारणाऱ्या लोकांवर कितपत विश्वास ठेवायचा हें वाचकांनीं ठरवावें.

———

# सालाबादप्रमाणें....

## — १ —

[ **नोटीसः**—खोलीखोलींतून फिरविलेली ]

सालाबादप्रमाणें यंदाही श्रीगणेशोत्सव ( जुन्या पंचागाप्रमाणें ) श्री बागवाडी चाळ दक्षिणी ब्राह्मण संघाचे विद्यमानें करण्याचें योजिलें आहे. तन्निमित्त उपर्युक्त संघाची सर्वसाधारण सभा चाळ नं. १ व २ चे मधील चौकांत रात्रीं ९ वाजतां भरविण्यांत येणार आहे, तरी सर्व मेंबर्सना हजर राहण्याची विनंति आहे.

टीप—१. सभेंत शांतता राहावी, म्हणून आपलीं मुलें न आणण्याची कृपा करावी.

२. सभा चालू असतां वरच्या खोल्यांतून चौकांत कोणी केरकचरा टाकणार नाहीं अशी आशा आहे.

३. सभेच्या वेळीं चौकाच्या कोपऱ्यांतील मोरींत गड्यांना भांडीं घासण्यास मेहेरबानी करून पाठवूं नये.

मेंबर्सनीं आपापल्या खोलीनंबरापुढें सह्या कराव्या.

सही ( दुर्वाच्य, मोडी )

मुंबई ता.......                चिटणीस,

—श्री बा. चा. द. ब्रा. सं.

( वरील नोटिशीवर सुमारें पंचवीस बिनहरकत सह्या, एक प्रश्नचिन्ह, 'वेळ नाहीं' 'ही तारीख कोणी ठरविली' 'सभा तहकूब करावी' 'आमचे घरीं अडचण आहे' 'सभेनंतर कॉफी पाहिजे' इ. छोटे शेरे, पांचसहा कोऱ्या जागा, व पुढील विस्तृत शेरेः—

'जुन्या पंचांगाप्रमाणे गणपति उत्सव करणें ही दक्षिणी ब्राह्मणांना लाजिरवाणी गोष्ट आहे. टिळकांच्या स्मृतीचा असा अपमान करण्यांत चिटणिसांनीं काय साधलें तें समजत नाहीं.' —सी. म. महाबळ

'गणपतिउत्सव करण्याचें कांहीं प्रयोजनच उरलें नाहीं. टिळकांनीं सुरू केलेल्या या उत्सवाचा हेतु केव्हांच साध्य झाला आहे. तरी उत्सव करून मेंबर्सचे पैसे व वेळ व्यर्थ वाया घालवूं नये.'

—अतुलकुमार ( ठोंबरे )

'संघास या उत्सवांत पुढाकार घेण्याचा अधिकार काय? गत-वर्षींप्रमाणें यंदाही उत्सवासाठीं खास कमिटी निवडण्यांत आली पाहिजे'

—गो. लं. महाशब्दे

------

— २ —

[ वरील सभेचा चिटणिसांनीं लिहिलेला वृत्तांत (Minutes).]

आगाऊ नोटीस काढून बोलावलेली श्री बागवाडी चाळ द. ब्रा. संघाची साधारण सभा नियुक्त ठिकाणीं रात्रीं पावणेदहाला भरली. सुमारें चाळीस मेंबर हजर होते. अध्यक्षस्थानीं सर्वानुमतें रा. रा. जनूभाऊ जेजुरीकर यांची निवड झाली. सभेच्या कामास सुरवात होण्याच्या आधीं नोटिशीवर आपलीं मतें लिहिणाऱ्या लोकांविषयीं चिटणिसांनीं निषेध व्यक्त केला, त्यावर कांहीं मेंबर्सनीं हरकत घेतली. एक तहकुबीची सूचना आली, ती बहुमतानें फेंटाळली गेल्यातर हरकत घेणाऱ्या मेंबर्सनीं सभेंतून वॉक-औट केला व सभेच्या कामास रीतसर सुरवात झाली.

१. श्री. ठोंबरे यांची 'उत्सव करूं नये' ही सूचना अध्यक्षांनीं नियमबाह्य ठरविली.

२. उत्सवाची तारीख ठरविण्याचे वेळीं दोन पंचागांच्या अनु-यायांत थोडा वाद झाला. एका पक्षाच्या एकदोन गृहस्थांनीं विरुद्ध पक्षास बोलूं दिलें नाहीं, व सारखा अडथळा आणण्यास सुरवात केली; तेव्हां अध्यक्षांनीं त्यांना गप्प बसण्यास सांगितलें. सदरहू गृहस्थांनीं उलट

अध्यक्षांचे विषयीं च ग्राम्य भाषा वापरल्यामुळें अध्यक्षांनीं त्यांना सभेबाहेर जाण्याचा हुकूम केला. पण ते जाईनात, तेव्हां अध्यक्षच रागावून सभा सोडून चालते झाले. त्यांची समजून करून त्यांना परत आणण्यांत पंधरा मिनिटें गेलीं. अखेर ग्राम्य भाषा वापरणाऱ्या गृहस्थांनीं दिलगिरी व्यक्त केल्यावर अध्यक्ष पुन्हां स्थानापन्न झाले. दरम्यान वॉक औटवाले मुकास्यानें परत येऊन बसले होते.

३. वरील मजकूर मिनिट-बुकांतून काढून टाकावा असें बहुमतानें ठरल्यावरून त्यावर काट मारण्यांत येत आहे.

४. नोकरीपेशाचे सोईसाठीं जुन्या पंचांगाप्रमाणें उत्सव करण्याचा ठराव पास झाला. धोंडोपंत जानवीजोडवाले, धेनुदास हंबरडे व सोन्याबापू सुगंधी यांनीं ' या गुलामगिरीच्या व्यवस्थेला कुरकुरत [ अंडर प्रॉटेस्ट ] अनुमति दिल्याचें ' मिनिट-बुकांत नोंदण्यास सांगितलें.

५. बरीच चर्चा होऊन संघाच्या मॅनेजिंग कमिटींतील निम्मे व इतर निम्मे असे मेंबर मिळून उत्सवमंडळ नेमण्याचें ठरलें. या मंडळानें आणखी हवे ते लोक आपल्यांत सामील करून घ्यावे अशी त्यांना सवलत देण्यांत आली. हें मंडळ लगेच तयार झालें व अखेर त्याचे अठ्ठावीस सदस्य असल्याचें आढळून आलें.

६. गणेशोत्सव मंडळाला वर्गणी गोळा करण्याचा, व तिचा विनियोग करण्याचा अधिकार देण्यांत आला व मंडळानें हिशेब उत्सवाअखेर एक सार्वजनिक सभा बोलावून तिच्या समोर ठेवावे असें ठरलें.

७. वर्गणीचा प्रश्न याच सभेंत नक्की व्हावा असें कांहीं सभासदांचें म्हणणें पडल्यावरून निर्णय ठरविण्यांत आला. विष्णुपंत कुबेर यांची माणशीं दहा रुपये ही सूचना व सुदामराव भणगे यांची एक आणा डोईपट्टीची कल्पना, दोन्ही बाजूंस राहून अखेर भाड्याच्या प्रमाणांत वर्गणी वसूल करण्याचें एकवीस विरुद्ध एकोणीस मतांनीं ठरलें. लगेच उशिर झाला असल्यामुळें अध्यक्षांच्या आभाराबरोबर सभा बरखास्त झाली.

सही दुर्बोध ] चिटणीस,
श्री बा. चा. द. ब्रा. सं.

## — ३ —

[ छापील कार्यक्रम ]

**श्री बागवाडी चाळ**
**दक्षिणी ब्राम्हणसंघ**
**सार्वजनिक गणेशोत्सव**

**सोमवार**–सकाळीं-८ वा. श्रींचें आगमन, स्थापना, आरती, प्रसाद वगैरे. संध्याकाळीं ७ वा. ' तैत्तिरीय ब्राह्मणांतील शंकास्थानें '–व्याख्याते श्री. गं. श्री. रेडके, नाशिककर. अध्यक्ष–रा. दादासाहेब ढोले. ८ वा. आरती, मंत्रपुष्प,प्रसाद. १० वा. राष्ट्रवीर्यरसोत्तेजक मेळ्याचा कार्यक्रम.

**मंगळवार**–( सोमवारप्रमाणेंच उत्सव चालू असेपर्यंत सकाळ संध्याकाळ आठ वाजतां आरती इ. होईल. फक्त इतर कार्यक्रम खालीं छापले आहेत.) दुपारीं ३ वा. स्त्रियांसाठीं कीर्तन–गं. भा. ठमाबाई दुसे. रात्रीं ९ वा. नटरत्न ढेपे यांच्या नकला.

**बुधवार**–दुपारीं स्त्रियांसाठीं व्याख्यान– सौ. गंगाबाई गांवदेवीकर ' स्त्रियांची आर्थिक उन्नति '

रात्रीं–म्याजिक ल्यांटर्न–'डांसांची उत्पत्ति ' व्याख्याते–घोडेकर मास्तर.

**गुरुवार**–दुपारीं ४ वा. स्त्रिया व मुलें यांचेसाठीं पोवाडे. शाहीर–धोंडू-भाऊ धुमाळ. रात्रीं ९-३० गणपत्यथर्वशीर्षपठण.

**शुक्रवार**–सकाळीं ८ ३० बलभीमबलमंडळाच्या विद्यार्थ्यांचे कवायतीचे प्रयोग. दुपारीं ३ वा. स्त्रियांच्या कलाकौशल्याचें प्रदर्शन. रात्रीं ९-३० संगीत सुविचारविजय नाटक.

**शनिवार**–दुपारीं ४ वा.–चाळींतील स्त्रियांचें हळदीकुंकू. रात्रीं ९ वा.– ' पराक्रमी पूर्वजांची पुण्याई ' व्याख्याते रा. पांडुअण्णा पुणेकर, अध्यक्ष–श्री. नानासाहेब झब्बू.

**रविवार**–सकाळीं ८–३० पासून बुद्धिबळें, गंजिफा, सोंगट्या, भंड्या वगैरे खेळांच्या चढाओढी [ शेवटचे सामने ] दुपारीं ३–३० फुगड्या, झिम्मा, फेर वगैरे खास स्त्रियांचा कार्यक्रम. रात्रीं ८–१५ ते

११ **भोजन** [ महाप्रसाद ].

**सोमवार**–सकाळीं ७–३०–व्याख्यान ‘आहारनियंत्रण व बद्धकोष्ठता’ व्याख्याते–रा. का. म. कोलसे, अध्यक्ष रा. वि. मां. भोजने. रात्रीं–९ नंतर मंत्रजागर. संगीतसूर्य व्यंकटप्पा बकासूर यांचें गायन व दुग्धपान.

**मंगळवार**–सकाळीं ७–अल्पोपहार [ फक्त स्वयंसेवकांसाठीं ]

दुपारीं ३–स्त्रियांचा बक्षिससमारंभ, अध्यक्ष श्री. सौ. सोनामुखे.

रात्रीं स्थानिक कार्यक्रम व वर्गणीदारांस पानसुपारी.

**बुधवार**–सकाळीं ८ समारोपाचीं व्याख्यानें. संध्याकाळीं ६–३० **श्रीचें** विसर्जन.

चिटणीस,

श्री **बा. चा. द. ब्रा. संघ**

---

– ४ –

[ चाळीच्या बोर्डावर नोटीस ]

कार्यक्रमाविषयीं सूचना, तक्रारी वगैरे नमूद करण्यासाठीं बोर्डा-शेजारीं एक वही टांगून ठेवली आहे. त्या वहींत चाळीच्या रहिवाशांनीं आपल्याला जें कळविणें असेल तें लिहून ठेवावें.

( सही ) सेक्रेटरी

---

५

( वरील वहींतील निवडक उतारे )

‘कार्यक्रम ठरवितांना खोलीखोलींतून पाठवून पास करून कां घेतला नाहीं ?’

‘स्त्रियांच्या कार्यक्रमासाठीं पुरुषांना यावेसें वाटल्यास काय सोय आहे ?’

'आमच्या तिसऱ्या मुलाला मंगळवारीं रात्रींच्या आरतीला खिरापत मिळाली नाहीं. कोण ही अंदाधुंदी ?'

'आमच्या कुटुंबाची एक नवी चप्पल बदलली आहे. कोणाला सांपडल्यास सेक्रेटरी यांस द्यावी.'

'खोली नं. ११५ मधील काठे नांवाचे गृहस्थ बायकांची टिंगल करतात. त्यांची व्यवस्था व्हावी.'

'स्वतः सेक्रेटरी कारणाशिवाय बायकांच्या पुढें पुढें करून ओळखी करतांना आढळतात.'

'कार्यक्रमास पोरेंबाळें आणणाऱ्यांनीं त्यांचे सर्व विधी आधींच उरकून यावे म्हणजे इतर प्रेक्षकांस उपद्रव होणार नाहीं.'

'शुक्रवार सकाळच्या कवायतीच्या कार्यक्रमास एक मुसलमान दारांत येऊन डोकावत होता. त्यामुळें कांहीं लोकांना खोलींत जाऊन आंतून कड्या घालून बसणें भाग पडलें. तरी गर्दीचे वेळीं पोलीसचा बंदोबस्त व्हावा.'

'हळदीकुंकवाचे वेळीं आमच्या मंडळींचा अपमान झाला. सेक्रेटरी व प्रेसिडेंट यांच्या पत्नी फार तोऱ्यानें वागतात अशी तक्रार आहे.'

'नाटकाला आमच्या सातआठ पाहुण्यांना सोडण्यांत आलें नाहीं, मग आम्हीं दीड रुपया वर्गणी कशासाठीं दिली ?'

'कार्यक्रमांतील व्याख्यानें फक्त साठ वर्षें वयावरील लोकांसाठीं आहेत हा इशारा आधीं कां देण्यांत आला नाहीं ?'

'मी नाटकाचे दिवसापासून आजारी आहे तरी माझी अर्धी वर्गणी परत द्यावी.'

---

## ६

['जनमत' दैनिकांतील बातमी]

बागवाडी चाळींतील स्त्रियांच्या कलाकाशल्य प्रदर्शनाला आमचा प्रतिनिधि गेला होता. कलाकौशल्य पूर्वीप्रमाणेंच भरपूर आढळून आलें. प्रदर्शितें मुख्यत्वेंकरून खालील प्रकारचीं होतीं:—

मण्यांचीं तबकें [ फ्रेमसह ]—सोळा.

विणलेले रुमाल—एकवीस.

,, गळपट्टे -- नऊ.

,, टोपड्डीं—अकरा.

,, मोजेजोड—चार.

मेलिन्स फूडचीं नटविलेलीं बाळें-चोवीस.

मखमलीवर भरलेले पोपट– अठरा.

,, फोटो–फ्रेम्स,

वेल्कम् पाट्या वगैरे–सात.

क्रॉस स्टिचेसचीं जनावरांचीं चित्रें सात, कांटेरी हलवा, कागदी फुलें, टेबल–क्लॉथस् वगैरे किरकोळ माल. त्याचप्रमाणें कपडे नेसविलेलीं रविवर्म्यांचीं चित्रें, बांगड्यांच्या कांचांचे साखळदंड, बाटल्यांतले पलंग इ.

सर्व भगिनींना बक्षिसें देण्यांत आल्यामुळें कार्यक्रम यशस्वी झाला.

———

## ७

( अध्यक्षांनीं चिटणिसांना पाठविलेली खासगी चिठ्ठी )

काल चौकांत मॅनेजिंग कमिटीचे मेंबर व टीकाकार यांच्या झालेल्या लठ्ठालठ्ठीची बातमी बाहेर फुटूं न देण्याचा शक्य तों प्रयत्न करावा.

———

## ८

(चाळीजवळच्या डॉक्टरांकडे आलेल्या ९ चिठ्यांचा 'सर्वांळा')

**अर्जंट**

अपचनावर कांहीं जालीम औषध चिठी आणणाऱ्या मुलाबरोबर पाठवून द्यावें.

-----

## ९

(जी चिठी कु. कुमुद मराठे हिनें आपल्या वडिलांच्या स्वाधीन केल्यामुळें तात्या टवाळे नामक इसम घाईघाईनें चाळींतून पसार झाला व त्यानें आपलें समानसुमान विश्वासू मित्रांकरवीं चाळींतून हालविलें.)

प्रिय कुमुदिनी,

उत्सवाच्या मंगल कार्यक्रमांत रोज आपली नेत्रपल्लवी होत होती, खरें ना ? तुझ्या त्या नयनबाणांनीं मी विद्ध झालों आहे. माझ्या हृदयाच्या शुद्ध चिरंतन प्रेमाची साक्ष तुला पटली असली तर तूं मला कोठें भेटशील ?

( उत्तर चौकांतील केराच्या डब्याखालीं ठेवावें )

देवी, कायमचा तुझाच
किशोर ( तात्या टवाळे )

---

## १०

( आगटे वकील यांनीं चाळींतील गंपूनाना कुलकर्णी यांस पाठविलेली नोटीस )

...ज्यापक्षीं ता.–रोजीं संध्याकाळीं तुम्हीं आमचे अशील प्रभाकर नरहर उपाध्ये यांचे अंगातील नवा कोट पाहून 'गणपती उत्सव लाभलेला दिसतो' असें बदनामीकारक विधान केलेंत, त्यापक्षीं तुमची जाहीर लेखी माफी या नोटिशीचे खर्चासह चोवीस तासांचे आंत न आल्यास तुमच्या विरुद्ध कायदेशीर इलाज (फौजदारी व दिवाणी) करण्यास आमचे अशिलास भाग पडेल, कळावें.

त्रिं. चिं. आगटे
ॲडव्होकेट

## ११

( चिटणिसांनीं पाठविलेलें पत्र खाजगी )

संपादक ' जनमत ' यांस

आमच्या गणेशोत्सवाचा सोबतचा त्रोटक अहवाल प्रसिद्धीसाठीं पाठवीत आहे. बरोबर नांवांची यादीही आहे. आपल्या व्याख्यानासाठीं मीं केलेली खटपट ( जी चाळींतील शिष्टांनीं व्यर्थ केली ) आपल्या स्मरणांत असेलच. सर्व वृत्तांताला जागा नसल्यास निदान माझ्या एकट्यापुरता मजकूर तरी कसेंही करून छापावाच.

आपला स्नेहांकित,
(सही)
चिटणीस, इ. इ.

---

## १२

[ चाळीच्या मालकाला भेटायला गेलेल्या चिटणिसांनीं आपल्या व्हिजिटिंग कार्डावर लिहिलेला मजकूर ]

उत्सवाच्या निमित्तानें परिचय झालाच आहे. श्रीमंतांच्या भेटीसाठीं सहज आलों आहे.

मालकाचें स्वदस्तुरचें उत्तर—बाहेर गेले आहेत.

---

## १३

[ चिटणिसांची अध्यक्षांना चिठी ]

माझी प्रकृति एकाएकीं बिघडल्यामुळें मी चार दिवस हवा पालटण्यास ठाण्याला जात आहे. हिशेब आपल्याला योग्य वाटेल त्याप्रमाणें सभेपुढें ठेवून पास करून घ्यावे.

---

## १४

( अध्यक्षांनीं काढलेलें विनंतिपत्र )

उत्सवानिमित्त झालेल्या खर्चांत सुमारें सव्वाशें रुपयांची तूट आल्यामुळें मेंबर्सनीं यथाशक्ति मदत करून तूट भरून काढण्यास सहाय्य करावें अशी विनंति आहे.

---

## १५

( मॅनेजिंग कमिटींतील एका सभासदानें आपल्या स्नेह्यास पाठविलेल्या पत्रांतील उतारा. )

...चौपाटीवर विसर्जनासाठीं नेलेला गणपती इतरांच्या ओळीला ठेवून आम्ही जरा भेळ खाण्यास बाजूला गेलों. परत आल्यावर आमचा गणपति लौकर सांपडेना; कारण उत्सवकमिटींतल्या कोणत्याच माणसाला गणपति नीटसा पाहण्यास वेळ मिळाला नव्हता. अखेर एक कोणता तरी गणपती उचलून बुडवला व घरीं आलों. पण भानगड झालीच ! दुसऱ्या दिवशीं बुजबुजवाडींतल्या सेक्रेटरीची चिठ्ठी आली कीं, सर्वांच्या शेवटीं ते लोक विसर्जनाला गेले असतां एक बेवारशी गणपति त्यांना चौपाटीवर आढळला. त्याच्या पाठीवर पेन्सिलीनें 'बागवाडी चाळ' म्हणून लिहिलें होतें. त्या उपद्व्यापी गृहस्थानें तो गणपति परत नेला होता, व 'आतां घेऊन जा' म्हणून चिठींत लिहिलें होतें. घाईघाईनें तिकडे जाऊन त्याला जरा सोडालेमन पाजून आम्हीं गप्प केलें. आतां, न बुडविलेल्या गणपतीचें करायचें काय, हा प्रश्न पडला. आमच्यांतले व्यापारी मामा कानडे यांनीं मग युक्ति सांगितली, व त्याप्रमाणें गणपतीविक्यालाच तो गणपती पांच रुपयाला परत विकला, व पुढील वर्षी त्याच्याकडून तो पुन्हां विकत घेण्याचें वचन देऊन, श्रीगणेशाचे कृपेनें सिनेमाला जाऊन टॅक्सींतून परत घरीं आलों.

---

# सत्कार-समारंभ

( स्थळः—" साहित्य शौंडमंडळा "नें वेळेपुरता भाड्यानें घेतलेला दिवाणखाना.

कुजबूज, गलबला, मधून मधून हंशा. एका कोंपऱ्यांत विभाकर, श्रीरंग, बलदेव व यामिनी बोलत आहेत. )

**श्रीरंग**–( जांभई देत ) ही बया येणार आहे का नाहीं ?

**यामिनी**–शऽऽऽऽऽऽऽ, असं काय म्हणतां ? ती राजकुमारी आहे–

**बलदेव**–माहिती आहे ! टीचभर संस्थानच्या राजाची पुतणी ! हें भुरुंद संस्थान कधीं ऐकलंही नव्हतं ! नकाशांत तर सांपडलंच नाहीं कुठें–

**विभाकर**–तें सठाणें तालुक्याच्या नकाशांत आग्नेई दिशेला सांपडेल, भुरुंद संस्थानचें क्षेत्रफळ व उत्पन्न अनुक्रमें—

**बलदेव**–ए दादा, माफ कर, विशेष माहितीसाठीं आम्ही ज्ञानकोश पाहूं !

**श्रीरंग**–पण ही बाई वेळेवर आली नाहीं तर आम्हीं कां म्हणून वाट पहावी ? मिरासदार वर्गाची मिजास राखण्याचे दिवस आतां गेले, श्रमजीवी दलितवर्गाच्या–

**बलदेव**–ए भाई, तूंही माफ कर.

**यामिनी**–पण कांहो, या बाईला कशासाठीं इथं बोलावलं आहे ? आपण कशाला जमलों आहोंत ? मला कांहीं माहिती नाहीं. तुम्ही बोलावलंत आणि मी आलें—

**विभाकर**–वाः माहिती नाहीं तुम्हांला ? अहो, ही राजकन्या मोठी सुशिक्षित, सुसंस्कृत, रसिक, ललितकलांची पुरस्कर्ती, सुंदर, तरुण आणि सद्गुणी आहे–

**बलदेव**—मग त्यांत काय आहे ? वर्तमानपत्रें पाहिलीं, तर सगळ्याच राजकन्या अशा आढळतात—

**श्रीरंग**—पण ती श्रीमंत व उदार आहे—

**यामिनी**—काय म्हणतां ?

**विभाकर**—साहित्यसंवर्धिनी सभेला तिनें आपला अडतीस पुस्तकांचा भव्य संग्रह दिला; नाट्यसंघाला पांच रुपयांची देणगी देऊन ती तहाहयात सभासद झाली आहे, संस्थानांत झालेल्या काव्यगायनाच्या वेळीं तिनें प्रत्येक कवीला एक नारळ दिला, राजवाड्याबाहेरच्या भिंतींवरून होतकरू चित्रकारांना चित्रें काढण्याची परवानगी तिनें स्वतः खटपट करून देवविली—इतकेंच नव्हे, तर त्यांना रंगासाठीं पाणीही पुरवलें—

**बलदेव**—सबूर ! छेः ललितकलांना केवढं अचाट उत्तेजन हें !

**श्रीरंग**—पण जनतेसाठीं तिनें काय केलें ? श्रमजीवी दलित वर्गाच्या—

**यामिनी**—स्त्रियांच्या उन्नतीला कांहीं हातभार लावलान् कीं नाहीं ?

**विभाकर**—अलबत् ! राजधानींतले दरोबस्त गस्तीचे शिपाई काढून, तिरीमिरीनें पुरुषांना शिव्या देणाऱ्या बायांचा एक ताफा नेमला आहे तिनें—

**बलदेव**—अरे बापरे ! पण ए, ती स्वतः कशी काय आहे ?

**विभाकर**—तिची उमर सुमारें अठरा वर्षांची असून, बांधा मध्यम, रंग सांवळा, नाक-डोळे रेखीव—

**श्रीरंग**—आलं लक्षांत, सर्व राजकन्यांसारखी—

**बलदेव**—पण काय रे, जात किती नखी आहे ? दांत मोजून पाहिलेस कीं नाहीं ? आणि रात्रीं बांधून नाहीं ना ठेवावी लागत ?

**यामिनी**—पुरे करा वात्रटपणा ! कांहो विभाकर, कपड्यादागिन्यांचा षोक आहे तिला का साधी आहे ?

**विभाकर**—राजकुमारीची वेषभूषा साधी पण मोहक—

**श्रीरंग**—साधी राहण्यांत उपकार नाहीं करीत कोणावर ! राज्यांतले लोक भुकेकंगाल असतांना छानछोकी करण्याची काय हिंमत आहे तिची ? श्रमजीवी दलित वर्गाच्या—

**बलदेव**-बरं, आपण तिला कशाला बोलावली आहे हें अजून कळलंच नाहीं—

**यामिनी**-तेंच मीं मघांपासून विचारायचा प्रयत्न करतें आहे—

**विभाकर**-राजकन्येचें ललितकलांविषयींचें प्रेम लक्षांत घेऊन, आपल्या या साहित्यशौंडमंडळांत कांहीं निवडक कलावंताना भेटविण्यासाठीं तिला आणण्याचें योजलें आहे. या गोड समारंभा—

**बलदेव**-आलं लक्षांत ! तूं स्वागतमंडळाचा प्रमुख दिसतो आहेस ! तुला स्वतःची नक्कल पाठ आहे अगदीं-इतकंच नव्हे तर वृत्तपत्रांतला 'रपोट'ही तयार दिसतो आहे तुझ्याजवळ !

**विभाकर**-(खूष होऊन) ह्यः ह्यः ह्यः !

**यामिनी**-पण हे कलावन्त कोण आहेत सांग तरी-

**श्रीरंग**-वा, माहित नाहीं का तुम्हाला ? साहित्यातर्फे आपला युगप्रवर्तक लघुकथालेखक नाना प्रधान-

**बलदेव**-नाना प्रधान ? तो कधीं साहित्यिक झाला ? शॉर्टहँड टायपिस्ट तो !

**विभाकर**-हो का ? मग लघुलेखकालाच लघुकथालेखक धरून चाललों होतों आम्ही ! समजुतीचा घोंटाळा झाला-असो, तुम्हांला माहित नसेल, लघुलिपीचा शोध सर ऐझाक पिटमन यानें इसवी सन-

**बलदेव**-ए, हा माहितीचा नळ जरा बंद कर. हा नान्या आतां साहित्यिक ठरला खरा-

**श्रीरंग**-लिहिण्याचं बरंचसं साहित्य ऑफिसांतून आणून सांठवलं आहे त्यानं-

**यामिनी**-चालेल, तेवढ्या पुंजीवर आजच्या समारंभाला खुशाल साहित्यिक होऊं द्या त्याला !

**विभाकर**-तें ठीक आहे, पण आपला साहित्यिकच खोटा निघाल्यावर प्रकाशनसमारंभ कसला करायचा ? आजच्या कार्यक्रमावर 'प्रकाशनसमारंभ' म्हणून एक मोघम सदर ठेवलें आहे-

**बलदेव**—या डोक्यावरच्या विजेच्या दिव्याखेरीज प्रकाशनसमारंभाला योग्य असें कांहीं दिसत नाहीं—

**यामिनी**—पुरे करा, तें सदर गाळून टाकूं. दुसरा कलावन्त कोण ?

**श्रीरंग**—चित्रकार दामू नाफडे—

**बलदेव**—अरेच्या ! तो नांवाच्या पाट्या रंगवणारा ?

**विभाकर**—आपल्या मंडळाची पाटी त्यानें फुकट रंगवून दिली आहे त्याचा पुरस्कार आपण केलाच पाहिजे. शिवाय नांवें, अक्षरें किंवा लिपी यांचा अंतिम उगम चित्रापासूनच झाला हें मिसर देशांत सांपडलेल्या—

**यामिनी**—बरं, नाट्यकलेचा प्रतिनिधि कोण ?

**बलदेव**—आपले उत्साही चिटणीस ! नाटकीपणा पुरा भरला आहे त्यांच्या अंगांत !

**श्रीरंग**—पुरे कर रे ! नाट्यकलेतर्फे आपला बाबू जोशी आहे; एका नाटककाराचा आश्रित म्हणून राहतो तो—

**यामिनी**—चुकत असाल, तोच त्या नाटककाराला पोशीत असेल !

**विभाकर**—बोलपटकलेतर्फें विख्यात नेपथ्यकार शिवा दरेकर येणार आहे—

**बलदेव**—तो न्हावी ?

**श्रीरंग**—चूप ! 'मेकपमास्तर' आहे तो; पुन्हां आपण जातीभेद पाळीत नाहीं. परवांच चणेफुटाणे भोजनांत त्याला पंक्तीला नव्हता का घेतला ?

**यामिनी**—राहतां राहिलें काव्य आणि संगीत—

**श्रीरंग**—तच मी म्हणत होतों. मी कवि आणि—

**यामिनी**—तुम्ही कवि ?

**बलदेव**—तूं कवी ? बाहेर हो आधीं—

**विभाकर**—थांबा, त्याचें म्हणणें तर ऐकून घ्या.

**यामिनी**—म्हणणें कसचें ऐकतां ? मायादेखील फूटपट्टीनें मोजणारे हे गृहस्थ—

**विभाकर**–माया हा द्व्यर्थी शब्द आहे; माया म्हणजे ममता व माया म्हणजे धनदौलत; या शब्दाच्या उपपत्तीविषयीं–

**श्रीरंग**–दोन्ही अर्थांनीं मी मायेचा भुकेला आहे, म्हणून तर कवि झालों.

**बलदेव**–तूं कविता तरी कसली करतोस ? बाजारभाव कीं मेट्रिक सिस्टीमवर ? कीं एखादी महामाया तुझी स्फूर्तिदेवता आहे ?

**श्रीरंग**–मी मानव्याचा कवि आहे.

**यामिनी**–मानव्य ?

**विभाकर**–मानव या शब्दावरून मनुष्याचे मूलभूत गुणधर्म विशद करणारा मानव्य हा शब्द झालेला आहे. मानव हें मनु या नांवा–

**श्रीरंग**–कार्ल मार्क्सच्या महाकाव्यांचें मी समश्लोकी भाषांतर करीत आहें. श्रमजीवी दलित वर्गाच्या––

**बलदेव**–खामोश ! पुन्हां तें उच्चारशील तर नरडें दाबून टाकीन.

**यामिनी**–यांचें म्हणणें तर ऐकूं द्या–

**विभाकर**–मराठींत सांगेल तो–

**श्रीरंग**––श्रमजीवी–म्हणजे–काबाडकष्ट करून कसेबसें पोट भरणाऱ्या गरीब बापुड्यांचीं गाऱ्हाणीं–[ अडखळतो ]

**बलदेव**–चालेल, पुढें बोल.

**श्रीरंग**–( चिडून ) पुढें काय बोल ? कपाळ ? इतक्या वेळां मी बोलायचा प्रयत्न केला, मला कोणीं वाक्य पुरे करूं देत नाहीं. आतां विसरलों मीं काय म्हणणार होतों तें–

**यामिनी**–पण पालुपद होतं तें, तेंच कसं विसरलांत ?

**विभाकर**–मीं सांगतों; तो साम्यवादी आहे, तेव्हां आपल्या दृष्टि-कोणानें कांहींतरी–

**बलदेव**–साम्यवादी ? तो कसा ? हा साम्यवाद काय आहे बुवा ?

**श्रीरंग**–( हलकेच ) खरं म्हणशील तर मलाही नीटसं सांगतां येणार नाहीं––

**यामिनी**–पण तुम्ही तर प्रमुख साम्यवादी आहांत म्हणे !

**श्रीरंग**–अलबत्, कुठलीही एक सभा मीं चुकवली नाहीं, कुठल्याही वर्तमानपत्रांत चार ओळी लिहिल्यावांचून सोडलें नाहीं, रुस्तम रेस्टॉरंटमध्यें मी नेहमीं भाईलोकांत असतों—

**विभाकर**–एवढ्यावर—

**श्रीरंग**–आणि शिवाय मुख्य म्हणजे माझा थोरला भाऊ एक–एक प्रथितयश साम्यवादी आहे !

**बलदेव**–मग काय, प्रश्नच नाहीं !

**श्रीरंग**–तेव्हां मी कवि, आणि संगीतकलेच्या वतीनं ( यामिनीस ) तुम्ही—

**यामिनी**–मी ?

**विभाकर**–परवा ' गाइये गणपति ' पेटीवर म्हणत होतांत—

**यामिनी**–पण—

**बलदेव**–आणि तुम्ही श्रीमंत, उच्च कुलीन घराण्यांतील कुमारिका आहांत. एवढी लायकी गायनाला आजकाल भरपूर आहे ! अजून तुमचीं रेकॉर्डस् नाहीं का घेतलीं ?

**श्रीरंग**–रेडिओवर नाहीं का त्या दिवशीं कविता गायलांत ?

**विभाकर**–मोठमोठे फोटो छापून नाहीं का आले ?

**यामिनी**–( श्रीरंगास ) तुमचीच कविता म्हणावी लागणार नसली तर मी गाईन दुसरं कांहीं तरी–

**श्रीरंग**–कांहीं हरकत नाहीं; माझी कविता गेय नाहींच, गद्य विला-पिका असतात माझ्या—

**बलदेव**–उदाहरणार्थ ?

**श्रीरंग**–( भावनाकंपित बनलेल्या कातर स्वरांत–) एका अर्धपोटी मजुराचें स्वप्न आहे हें–

उद्यां—

मी पोटभर—

जेवायला जाणार–जेवाऽऽयला

जाणार–जेवाऽयला जाणार !

उद्यां—

यामिनी–पुरे पुरे, आलं लक्ष्यांत–

श्रीरंग–बाकीचं ऐकलं नाहींत अजून. फार करुण काव्य आहे–

बलदेव–बस बस्स–कल्पना आली.

विभाकर–वा. ना. देशपांड्यांची कविता के. नारायण काळ्यांनीं गायल्यासारखें झालें ! या धर्तीच्या गद्यकाव्याला 'थ्रेनॉडी' अशी संज्ञा आहे. इंग्लंडमध्यें ही प्रथा पहिल्यानें–

यामिनी–का हो विभाकर, तुम्ही कोणत्या कलेचे प्रतिनिधी ?

बलदेव–वक्तृत्वाच्या ?

श्रीरंग–तो नवमतवादी वर्गातर्फे आला आहे–

बलदेव–छे छे, टोपीला पैसे नाहींत म्हणून का कोणी नवमतवादी म्हणेल त्याला ?

यामिनी–अहो, त्यांना सांगू द्या तरी—

विभाकर–( खांकरून ) मी आजच्या युगाचा समाजघटक आहे. बुरसलेली व पारंपरिक तत्त्वें झुगारून ताजी व क्रांतिकारक विचारसरणी विवेकवादाच्या निकषावर तावून सुलाखून दैनंदिन आचरणासाठीं अंगिकारणें कितपत व्यवहार्य आहे, याचा प्रकर्षानें सखोल अभ्यास करणारा मी एक विचक्षक आहे. वास्तवाबद्दल चिकित्सा, अन्यायाबद्दल जुगुप्सा व मानव्याची पिपासा यांनीं प्रेरित होऊन व शरीरधर्मांच्या मूलभूत भावनांनीं आसुसत व उसासत गूढवाद व भौतिकता यांचा समन्वय पृथगात्मतेनें करण्या–

बलदेव–शरण, शरण !

विभाकर–फ्रॉइड, रसेल, मार्क्स–

**श्रीरंग**–एंजल्स् आणि मॅक्स ईस्टमन् ?

**विभाकर**–क्रांति आणि उत्क्रांति–

**बलदेव**–अरे कोणी पाणी आणा–

**विभाकर**–लैंगिक भावनांचें प्रगाढ परिशीलन --

**यामिनी**–एक अक्षर कळलं असेल तर शपथ—

**श्रीरंग**–सर्व्हिस लॉरीवर बसून चालल्यासारखं वाटलं !

**बलदेव**–किंवा कंत्राटदाराच्या कॉंक्रीट मिक्सचरमध्यें अणकुचीदार खडीबरोबर घुसळल्यासारखें—

**विभाकर**–ज्ञान, सत्य किवा विद्वत्ता नेहमींच अप्रिय वाटतात. ( बलदेवास ) मग तूं रे कसला प्रतिनिधि ?

**बलदेव**–मी प्रतिनिधि वगैरे कांहीं नाहीं, गंमत पाहायला आलों आहें—–

**यामिनी**–मल्लविद्येचे प्रतिनिधि म्हणा—–

**श्रीरंग**–किंवा विरोधी पक्ष –' सभेंत " गोंधळ " " दंगल– " " आरडाओरडा—" ' दंडेली ! ' " प्रकरण हातघाईवर येतें ! "

**विभाकर**–पाशवी शक्तीतर्फे हजर आहे म्हण ! संस्कृतीच्या संरक्षणासाठीं तुझ्यासारख्या रेड्यांची जरूरी असते !

**बलदेव**–आणि दुरुस्तीसाठीं पण ! तीन मिनिटांत तुमची ही आजची इथली संस्कृति जमीनदोस्त करून दाखवतो !

**श्रीरंग व विभाकर** (दोन पावलें वेळींच मागें होऊन)–अत्याचारी !

**यामिनी**–( हंसून ) अहो, घाबरूं नका !

**विभाकर**- घाबरला कोण ?

**श्रीरंग**–हिम्मत असली तर आजच्या सत्ताधारी वर्गाच्या स्त्रीला धक्के मारून काढून लाव. अजून आली नाहीं बेटी !

**बलदेव**–बायकांना धक्के मारायची संवय नाहीं मला. त्यासाठीं पुण्याहून स्पेशॅलिस्ट आणावे लागतील. गणपतीउत्सव आणि रांगोळ्यांचे

गालिचे या संस्थांमुळें, पुण्यांत धक्के मारण्याची-आणि धक्के खाण्याची-कला चांगली नांवारूपाला आली आहे-(गडबड ऐकूं येते)

**श्रीरंग**-अरे, आल्या वाटतं 'ताईसाहेब ?'-चल-

(स्वागतपर पद्य 'रुद्रवीणा संगीत विद्यापीठा'च्या विद्यार्थिनींकडून सुरू होतें.)

(चालः-घेउनि ये पंखा)

स्वाऽऽगत हें आजी
मोदभरें, राऽऽजकुमारीजा ॥
कृतार्थ हें झालें, शौंडहि साहित्याऽऽऽचे ।
मंडळ हें, धन्य खरें, या जगतामाऽऽऽजीं ।
स्वागत० ॥ १ ॥

स्त्री-कर्णासम ती, उदार म्हणुनि कीऽऽर्ति ।
ललितकला, या जमल्या, तव सेवा काऽऽजी ।
स्वागत० ॥ २ ॥

कंगालहि सगळे, कलावन्त राऽहीऽऽले ।
राजकुलें, आश्रयिलें होतिल तरि राजी ।
स्वागत० ॥ ३ ॥

विनती ही ईशा, देई या संदेऽऽऽशा ।
भुरूदी महाराजा, आजि तशा माजी ।
॥ ४ ॥ स्वागत०

(टाळ्या वगैरे. राजकन्या ताईसाहेब गाणाऱ्या मुलींचें औपचारिक कौतुक करतात. विभाकर घसा साफ करून भाषण करायला उठतो.)

**विभाकर**-(सार्वजनिक भाषणासाठीं राखून ठेवलेल्या खास घूत्कारांत) श्रीमंत राजकुमारी ताईसाहेब, पाहुणे मंडळी व बंधुभगिनी हो, आजच्या या मंगल प्रसंगीं साहित्यशौंडमंडळातर्फे आपलें हार्दिक स्वागत करतांना माझ्या हृदयांत कल्पनातीत उर्मी उसळत आहेत......
(इ० इ०; हें गुऱ्हाळ चालू असतांना प्रेक्षकांत बसलेल्या बलदेव, यामिनी व श्रीरंग यांचें हळूंहळं संभाषण...... )

श्रीरंग—बरी आहे दिसायला—

बलदेव—आणि राजकन्या असूनही बुद्धिवान् चेहरा दिसतो—

यामिनी—बरोबर कोण आहे बाई तो? अगदीं जवळ पण अदबीनें बसलेला?

श्रीरंग—अहो, तो त्यांचा खासगी चिटणीस—

बलदेव—ओळखत नाहीं का तुम्हांला? ताइसाहेबाशीं बोलतांना त्याच्या नाकाला कसं लाचार काकुळतीचं टोंक येतं आणि इकडे बघतांना आढ्यते-मुळें तें नाक कसं फेंदारतं—एवढ्यावरून लक्षांत येईल, कीं हा खानगींतला नोकर आहे म्हणून!

यामिनी—नांव तरी काय त्याचं?

श्रीरंग—गेंगणे. 'भुरुंद संस्थानचा शेक्सपिअर' म्हणून कोणत्याशा मासिकांत फोटोसह चरित्र पण आलं होतं त्याचं—

बलदेव—हा माणूसच चमत्कारिक आहे, का या पोषाखामुळें दिसतो तसा? डोकीवर दक्षिणी पगडी आणि खालीं सगळा एखाद्या सइसासारखा पोषाख!

यामिनी—तो संस्थानचा सरंजामी पोषाख असेल. म्हणे मुंबईला येण्यापुरता तो देतात. आणि परत गेल्यावर लिलावानें विकून त्याची किंमत पुन्हां सरकारजमा होते.

श्रीरंग—त्याच्यावर त्याच्या ताईसाहेब मात्र बेहद्द खूष दिसताहेत!

बलदेव—साहजिक आहे; ललितकलांच्या परसांत पावलं टाकायला त्या त्याचेंच बोट धरून शिकल्या—

यामिनी—पण त्यांची चमकदार नजर तर प्रेक्षकांतूनही सारखी फिरते आहे—

श्रीरंग—बौद्धिक साहचर्यासाठीं त्यांना सवंगडी हवा आहे कोणी असं ऐकतों—

बलदेव—मग त्या भलत्याच ठिकाणीं आल्या म्हणायच्या!

**यामिनी**–असं कां म्हणतां? आपले विभाकर एक उमेदवार आहेत असं दिसतं आहे! वाणीचा प्रवाह काय अस्खलित चालला आहे–( तिघे हसूं दाबतात; विभाकरची 'गणगण' जरा मोठ्यानें ऐकूं येते. )

**विभाकर**–......तेव्हां आपल्यासारख्या सुविद्य, कलाकोविद, रसिक व उदारधी राजकन्येच्या आगमनानें आमच्या मंडळाला आपण पुनीत केलें आहे. साहित्य, संगीत, काव्य, नाट्य इत्यादि कलांचा आपला पुरस्कार लक्षांत घेऊन आम्ही आपलें सादर अभिनंदन करण्यासाठीं येथें उपस्थित झालों आहोंत. या साहित्यशौंडमंडळांतील निवडक कलावन्तांशीं आपला परिचय करून देऊन, मूर्तिमंत शारदा व लक्ष्मी यांची एकवाक्यता झालेल्या आपल्या कृपेची त्यांना जोड मिळवून देण्यासाठीं–( इ. इ०... हें तुणतुणें चालूं असतां पुन्हां हलक्या आवाजांतील संभाषण सुरू होतें. )

**बलदेव**–काय साळसूदपणें बोलतो आहे लेकाचा!

**यामिनी**–व्याख्यानाचा ज्वर भरला आहे स्वारीला पुरता!

**श्रीरंग**–ताईसाहेबावर 'इंप्रेशन' मारायची शिकस्त करतो आहे–

**यामिनी**–हळू, लोक आपल्या कुजबुजीकडे पाहायला लागले आहेत—

**बलदेव**–आशेनं पाहताहेत बिचारे–इकडे तरी कांहीं करमणूक होण्यासारखं दिसेल म्हणून—

**यामिनी**–नको, मी आपली बायकांतच जरा जाऊन बसतें—

**श्रीरंग**–तो विभ्याही डोळे वटारून बघतो आहे इकडे मधून मधून—

**बलदेव**–आणि ताईसाहेबांचा तो फेंफाण्याहि—

**यामिनी**–जातेंच–मग भेटूं सभा संपल्यावर—( जाते ).

**श्रीरंग**–हें पुराण संपणार तरी केव्हां?

**बलदेव**–कां? ताईसाहेबांच्या मेहेरबानीसाठीं एक उमेदवार आहेस वाटतं?

**श्रीरंग**-भलतंच ? प्रेमाच्या आशेला मी शक्यतेची मर्यादा घालतों नेहमीं–

**बलदेव**-अस्सं ! मग तूं ठरवलेल्या प्रेमाच्या टापूंत यामिनी येते वाटतं ? ( श्रीरंग कांही बोलत नाहीं.) तुला एक 'टिप्' देऊन ठेवतो, तिलाहि शक्यतेच्या मर्यादेबाहेर ठेव.

**श्रीरंग**-(गुरकावून ) कां ?

**बलदेव**-कातडी शाबूत ठेवायची असल्यास ! 'यामिनी टूर्नामेंट' मध्यें मी एकटाच उमेदवार राहूं इच्छितों. मला 'वॉक ओव्हर' मिळाला नाहीं तर इतरांची हड्डी नरम करून टाकीन–

**श्रीरंग**-ब्रूट–फोर्सच्या जोरावर ?

**बलदेव**-बेशक—

**श्रीरंग**-पण तिचं मन—

**बलदेव**-तें मी पाहून घेईन, तुला नको त्याची काळजी !

**श्रीरंग**-या दांडगाईपुढें कांहीं अपीलच नाहीं म्हणायचं !

**बलदेव**-कसं ओळखलंस ?

**श्रीरंग**-मग हा विषयच सोडून दिलेला बरा. समारंभाकडे लक्ष देऊं जरा—

**बलदेव**-सोळा आणे कबूल.

( इतका वेळ 'पार्श्वसंगीता'प्रमाणें चालू असलेलें विभाकराचें गुऱ्हाळ ऐकूं येतें— )

**विभाकर**-......म्हणून ललितकलांतील उदयोन्मुख क्रान्तिकारकांशीं आपली ओळख करून देण्यांत आज आम्हाला अभूतपूर्व उत्साह वाटत आहे. इतके तरुण, इतके निर्भय, इतके स्वतंत्र विचाराचे, बेगुमान कलावन्त एकत्रित झालेले उभ्या महाराष्ट्रांत आढळणार नाहींत. यांच्या कलेची दिशा, जिवन्तपणा, अनपेक्षितता हे गुण पाहून रूढीचा गुलाम झालेला आपला समाज त्यांचें कौतुक करीत नाहीं, यांत आश्चर्य वाटण्या-

सारखें कांहीं नाहीं. भौतिकता हें आम्हा क्रांतिवाद्यांचें मूलभूत तत्त्वज्ञान आहे, व त्यामुळें आमचें लिखाण किंवा भाषण कोणालाही कळलें नाहीं, आमच्या काव्याला अज्ञ जनता हंसली, आमच्या चित्रांना पोरेंबाळें भ्यालीं, आमच्या संगीतानें फक्त मुक्या जनावरांना स्फूर्ति आली, तरी तो आमचा मोठा विजय आहे. मानवी स्वातंत्र्य, समता, अनिर्बंधता या तत्त्वांचे आम्ही सैनिक आहोंत—आणि श्रीमंत कुमारी ताईसाहेब महाराज! या तत्त्वनिष्ठ मूठभर कलोपासकांना राजाश्रय मिळावा, मोठ्यांकडून उत्तेजन मिळावें, आमचे श्रम अगदींच उपेक्षिले जाऊं नयेत, म्हणून आपल्यासारख्या खानदानी, श्रीमान्, बुद्धिमान, विद्याविनयशील, रसिक, गुणग्राही, उदारहृदय, सौंदर्यशाली व सौंदर्यदर्शी, श्रेष्ठकुलोत्पन्न राजकन्येकडे आम्हीं मोठ्या आदरानें पाहत आहोंत (टाळ्या). जगापुढें दोन पावलें या तत्त्वानें आमच्यांत विविध ललितकलांचा जो उत्कर्ष झाला आहे तो आपल्या निदर्शनास नम्रपणें आणण्याची मी परवानगी घेतों. (राजकन्या जांभई देते.) भविष्यकालीन तंत्राच्या आमच्या निवडक लघुकथांचें प्रकाशन, संपादन व उद्‌घाटन करून आम्हांला जगापुढें आणण्याचा मान कोणाला मिळतो इकडे आमचे डोळे लागले आहेत. आमच्याजवळ सुधारलेल्या जगाला हालवून सोडणाऱ्या अदमासे एक ग्रोस —म्हणतों—शेंकडो कविता आहेत, आमच्या चित्रकारांना रस्त्याच्या कडेच्या दगडांना पांढरा रंग देण्याची जरी संधि मिळाली तरीदेखील ते कलेंतली भयंकर क्रांति दाखवूं शकतील; आमच्याजवळचे नट केवळ हॉलिवुडचा प्रवासखर्च नसल्यामुळें जगाच्यापुढें आले नाहींत. आमच्यामधील (खांकरून) विद्वान् व सर्वज्ञ लोक फुकट जात आहेत......

(हा जिकीरीचा सूर चालू असतांना ताईसाहेब व त्यांचा चिटणीस यांच्यामध्यें संवाद—)

**ताईसाहेब**—हें काय? पुण्यासारखंच चाललं आहे इथें! कंटाळा आला मला—

**गेंगणे**—होय सरकार—

**ताईसाहेब**—हे नवमतवादी म्हणून आलों आपण—

**गेंगणे**–जी हुजूर—

**ताईसाहेब**–आमच्या राज्यांतल्यासारखा एकही तरतरीत मुलगा नाहीं इथें–

**गेंगणे**–मला तेंच वाटलं साहेब–

**ताईसाहेब**–मला मोठं कुतूहल होतं कीं, ओळखीचे मुलगे नी मुली गळ्यांत हात घालून बसतात कीं काय ? पण सगळे मेले पुळचट–हे कसचे नवमतवादी ?

**गेंगणे**–तर काय !

**ताईसाहेब**ः–त्यापेक्षां आपल्या वाड्यांतले वारकरी, शागीर्द आणि आश्रितच खरे नवमतवादी ठरतील !

**गेंगणे**–ह्यः ह्यः ह्यः–

**ताईसाहेब**–काहो गेंगणे, नग्नसंघ नाहीं काहो निघाला मुंबईत अजून ?

**गेंगणे**–जी नाहीं–पण पुन्हां तलाश घेऊन रपोट सादर करूं का उद्यां ?

**ताईसाहेब**–जाऊं द्या. पण आतां मला कंटाळा आला–(दरम्यान विभाकरांचें भाषण एकदांचें संपतें, व करमणुकीचा कार्यक्रम सुरू होतो. एक बायकी तरुण वीरासन घालून अलगूज वाजवतो व एक मिशाळ प्राणी दहा ठिकाणीं मुरडत बुलबुलतरंगावर सांथ देतो. राजकन्या व सेक्रे-टरी यांची कुजबूज पुन्हां सुरू होते. )

**ताईसाहेब**–आतां मात्र शिकस्त झाली. जाऊं या आतां...

**गेंगणे**–अऽऽऽ–कार्यक्रम पुरा झाल्यावर गेलेलं बरं—

**ताईसाहेब**–कसलीं माणसं हीं ? हें पहा, एक पांच रुपयांची देणगी जाहीर केली तर सुटका होईल का ?

**गेंगणे**–तसं–अऽऽऽह्यः ह्यः–जरा हें दिसेल—

**ताईसाहेब**–तुमचं बाई भारीच अगदीं गेंगणेसाहेब! हं ऽऽऽ... (सुस्कारा) पण बरोबर आहे तुमचं. आम्हांला शोभेल असंच वागलं पाहिजे; तुम्हीं आहांत म्हणून सांभाळून घेतां आम्हांला–

**गेंगणे**–कसचं कसचं कसचं!

**ताईसाहेब**–खरं सांगू का? तुमच्यासारखादेखील एकही पुरुष नाहीं इथल्या या माणसांत–

**गेंगणे**–(धन्य होऊन अगदीं चापदरी पण हलक्या आवाजांत) ताईसाहेब–ताईसाहेब–आपली कृपा! ह्यः ह्यः ह्यः!

**ताईसाहेब**–गेंगणेसाहेब, जों जों मी तुमच्या सहवासांत जास्त जास्त काळ घालवितें तों तों मला तुम्हीं जास्तच जवळचे वाटतां–

**गेंगणे**–(सर्व पितर स्वर्गांत सरकल्याच्या दिलखुष आवाजांत) कसचं, कसचं, हँ हँ हँ!

**ताईसाहेब**–पण कसंही करून इथन सुटका होण्याची व्यवस्था करा––

**गेंगणे**-इथून कुठें जायचं?

**ताईसाहेब**-फिरायला जाऊं कोठतरी––

**गेंगणे**–एका मिनिटांत करतों व्यवस्था! (उडी मारून उठतो).

[ गेंगणे उठलेला पाहून स्वागताध्यक्ष विभाकर उठतो. पहिले दुसऱ्याच्या कानाशीं लागतात; थोड्या वेळानें बसून विभाकर, आजू-बाजूच्या लोकांशीं कुजबुजतो. सगळे बैलासारखे माना डोलावतात. गेंगणे उठतो, उपरण्याच्या पट्टीची चापचोपी करून बोलूं लागतो. ]

**गेंगणे**–आजच्या कार्यक्रमानें श्रीमंत राजकुमारी ताईसाहेब यांना आनंद झाला आहे. महाराष्ट्रांतील नवमतवादाच्या या गढीला सक्रिय सहानुभूति दाखविण्यासाठीं श्रीमंत ताईसाहेब राजे यांच्या वतीनें पांच रुपयांची देणगी जाहीर करण्यांत मला उत्साह वाटत आहे.

(नमस्कार करून खालीं बसतो. विभाकर उठून आभार मानतो. आणखी कोणीकोणी कोणाकोणाचे आभार मानतात. तुरळक गर्दींतून वाट

काढीत ताईसाहेब जातात. विभाकर थेटपर्यंत पोहोंचविण्यास जातो; पण त्याला पुन्हां भेटायला बोलावलें नाहीं हें त्याच्या परत येणाऱ्या चेहऱ्यावर दिसतें. अल्पोपहार नाहीं, ही खात्री करून बहुतेक तमासगीर जातात, बरेचसे साहित्यशौंड वेगवेगळ्या स्त्रीसदस्यांच्या भोंवतीं रेंगाळत बाहेर पडतात. अखेर विभाकर, श्रीरंग, बलदेव आणि यामिनी ही मूळची असामी शिल्लक रहाते. ]

**श्रीरंग**—विभाकर, इतकं मनाला लावून घेण्याचं कारण नाहीं. पैशांच्या झाडाला आणखी पुष्कळ फुलं आहेत.

**विभाकर**—हा अवस्त्वारोप आहे; अशा रीतीनें गळ्यांत पडून मानसिक त्रास सूचित करण्याला फ्रॉइडनें—

**यामिनी**-पण तिनें कांहींतरी चीज केलं का तुमच्या इतक्या मेहनतीचं ?

**बलदेव**—वा, असं काय म्हणतां ? पांच रुपयांची मूर्तिमंत देणगी—

**श्रीरंग**—ते पैसे तरी मागून घेतलेस का त्या फेंफाण्याकडून ? जरा कांही रिफ्रेशमेंट मागवल्या असत्या—

**बलदेव**—ती रक्कम आल्यावर त्या रकमेनें मीं रसेलच्या ग्रंथ-संग्रहांत भर टाकणार आहे—

**विभाकर**—इतक्या भुकेल्या शौंडांची उपासमार करून ! श्रमजीवी दलित वर्गाच्या—[श्रीरंगाकडे पाहातो. ]

**श्रीरंग**—अलबत् ! इतक्या द्रव्यबलानें तीनचारशें बापुड्यांचें तुकडा-पाणी भोजन होईल.—

**बलदेव**—फोटोसह ?

**यामिनी**—पुरे हो ! कांहो विभाकर, ताईसाहेबांनीं जातांना वळून तुमच्याकडे पाहिलें कांहो ?

**विभाकर**—जाऊं द्या हो ! अरसिक कुठली !

**यामिनी**—खरी एकही रसिक मुलगी कांहीं तुम्हांला अजून भेटली नाहीं, खरं कीं नाहीं ?

**विभाकर**—अजून भेटायची आहे. बौद्धिक साहचर्याला अनुरूप अशी मादी मला केव्हां ना केव्हां तरी मिळेल—

**बलदेव**—त्याची चिंताच नको ! आतांपर्यंत झालेले प्रीतिविवाह पाहून खात्री झाली आहे माझी—

**यामिनी**—कसली ?

**बलदेव**—सांगेन मग.

**श्रीरंग**—चला बाबा घरीं; आजच्या कार्यक्रमाची अगदीं सहकारी परिषद झाली !

**बलदेव**—याबद्दल आपण विभाकरचे आभार मानले पाहिजेत !

**विभाकर**—एकंदर तुमच्या सर्वांच्या कमी दर्जाच्या बुद्धीमुळें, माझ्या अभ्यासपूर्ण ज्ञानाचें स्वागत करण्याच्या उच्च कोटीचा श्रोतृवर्ग—

**बलदेव**—वटहुकूम काढूनदेखील मिळणार नाहीं ! कैदीच बसवले तर गोष्ट वेगळी—

**श्रीरंग**—तो देखील राजबंद्यांचा श्रोतृवर्ग मिळणार नाहींच. याच्या सहवासानें राजबन्दी अन्नसत्याग्रह करतील—

**यामिनी**—पण गुन्हेगार कैदी मात्र पुरे सुधारतील !

**बलदेव**—सहनशक्तीवर एवढा ताण पडल्यावर न सुधारून सांगतात कोणाला ?

**विभाकर**—तुम्हाला काय चव माझ्या विद्वत्तेची ? पण कांहीं नाहीं तरी निदान एक गोष्ट कबूल केली पाहिजे तुम्हांला, कीं आजच्या प्रयोगांत नीरसपणा हा स्वतंत्र रस मीं निर्माण केला आहे—

**यामिनी**—हें आम्ही नेहमींच म्हणतों आहोंत, कंटाळा आणण्यांत तुमचा हात धरणारें कोणी नाहीं—

**बलदेव**—या पण अरसिक दिसत आहेत बरं का विभाकर !

**श्रीरंग**—'हात धरणार नाहीं' यांत त्याचं उत्तर त्याला मिळालं !

**बलदेव**—आणि तुझं उत्तर हवं तर मी तुझा हात धरून देईन !

**यामिनी**–म्हणजे ?

**श्रीरंग**-सांग हिंमत असली तर—

**यामिनी**–आणि मघां 'मग सांगेन' म्हणाला होतात तेंही सांगा–

**बलदेव**–ठीक आहे ऐक; आजच्या या नाटकाचा शेवटचा अंक मी एकमुखी करून दाखवतों; आजच्या समारंभानें अचानक आपल्या या चौरंगी सामन्यांत आणिबाणीची वेळ आलेली आहे, पण कर्णधार मी स्वतः होऊन सगळें शेवटीं नीट तडीस नेणार आहें–

**श्रीरंग**–मात्र 'चौकार' किंवा 'षट्कार' मारूं नको–

**विभाकर**–परकीय क्रीडणाच्या पारिभाषिक शब्दाविषयीं मी–

**बलदेव**–सबूर, मला माझं म्हणणं पुरं करूं दे–यामिनी, आतां स्पष्ट बोलायची वेळ आली आहे; तुझ्या खुषीसाठींच आम्हीं उमेदवारांनीं हें साहित्यशौंडमंडळ काढलें, आजच्या कंटाळवाण्या शिखरांकानें या प्रकरणाचा सोक्षमोक्ष लावून घेणें मला प्राप्त झालें आहे. यामिनी, या नूपुर–सुदामाची वटवट बंद करून हा कंकण तुझ्या हृदयाचा ताबा घेण्याची इच्छा धरीत आहे—

**विभाकर**–स्त्री म्हणजे कांहीं मालमत्ता नव्हे.

**श्रीरंग**–खासगी मालमत्ता जगांतून नष्ट केली पाहिजे–श्रमजीवी–

**बलदेव**–( दरडावून ) आतां मध्यें बोललांत तर दोघांची मानगूट पकडून डोकीं एकमेकांवर आपटीन. यामिनी, या पराजित प्रतिस्पर्ध्यांना साक्ष ठेवून–

**विभाकर**–यांत नैतिक विजय आमचाच.

**बलदेव**–चूप ! यामिनी, माझ्या हृदयाचा ताबा तूं केव्हांच घेतला आहेस, आतां मला तूं हवी आहेस–

**श्रीरंग**-कोणत्या नात्यानें ?

**विभाकर**–विवाहाच्या श्रृंखलेमुळें स्त्री–जातीच्या नाजुक भावनांवर दडपण पडतें. स्त्रियांना स्वतंत्र मित्र मिळणें दुरापास्त होते–

**बलदेव**—माझी एकट्याची पत्नी म्हणून तूं मला पाहिजेस; मला पतीचें स्थान शाबूत ठेवायला चढाओढ खपायची नाहीं, माझ्याकडे दुर्लक्ष होईल असा कोणी मित्र केलास तर दोघांचीहि चटणी उडवीन—

**श्रीरंग**—म्हणजे मग आतां आम्हीं शेवटचाच निरोप घ्यायचा म्हणायचा?

**बलदेव**—(हंसून) तुमच्या दोघांसारख्या निरुपद्रवी मित्रांची मला भीति नाहीं!

**विभाकर**—बौद्धिक साहचर्य—

**बलदेव**—माझ्या संसाराला धग न लागेल इतकें बौद्धिक साहचर्य खुशाल खेळतां येईल तिला! यामिनी, तुला सुखांत ठेवायची धमक माझ्या अंगांत आहे. तुझ्या वैयक्तिक स्वातंत्र्याला माझ्या घरांत कधीं बाध येणार नाहीं—

**श्रीरंग**—लिहून आणलं आहेस कीं काय?

**विभाकर**—आणि गंभीर झाला आहेस!

**यामिनी**—हें जाहीर प्रियाराधन आणखी किती वेळ चालायचं?

**बलदेव**—चल, मी तुला घेऊन जातों आतां—

**श्रीरंग**—वा, मग आम्ही—

**विभाकर**—निर्णय इथल्या इथें लागला पाहिजे—

**बलदेव**—कमलावर भ्रमर आला असतां बारीकसारीक कीडमुंगीला आपोआप उत्तर मिळतें—

**श्रीरंग**—कवी!

**विभाकर**—आम्हांला यामिनीबाईकडून असंदिग्ध उत्तर पाहिजे—

**बलदेव**—नापास उमेदवारांना तुम्ही 'नापास' म्हणून युनिव्हर्सिटी-सुद्धां कळवीत नाहीं—!

**श्रीरंग**—पण—

**बलदेव**—बस्स! आधुनिक पद्धतीप्रमाणें एवढा वेळपर्यंतची आमची दोस्ती जाहीर स्वरूपांत झाली; तिची पुढची अवस्था खासगी रीतीनें

होईल. आमचें ध्येय स्वतंत्र आहे. पण तें बहुजनसमाजाला खुलें ठेवण्याइतका मी नवमतवादी नाहीं—

**श्रीरंग**—त्यांना बोलूं द्या तरी—

**विभाकर**—विवाह ही संस्था करार का संस्कार याचा विचार यामिनीबाई, तुम्ही—

**बलदेव**—आतां 'यामिनीताई' म्हणण्याचा सराव कर; 'ताई' म्हणून कोणत्याहि स्त्रीला भगिनी करून त्यांच्या घरांत राजरोस हिंडणें हा सध्यांचा शिष्टसंप्रदाय आहे—

**यामिनी**—तुम्ही येणार आहांत, का इथेंच यांच्याशीं हुज्जत घालीत बसणार ?—

**श्रीरंग**—ऐका ! अजून त्या तुला परका समजतात !

**विभाकर**—बहुवचनार्थी संबोधन—

**यामिनी**—बलदेव, तूं येत नसलास तर मी एकटी जाईन—

**बलदेव**—इन्‌किलाब झिंदाबाद !

(यामिनीला उचलून दाराकडे पळतो !)

**विभाकर**—बुद्धिजीवी सहकाऱ्यांशीं प्रतारणा ! शारीरिक आकर्षणाला आधीनता—

**श्रीरंग**—वैयक्तिक विषमता—खरोखर, श्रमजीवी दलित वर्गाच्या...

(दोघेहि हळूहळू चालूं लागतात.)

# निवृत्ति-निवास

बंडूची स्थिति पूर्वीपेक्षां बरीच सुधारली असावी असें दिसलें. एरवीं पांच आणि दहा रुपये हातउसने मागणारा तो अलीकडे पन्नास-साठ रुपये सहज मागायला लागला होता. बिनभांडवली धंदे एकामागून एक करणारा तो एक हरहुन्नरी मनुष्य होता. तो मित्रांना वेळोवेळीं टोप्या घाली, पण अगदीं हलक्या हातानें, त्यांच्या डोकीचे केंस जाणार नाहींत इतपत हिशेबानें !

आज त्यानें रुपये इतक्या ऐटींत मागितले कीं जसें कांहीं चेकवर सही करायला 'जरा फौंटनपेन द्या पाहूं' असें म्हणण्याइतकी साधी गोष्ट होती ती !

"पन्नास रुपये माझ्याजवळ असते—" मीं सुरुवात केली.

"बरं बरं, आलं लक्षांत; तूं म्हणजे नेहमीं दरिद्री. जा, खालच्या त्या टांग्याचे पैसे तरी देऊन टाक तेवढे--"

बंड्या अशा रुबाबांत बोलला कीं टांग्याचे पैसे देण्याची संधी देऊन त्यानें माझ्यावर मेहरबानीची जणुं काय खैरात केली होती.

"सुटे पैसे नाहींत—"

"च् च् च्!" म्हणत बंडूनें खिडकींत जाऊन टांगेवाल्याला फर्मावलें,

"अरे, जा आतां; संध्याकाळीं ऑफिसांतून पैसे घेऊन जा—"

टांगेवाल्याचा जबाब येण्याच्या आंत बंडू आंत येऊन आराम-खुर्चीवर पडला देखील !

माझ्या विस्मयाला कंठ फुटला; "बंड्या, लेका काय आहे ? लॉटरीबिटरी फुटली, कां कुणाला दत्तक गेलास? इतक्या श्रीमंतीच्या मस्तीनें वागतो आहेस तो ? कुठं डल्ला मारलास ?"

" तूं देखील ओळखलंस तर! बरोबर आहे; आज मला श्रीमंत म्हणायला हरकत नाहीं. माझ्या खिशांत दिडकी नसेल, पण श्रीमंतांना पैशाचं ओझं घेऊन हिंडावं लागत नाहीं कधीं—बाजारांत पत दांडगी ना?" बंड्या विनयानें म्हणाला. तो विनयानें बोलूं लागला म्हणजे हटकून कांहीं तरी गफलत असायची असा माझा अनुभव होता. मागें एकदां एका कोऱ्या करकरीत मोटारींतून येऊन तो असाच विनयानें बोलूं लागला होता, पण लौकरच त्या मोटारीचा संतापलेला मालक येऊन ती घेऊन गेला, व बंड्यानें अगदीं विनय सोडून भाषा वापरली. असो.

" आज मी खिशांत कवडी न ठेवतां चैनींत हिंडूं शकतों. कां, तर मी सध्यां एक सुखवस्तु मनुष्य आहे. वर्षांतून आठ महिने कफल्लक म्हणून माझ्या खिशांत पैसा नव्हता, आज हे चार महिने मला चिल्लर बाळगण्याची कटकट नको म्हणून माझ्या खिशांत कांहीं नाहीं. तुझ्या-सारख्या नोकरीदाराला मदत करण्याची लहर आली तर मला करतां येईल—"

" नको," मी थोडक्यांत सांगितलें. बंड्याच्या मदतीबद्दल मी नेहमीं साशंक असे. एकदां त्यानें एका ' थर्ड इयर ट्रेंड ' मराठी मास्तरला मोठ्या नोकरीसाठीं गव्हर्नरवर चिठ्ठी दिली होती. एकदां एका बालवाचनमंदिराला मदत म्हणून वे. शा. सं. हरिहरशास्त्री यांनीं गुप्तपणें ठेवलेले समाज—स्वास्थाचे बांधलेले अंक काढून आणून दिले होते. एकदां भाऊ कॉलेजचा असेंब्ली—हॉल परस्पर बाहेरगांवाहून आलेल्या लोकांना लग्नासाठीं भाड्यानें दिला होता. आमच्या ओळखीच्या लोकांत बंड्या कोणाला मदत करणार हें ऐकतांच तोंडें गोरीमोरीं व्हायचीं.

" जशी तुझी मर्जी ! " मी मदत नाकारल्याचें विशेषसें मनावर न घेतां बंड्या म्हणाला. त्याच्या उत्साही उपक्रमाबद्दल आम्ही मित्रांनीं आदासीन्य दाखवावें याची त्याला संवयच झाली होती.

" वास्तविक ईशकृपेनें आज माझें बरें चाललें आहे. एका अभि-नव संस्थेचा मी संचालक आहे—" बंड्यानें आपली भाषा ज्ञानप्रकाशा-वरून बसवली होती—" माझ्या उपक्रमानें मीं केवळ एक उपयुक्त समाज-

कार्यच करीत नसून चांगली किफायतही करीत आहे. पहिल्यापासूनच सांगतों तुला सगळं–"

माझ्या कल्पनेला चालना देण्यास प्रेमाची चित्–शक्ति कारणीभूत झाली. (हें वाक्य एका दमांत बोलून टाकून बंडूनें थोडा वेळ धांपा टाकल्या व नंतर सावकाशीनें तो सांगू लागला ). रावसाहेब नाफडे यांची मुलगी नलिनी हिच्यावर जर माझें प्रेम बसलें नसतें तर इतक्या महत्त्वाचें समाजकार्य माझ्या हातून होतें ना. रावसाहेब पेन्शनर असल्यामुळें त्यांना फुरसत भरपूर होती, आणि त्या फुरसतीचा उपयोग स्वतःच्या मुलीवर करडी नजर ठेवण्याकडे ते करूं लागले. एवढी मोठी कॉलेजांत जाणारी मुलगी, पण हा म्हातारा आपला नेहमीं तिच्याबरोबर! कॉलेजांत जातां–येतां, फिरायला, सिनेमांना, भाजी आणायला–जेव्हां पहावें तेव्हां तिच्याशीं याची दावण बांधलेलीच. मी पंधरान् पंधरा दिवस सायकलवरून तिच्याभोंवतीं घोंटाळलों, तिला मी पक्का माहीतसुद्धां झालों, पण शब्द बोलायची संधी नाहीं !

एक दिवस असाच रस्त्यानें विचार करीत चाललों होतों. तरुण मुलींची इतक्या सावधपणानें राखण करणाऱ्या म्हाताऱ्यांना कोठेंतरी डांबून ठेवायला जागा असती तर किती बरें झालें असतें, हा विचार माझ्या डोक्यांत घोळत होता. इतक्यांत सहज एका नव्या घराकडे माझें लक्ष गेलें. त्या घरावर नांव लिहिलें होतें––

'निवृत्ति–निवास,'

त्याच्यावरून मला कल्पना आली कीं सरकारी नोकरींतून किंवा दुसऱ्या कसल्या रोजगारांतून निवृत्त झालेल्या म्हाताऱ्यांना जर अशा एकाद्या ठिकाणीं डांबून ठेवलें तर तरुण पिढीवर किती उपकार होतील ! नलीच्या नफ्फड बापाला जर इथें गुंतवून ठेवतां आलें तर तिच्याशीं बोलायला वेळ तरी मिळेल. ताबडतोब घरमालकाला भेटून मी ती इमारत भाड्यानें घेतली. धोंडिबा निवृत्ती शेलार नांवाच्या पापभीरु इसमानें वडिलांच्या नांवानें घर बांधलें होतें तें. लगेच 'निवृत्ति–निवास' या नांवाखालीं कंसांत 'पेन्शनर्स–होम' म्हणून पाटी लावली.

माझ्या संस्थेचें हेतुपत्रक मीं घरोघर वाटलें. ( माझ्या खिशांत एखादी जाहिरात शिल्लकही असेल—ही पहा. )

**पेन्शन घेतलें—पुढें काय !**

वेळ जात नाहीं, तरुण पिढीचें वागणें पसंत नाहीं, मनासारख्या गोष्टी करायला श्रम पडतात—अशा वेळीं सेवानिवृत्त गृहस्थानें काय करावें ?

हा प्रश्न आम्हीं सोडविला आहे—

**निवृत्ति—निवासांत चला !**

मनाजोगे व्यवसाय—भरपूर करमणूक —निश्चित जीवन !

लिहा अगर भेटाः—

व्यवस्थापक
**निवृत्ति—निवास**
( धि पेन्शनर्स—होम )
मुंजाबाचा बोळ, नारायण पेठ
पुणें शहर.

माझ्या संस्थेंतली व्यवस्था सुरवातीपासूनच मीं अगदीं झक्क ठेवली. पेन्शनरांच्या बोर्डिंगला अवश्य अशा सगळ्या सुखसोयी तिथें केल्या. पंचावन्न वर्षांवरील उमरीच्या विधुर व सपत्निक म्हाताऱ्यांची तिथें तरतूद केलेली होती. ( हीं वयोमर्यादा बिनधोक आहे अशी माझी समजूत होती, पण कांहीं कांहीं मंडळींनीं ती खोटी ठरवलीच ! ) आमचा कार्यक्रम सकाळीं लौकर सुरू होतो—कारण वृद्धपणीं झोंप लवकर संपते. पहांटे चाराला सर्व मेंबर उठून भूपाळ्या म्हणतात. त्यानंतर त्यांना कपडे चढविण्यांत येऊन त्यांच्या लहान लहान तुकड्या पेन्शनर मारुती, पर्वती, जंगली महाराज, वगैरे ठिकाणीं ( बरोबर मनुष्य देऊन ) फिरायला सोडण्यांत येतात. मंडळी परत आल्यावर त्यांच्या आंघोळी, जेवणें व दुपारच्या

झोपा होतात. दुपारच्या झोपेनंतर चहा झाला म्हणजे मात्र या लोकांची खरी आणीबाणीची वेळ असते. यावेळीं त्यांच्या करमणुकीसाठीं मला नाना प्रकार करावे लागले. टाइम्स व ज्ञानप्रकाश वर्तमानपत्रांची माणशीं एक एक प्रत मला द्यावी लागते—नाहींतर हे लोक एकमेकांच्या उरावार बसतील ! सरकारी गॅझेट, केसरी, देशी औषधांचे कॅटलाग या सगळ्या सामग्रीची तरतूद मला नियमानें करावी लागते. शिवाय, कोणाकोणाला कोणकोणत्या हौशी असतात त्यांचीही तयारी ठेवायची असते. एका पेन्शनर प्रोफेसरसाठीं मला एक छोटासा काष्टौषधींचा कारखाना ठेवावा लागला. मुलकी खात्यांतल्या म्हाताऱ्यांचे सलाम घेण्यासाठीं मीं एक अँग्लो-इंडियन इसम नुसता बसवून ठेवलेला आहे ! कोणी पंचांगांचें संशोधन करतात, त्यांच्यासाठीं जुन्या पंचांगांचे ढीग, गणिताचीं पुस्तकें नि पाट्यापेन्सिली ठेवल्या आहेत, साठ फूट उंचीची 'वेधशाळा' म्हणून तिसऱ्या मजल्याच्या छप्परावर मी एक पिंजरा बांधला आहे. तिथें ठेवलेल्या दुर्बिणींतून कांहीं रसिक मेंबर्स शाळा भरण्याच्या सुटण्याच्या वेळांना रस्त्याचें निरीक्षण करतात.

रावसाहेब नाफडे यांना माझ्या निवासांत ओढून आणण्यास बरीच मेहनत पडली मला. तिसऱ्याच एका म्हाताऱ्याला बिलांत थोडी सवलत देण्याची कबुली करून त्यांच्याकरवीं रावसाहेबांचें मन वळविण्याचा उपद्व्याप करावा लागला. अखेर मुलीला कॉलेज-हॉस्टेलमध्यें ठेवून स्वतःही विलासांत राहिल्यास पैशांची बचत होते ही नक्की खात्री झाल्यावर मगच गृहस्थ माझ्या बोर्डिंगांत येऊन राहिला. मी त्याला खूप ठेवण्याची शिकस्त केली. दर रविवारीं बोर्डिंगांतल्या मंडळींना भेटायला येण्याचा दिवस ठरला होता, पण रावसाहेबांना भेटायला येण्यास त्यांच्या मुलीला केव्हांही मुभा होती. मात्र ती माझ्या ऑफिसांत चांगली अर्धा तास थांबल्याखेरीज तिची वडिलांशीं भेट होऊं नये ही खबरदारी मी घेत असे.

या अर्ध्या तासाचा उपयोग मी अर्थात्‌च योग्य रीतीनें करून घेत होतों.

तुला वाटत असेल कीं पोक्त लोकांचें बोर्डिंग म्हणजे सगळें काम अगदीं शिस्तींत नि बिनबोभाट चालत असेल--मुळींच नाहीं. सारख्या

तक्रारी चालू असतात. एक पेन्शनर सब-रजिस्ट्रार तक्रार घेऊन आले कीं, बोर्डिंगाच्या नोकरांना डगलापट्टा देऊन आम्हाला सलाम करायला कां शिकवलें नाहीं? दुसरे एक ऑनररी मॅजिस्ट्रेट आपल्याला पाटलौन चढवायला मनुष्य नाहीं म्हणून कुरकुरत असतात. आणखी एक काँग्रेस-कमिटीचे पेन्शनर आहेत. काँग्रेसचें काम त्यांनीं करूं नये म्हणून तनखा देऊन त्यांना माझ्याकडे ठेवलेलें आहे. ते चिडतात कीं, माझें व्याख्यान ऐकायला बाकीचे कोणी बसत नाहींत!

आणि तशांत सहकुटुंब म्हातारे बोर्डिंगांत ठेवण्यांत मीं मोठाच गाढवपणा केला. त्या बायकांनीं आपापल्या नवऱ्यांनाच नव्हे तर मलादेखील जीव नकोसा केला आहे. मोठमोठ्या अम्मलदारांच्या बायका कैकाडणींसारख्या भांडतात. रावबहादुरणी रावसाहेबणींशीं तुच्छतेनें वागतात, रावसाहेबणी साध्या पेन्शनरणींचा अपमान करतात. नवऱ्याच्या पेन्शनच्या आंकड्यावरून आपला मानापमान ठरावा असा कांहींजणी आग्रह धरतात, तर दुसऱ्या आपला नवरा किती तरुण आहे या चढाओढीनें वागतात. एकदां एका पोस्टल इन्स्पेक्टरची बायको व एक दिपोटीण यांची आपल्या नवऱ्याला गळपट्टा विणण्याची शर्यत लागली; एकीनें सोळा रंगांच्या लोकरी वापरल्या, तर दुसरीनें आपला गळपट्टा साडेतेवीस फूट लांब विणला. बायकोच्या धाकानें बिचाऱ्या इन्स्पेक्टरनें तो गळ्याला गुंडाळला. पण त्याचीं टोंकें जमिनीवर लोळत; तेव्हां दिपोटीच्या बायकोनें आपल्या नवऱ्याला चिथावून त्याला दुसऱ्याच्या गळपट्ट्याच्या टोकांवर चालतां चालतां पाय द्यायला लावलें. बिचारा डाकतपासनीस गळफांस बसून मरतच होता, मी तेथें होतों म्हणून निभावलें.

तसेंच कुठल्याशा सोसायटीचे अगदीं टेकीला येऊन पेन्शनींत निघालेले दोन लाइफमेंबर्स होते; त्यांनीं डोक्यांत घेतलें कीं बस्स, शरीर कमवायचें. त्यांचीं आसनें, नवली, धौती आणि बस्ती यांनीं सगळें बोर्डिंग हैराण झालें. अखेर त्यांच्या त्यांच्या बायकांच्या चिथावणीनें एक दिवस भर लायब्ररींत या दोन जख्ख म्हाताऱ्यांची चांगलीच जुंपली. त्याचा

परिणाम म्हणजे त्यांतल्या एकानें आपले दांतच गिळले आणि दुसऱ्याला उसण भरून तो एकाद्या खांबासारखा जो ताठ झाला तो आठ दिवस वांकेच ना.

त्यांतल्या त्यांत थोडीं गरीब स्थितींतलीं जीं जोडपीं होतीं त्यांना एकमेकांवर फुशारकी मारायला दुसरें कांहीं मिळालें नाहीं तर आपापल्या वंशविस्ताराच्या बढाया तीं अहमहमिकेनें मारूं लागलीं. परिणाम असा झाला कीं रविवारीं एका जोडप्याला भेटावयाला त्यांच्या चार मुला-मुलींचा विस्तार म्हणजे लहानमोठीं एकवीस माणसें व दुसऱ्याचा मुलांचा व नातवंडांचा मिळून सदतीस डोक्यांचा गोतवळा येऊन उभा राहूं लागला. त्यामुळें इतर म्हाताऱ्यांच्या कपाळाला तिडीक येऊन ते सगळे कुरकुरत जागे राहूं लागले व पुन्हां त्यांच्यात्यांच्यांत भांडणें सुरूं झालीं.

स्त्री ही सगळ्या अनर्थांचें मूळ आहे म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. विधुरांसाठीं खास राखून ठेवलेला गाळा पुष्कळच शांत असे; पण जोड-प्यानें राहणाऱ्या पेन्शनरांच्या दारावरून जरी रात्रीं बाराला गेलों तरी आंत कुरबुर, तक्रारी, भांडणें, दम असल्या गोष्टी कानावर पडायच्या. जन्मभर नोकरींत गुंतल्यामुळें ज्या लोकांनीं आपल्या बायकांची उपेक्षा केली ते लोक पेन्शन घेतल्यावर त्या बायकांच्या तावडींत पुरे सांपडलेले दिसत होते!

‘ अहो, लागलांत कां घोरायला ? माझं बोलणं न ऐकायला ही युक्ति करतां होय ?’

‘ निजा बरं आतां—त्रिफळा घेतलांत कां ? ’

‘ कसली भिकार कवळी ही दांतांची ? त्या सतरा नंबरच्या खोलीं-तल्या नाझराच्या बायकोनं आपल्या नवऱ्याचे दांत मला दाखवले—एक सोन्याचा दांत आहे त्याच्यांत ! तुम्ही एवढे अगदीं मामलेदार होतां पण—उद्यां सकाळीं सोन्याच्या दांतांची कवळी आणली पाहिजे... ’

‘ ऐकलंत कां ? उद्यांच्या उद्यां मला जाड भिंगांचा चष्मा हवा—त्या अकोटेणच्या बायकोहून जाड भिंगं पाहिजेत—’

'हजार वेळां तुम्हांला सांगितलं कीं निजतांना टोप काढून ठेवा म्हणून. धांदरटासारखे सकाळीं तो टोप तोंडावर घेऊन उठतां नि म्हणतां कीं एका रात्रींत किती दाढी वाढली आहे म्हणून—'

'अग' अशी रागावूं नको, ब्लडप्रेशर वाढेल—'

'छाती शेकायला ते इतकं फॅन्सी कापड कशाला ?'

'सिम्कॉक्स साहेबानं देखील माझी अशी कधीं चूक काढली नव्हती—आणि तूं सांगतेस ?'

'बरं बरं—जायचं असलं तर जा खुशाल कॉंग्रेसमध्यें—माझं डोकं खाऊं नको—निजूं दे आतां'

'अहो, बाईसाहेब, नीट चेपा कीं जरा पाय, डुकल्या काय घेतां ? पेन्शन घेतलें कीं शिंची बायकोदेखील शिरजोर होते कीं काय ?'

विधुरांना वेगळा मजला दिल्यामुळें ते शान्त असत असें मी म्हणालों खरें, पण ती शांतता फार दिवस टिकली नाहीं. बायका—विशेषतः बरोबरीच्या पोक्त बायका—आसपास असल्या म्हणजे सहकुटुंब म्हातारे थोडे तरी दबून वागतात; पण विधुर सगळे एका नर—तबेल्यांतच कोंडले गेल्यामुळें पहिल्यानें ठीक राहून नंतर एकाएकीं चेकाळले. एके रात्रीं दोन वाजतां विधुर—विभागांत भयंकर आरडाओरडा होऊन मला बोलावणें आलें. जाऊन बघतों तों एका रिटायर्ड फौजदाराचा गळा एका पेन्शनर पी. डब्ल्यू. डी.च्या अकौंटंटनें धरला होता व फौजदार त्याच्या नडगीवर लाथा झाडीत होता. दोघेही सर्दी झालेल्या रेड्यासारखे डुरकण्या फोडीत होते. भांडणाला कारण काय तर मत्सर ! सपत्निक राहणाऱ्या पेन्शनरांत एक सेवानिवृत्त सबजज्ज आपल्या तिसऱ्या बायकोला घेऊन राहात असत. ती जरी ठरविलेल्या वयोमर्यादेपेक्षां बरीच तरुण म्हणजे बेचाळीस वर्षांची होती, तरी तिच्या पतीला तिच्या सोबतीशिवाय झोंप येत नसल्यामुळें तिच्या बाबतींत अपवाद करून (व दुप्पट चार्ज लावून) मीं तिला निवासांत राहण्याची परवानगी दिली होती. मारामारी करणारे विधुर 'मुली, मुली,' म्हणून तिच्याभोंवतीं घोटाळत. आदल्याच दिवशीं अकौंटंटनें फौजदाराला बजावलें होतें कीं 'तुझें वय अवघें छप्पन्न वर्षांचें असल्यामुळें तुला मुली

म्हणून तिच्या पुढें पुढें करण्याचा अधिकार नाहीं' फौजदारानें उलट उत्तर दिलें होतें कीं 'तूं त्रेसष्ट वर्षांचा असलास तरी तिच्या पाठीवरून हात फिरवणें तुला शोभत नाहीं.' या वादाची अखेर आधीं सांगितलेल्या मारामारीपर्यंत पोहोंचली. सबजज्जाला ही कुणकुण लागतांच तो घाई-घाईनें 'सहकुटुंब' 'निवास' सोडून गेला. पाठोपाठ दोघेही विधुर प्रतिस्पर्धी आपापलीं पुन्हां लग्नें जमविण्यास वाईस निघून गेले. मनुष्य-स्वभावाचा हा अनुभव आल्यावर मीं विधुरांचा वेगळा विभाग काढून टाकला. आतां सगळे मिळून राहतात. त्यानंतर दोन जख्खड हेडक्लार्कांत झालेल्या 'सिव्हिल सर्व्हिस रेग्युलेशन' वरूनच्या कुस्तीखेरीज भांडणें कांहीं विशेषशीं झालीं नाहींत.

आतां थोडी तरी उसंत मिळाली म्हणून मी स्वतःची पाठ थोपटून घेणार इतक्यांत एक नवीनच कुलंगडें निघालें. इतक्या दिवसांच्या गडबडींत माझा रोमान्स चालू ठेवायला मला वेळ मिळत नव्हता. रावसाहेब नाफड्यांची नली येऊन गेली कां नाहीं हें कळायला देखील फुरसत नव्हती. निवासाला तिच्या भेटी पहिल्यापेक्षां कमी होतात हें माझ्या लक्ष्यांत यायला लागलें होतें. दरम्यान तिच्या बापाला मी अगदीं खूष ठेवला होता. प्रीतिविवाह, प्रियाराधन वगैरे गोष्टींची मी मोठ्या चातुर्यानें त्याच्याशीं चर्चा करीत होतों. म्हाताऱ्याचीं मतें पुष्कळच पुरोगामी होऊं लागलीं होतीं. माझ्याबद्दल त्याचा ग्रह, 'मुलगा प्रलोभनीय आहे' या शब्दांत ज्ञानप्रकाशांतल्या एकाद्या जुळाऱ्यानें देखील सांगितला असता. आतां केव्हां तरी चांगला दिवस पाहून नलीबद्दल गोष्ट काढावी असें मी ठरवीत होतों—

इतक्यांत थेरड्यानें आपल्या उपरण्याच्या फटकाऱ्यानें माझा पत्त्यांचा बंगला कोसळून पाडला. म्हातारपणीं 'हरिहरि' करायचें सोडून भलत्या कल्पना त्याच्या डोक्यांत कुठून आल्या कोण जाणे? बोर्डिंगांत एक पेन्शनर हेडमास्तर आपल्या बहिणीसह राहात होता. त्याला त्या एका बहिणीशिवाय कोणीही नातलग नसल्यामुळें मीं तिच्या बाबतींत अपवाद करून तिला राहूं दिलें होतें. तशी ती बया छबूबाई अगदीं बिनधोक दिसत होती. लठ्ठ, गिड्डी, काळी, चष्मेवाली, विधवा व

पंचेचाळीस वर्षांच्या वर वयाची होती ती. ब्रह्मदेशांत कुठें पंधरावीस वर्षें नोकरी करून आलेली तीही पेन्शनर होती. धंद्यामुळें साहजीकच नीटनेटकेपणाची संवय लागली होती तिला. हा रावसाहेब नाफड्या रेव्हेन्यू खात्यांतला पेन्शनर असल्यामुळें (साहेबांपुढें) गोंडा घोळण्याची कला पुरी हस्तगत केली होती त्यानें ! या कलेच्या जोरावर आणि मी बेसावधपणें (माझ्या स्वतःच्या दृष्टीनें) बोललेल्या प्रणयाच्या कल्पनांवर, या कपीनें केव्हां जाऊन त्या छबूबाईला भुरळ घातली तें मला कळलें देखील नाहीं. बॉम्बगोळ्यासारखी ही गोष्ट एकाएकीं माझ्या कानांवर आली. एक दिवस सकाळीं मी माझ्या ऑफिसांत बिलें तयार करीत बसलों होतों. रावसाहेब येऊन एका खुर्चीवर बसला. या गोष्टीनें हुरूप वाटून मीही काम बाजूस ठेवलें व साधल्यास आतांच विषय काढावा असा विचार केला.

" कसं काय रावसाहेब ? आपली तब्येत येथें फारच सुधारल्या-सारखी दिसते–" मी औपचारिक रीतीनें म्हणालों. त्याचा चेहरा खुलला;

" मला देखील असंच वाटतं आहे. मी अलीकडे–"

" मनुष्याच्या मनाला वाटतें तितका तो तरुणच असतो–"

" अगदीं बरोबर ! पुरं पटलं तुमचं म्हणणं आम्हाला ! बाकी या बाबतींत तुमचे आभार मानायला पाहिजेत–"

" ते कसे ? "

' वा ! मनाला तारुण्य देण्यासारख्या गोष्टी तुम्हींच नाहीं का मला सांगितल्यात ? अहो, रोमान्ससारख्या विषयांनीं मन कसं ताजंतवानं होतं ! मनच काय, पण शरीर देखील ! " यावेळीं माझें लक्ष गेलें. रावसाहेबांनीं तलम मलमलीचा सदरा घातला होता; ते करवतीकांठीं धोतर चापून चोपून नेसले होते, मिशांना व डोक्यावरच्या नऊ दहा केसांना त्यांनीं कलप लावला होता. ही वेळ आपली गोष्ट काढायला बरी आहे असें वाटून मी म्हणालों,

" मला आपल्याजवळ एक महत्त्वाची गोष्ट बोलायची आहे–"

" वाहवा ! काय योगायोग आहे ! मला पण तुम्हांला एक मोठी मजेदार बातमी द्यायची आहे–"

" नलिनीबद्दल-"

" उं: ! नलीबद्दल काळजी करायला वेळ नाहीं मला ! तिची ती मुखत्यार आहे-"

" खरं म्हणतां ? मग -"

" पण माझी खबर तर ऐका. तुम्हांला आनंद होईल, कीं नकळत तुम्हीं एक शिष्य तयार केलांत-"

" म्हणजे ?"

" आम्हींही रोम्यांटिक झालों ! मनाच्या तारुण्यानें हुरूप येऊन मीही प्रीतिविवाह करीत आहे-आणि याबद्दल मी-मीच काय पण आम्हीं उभयतां-तुमचे ऋणी राहिलें पाहिजे-"

इतका वेळ दाराआड उभी असलेली छबूबाई लाजतलाजत रावसाहेबांच्या बाजूला येऊन उभी राहिली !

या भयानक प्रकारानें मिनिटभर मी स्तब्धच होऊन गेलों. या आचरटपणाचा मला विलक्षण वीट उत्पन्न झाला. ' मूर्ख मनुष्याचा विनोद आणि कुरूप स्त्रीचा लडिवाळपणा ' यांच्या ओळीला ' वयस्कांचा शृंगार' गडकऱ्यांनीं कां बसवला नाहीं असें ' मायामच्छिंद्र ' पाहतांना मला वाटलें होतें—त्याच्या दसपट तीव्रपणानें यावेळीं मला तसें वाटलें. मळमळल्यासारख्या आवाजांत या घोडजोडप्याला अभिवंदन करून झोंकांड्या खातखात मीं बिछान्यावर जाऊन पडलों...

यानंतर पांचएक मिनिटें बंड्या स्तब्ध होता. अखेर मी विचारलें,

" पण नलिनीचं काय झालं ? ती तर स्वतःची मुखत्यार होती ना ?"

कांहीं अपशब्द उच्चारून बंड्यानें आपलें नलीबद्दलचें मत व्यक्त केलें;

" चांगला उपयोग केलान् तिनं आपल्या मुखत्यारीचा ! बाप पुनर्विवाह करणार हें कळल्यावर ती इतकी चवताळली कीं कॉलेजांतल्या एका भुक्कड, सुक्कड चष्मेवाल्या डेमॉन्स्ट्रेटरशीं तिनें लग्न लावलेंन्- आणि घरांत सावत्र आई आणायला मी कारण झालों म्हणून माझें तोंडदेखील कधीं पाहणार नाहीं म्हणून मला कळविलें......"

# सामायिक रांधा

नाविन्य ही एक मोठी अजब भावना आहे. त्या भावनेच्या आहारीं गेलेल्या माणसाला सारासार विचार, दूरदृष्टि, औचित्याचा अदमास वगैरेंचें भान राहात नाहीं, असें ज्ञाते, महात्मे व इतर थोर लोक सांगतात. [ स्त्री-विषयक नाविन्याच्या भावनेचें समर्थन पाहिजे असल्यास कोणत्याही नवमतवाद्याला विचारावें. वि. मा. साठीं फ्रॉइड, रसेल इत्यादि साहेबांचे ग्रंथ पहा. ] मनुष्यप्राणी प्रथम कपडे घालूं लागला तें कांहीं तरी वेगळें वाटलें म्हणून; कारण जगाच्या प्रभातकालीं अंगावरचे केंस ऐवढेंच आच्छादन त्याला पुरेसें होतें. आतां नग्नसंघ निघाले आहेत; तेसुद्धां त्यांतील सदस्यांच्या कांहींतरी अभिनव भावनांच्या प्रेरणेनेंच, असा मानसशास्त्रवेत्त्यांचा अभिप्राय आहे. नाविन्याच्या लालसेनें मनुष्याच्या खाद्यपेयांत, वस्त्रप्रावरणांत व निवाऱ्या–उघडेपणांत किती फेरफार झालेले आहेत–ते कोणत्याही विश्वसनीय इतिहासाच्या पुस्तकांत आढळतील. मानवी प्राण्याच्या वैयक्तिक आवडीनिवडी व त्याची करमणूक या गोष्टी तर केवळ नाविन्याच्याच पायावर उभारलेल्या आहेत. ‘ सौंदर्य ’ या व्याख्या न करतां येण्यासारख्या गुणाची व्याख्यादेखील एका संस्कृत कवीनें केली आहे कीं ‘ क्षणेक्षणे...इ. ’ ( ही माहिती एकादा संस्कृतज्ञ अचूकपणें देऊं शकेल. ) सारांश काय कीं, नाविन्याची पिपासा प्रत्येक माणसाच्या ठायीं कमीजास्त प्रमाणांत असणें हें केवळ नैसर्गिकच नव्हे तर त्याच्या निरोगी जीवनाला अत्यंत आवश्यकही आहे. सनातन्यांसारख्या कांहीं माणसांत नवेपणाची हौस दाबून टाकलेली असते; ( व अशाच लोकांसंबंधीं फ्रॉइडनें ‘ दाबून टाकलेल्या भावनां’चें सूत्र मांडलें आहे असें ऐकण्यांत येतें ) तर उलट कित्येक नवमतवाद्यांच्या नाविन्य–भावना कायदेशीर इलाजांनीं दाबण्याची वेळ येतेसें आपण पहातों.

सामान्य पांढरपेशा—किंवा अर्थशास्त्राच्या भाषेंत कनिष्ठ—मध्यम—वर्गीय लोकांत नाविन्याचे निरुपद्रवी प्रयोग बरेच पहायला मिळतात. कोंडूअण्णांचा पहिला ओपनकॉलरचा कोट त्यांना महिनेन् महिने खुषींत ठेवतो, त्यांच्या गंपूचें आम्लेट खाण्याचें चोरटें पाप त्याला कित्येक दिवस गोड गुदगुल्या करीत असतें, व रमाकाकू केवळ वरच्या मजल्यावर रहायला गेल्यामुळें उच्च वातावरणाच्या कल्पनासृष्टींत रममाण असतात. खाजगी जीवनाव्यतिरिक्त, सामाजिक आयुष्यांतही महाराष्ट्राचा अद्वितीय (कारण तसा हिंदुस्थानांतील कोणत्याही प्रांतांत नाहीं) मध्यम वर्ग जाणून बुजून स्वतःची हौस (व नकळत इतरांची करमणूक) करीत असतो. उ०—धोतर नेसून वर ह्याट घालणारा पुणेरी सायकलस्वार किंवा इरकली लुगडें व नथबुगड्या यांनीं नटून पायांत टेनिस शूज घालणारी एकाद्या सरकारी अम्मलदाराची धर्मपत्नी, चौपाटीवर मोटर उभी करून तीन पैशांची भेळ खाणारा एखादा सूटबूटधारी, अथवा फॅशनेबल शृंगार करून एडी कँटरचा बोलपट पाहायला जाऊन 'लोक कांहो हांसतात?' हें विचारणारी एखादी नवतरुणी....इ.

नवतेच्या शोधांचे सांघिक प्रयत्नही बरेच झालेले आढळतात. व्यवहारांत अशा कांहीं संस्थांचा सरकारशीं तीव्र मतभेद झाल्यामुळें त्या विलयाला गेल्या आहेत, (उहाहरणार्थ, 'कागदी' लिमिटेड कंपन्या, लॉटऱ्या, बँका, स्लॉट मशीन्स वगैरे), त्याचप्रमाणें कलेच्या क्षेत्रांतही नवयुगप्रवर्तक होऊं पाहणारीं कांहीं संघकार्यें नामशेष झालीं आहेत—जसें बंद पडलेल्या सर्व सिनेमा कंपन्या, सर्व नियतकालिकें, नाट्यमन्वंतर लिमिटेड, अलगूज, बुलबुलतरंग इत्यादि वाद्यें, देशभक्ति वगैरे—तथापि अशा पराभवांनीं हताश न होतां हौशी माणसें नेहमीं नवनव्या क्लृप्त्या काढून आपल्या जिवाला विरंगुळा व इतरांना कौतुक देण्याच्या उपक्रमांत असतात. कुंकू न लावणें, गोल नेसणें, व्यायाम घेणें, गाणें शिकणें, वळू नजर करणें, पुरुषांना शिव्या देणें, झुणका—भाकर किंवा लोकमान्य—भोजन उभारणें, इत्यादि कार्यासाठीं अहमहमिकेनें एकत्रित होऊन समाजांत भयंकर क्रांति करून टाकण्याचा बूट कित्येक आस्थेवाईक मंडळींनीं बांधलेला दिसतो....

आमचे जनूभाऊ मोठे उत्साही गृहस्थ. सामाजिक रूढि, बहुजन-सम्मत धर्म व सामान्य कुटुंबव्यवस्था यांच्याशीं चकमक न उडेल इतक्या बेतानें नाविन्याचे धाडसी प्रयोग ते नेहमीं करीत असत. आपल्या मुलीला बाहेर जाते वेळीं पावडर लावण्याची परवानगी त्यांनीं खुल्या दिलानें दिली होती, सोवळें न नेसतां जेवण्याचा पायंडा गेल्या दहाबारा वर्षांपासून घरांत पाडला होता. त्यांच्या स्वतःच्या राहणींत तर त्यांनीं विलक्षण धडाडीच्या सुधारणा केल्या होत्या. लढाईच्या दिवसांनंतर सेल्युलॉइडची कडक कॉलर व काळा लॉंग कोट घालणारे जनूभाऊ आतां चाळिशी उलटल्यावर खेळाडू खमीस [स्पोर्टिंग शर्ट] वापरूं लागले होते. जन्मांत कधीं काचा न मारतां नेसलेलें धोतर सोडून त्यांनीं आतां पैजामा पेहेरण्याची प्रथा पाडली होती; त्यांच्या मिशांतली उत्क्रान्ति तर महाराष्ट्रांतील विचारप्रवाहाच्या इतिहासाचें टांचणच म्हणण्यासारखी झाली होती. सुरवातीच्या वाघनखी मिशांना लढाईच्या दिवसांत त्यांनीं कैसरी वळण दिलें होतें; कैसरचा पराभव झाल्यावर त्यांनीं विजयी राष्ट्राच्या सन्माननिदर्शक म्हणून 'फ्रेंच कट्'नें आपला वरचा ओंठ शृंगारला होता. फिरून वृद्ध वडिलांची दृष्टि अधू झाल्याची संधी साधून, जनूभाऊंनीं 'सफाचट' केली ती अगदीं गेल्या दोनतीन वर्षांपर्यंत; पण पुढें लौकरच जॉन गिल्बर्ट, रोनॉल्ड कॉल्मन वगैरे नटांचीं चित्रें पाहून ते परत दाभणकांठावर आले होते.

आमच्या डिंग्रेवाडींत एखादी नवी टूम निघाली कीं ती जनूभाऊंच्या पुढाकारानेंच असें जवळजवळ ठरल्यासारखेंच झालें होतें. [अशा वेळीं 'एक अभिनव उपक्रम' म्हणून वर्तमानपत्रांत बातमी छापून आणण्याचीही व्यवस्था जनूभाऊच करीत.] केसरी व तत्सम पत्रांत शिफारस झालेले अभिनव उपक्रम जनूभाऊंना फार प्रिय, व अशा शिफारशीबरहुकूम एखादें कार्य पार पाडल्यावर आपल्या फोटोसह 'एक यशस्वी प्रयोग' केसरींतून छापून यावा अशी त्यांची चोरटी महत्त्वाकांक्षा होती. डिंग्रेवाडींत मेळे, प्रौढशिक्षणाचे वर्ग, धंदेशिक्षणाचे पाठ, व्याख्यानें, कीर्तनें, पुराणें, प्रवचनें, काव्यगायन, जादूच्या दिव्यासहवर्तमान होणारीं भाषणें, चढाओढी, नमस्कार, गीतापाठ वगैरेच्या चुरशी, बायकांच्या कलाकौशल्याचीं प्रदर्शनें,

थोडक्यांत म्हणजे मोफतांत किंवा थोडासा चट्टा लागून होणारा बहुतेक कार्यक्रम—व बराचसा खार लागून होणारा गणपतिउत्सव—जनूभाऊ गणपुल्यांच्याच नेतृत्वाखालीं, अशी डिंग्रेवाडीला एक संवयच पडून गेली होती. आमच्या वाडीच्या चतुःसीमेचा जनूभाऊ हा मर्यादित महात्मा होता. महाराष्ट्राच्या अल्पसंतोषी व्याख्यापद्धतीमुळें त्याला जगांतील बहुतेक मोठ्या व्यक्तींच्या पदव्या आमच्या वाडीपुरत्या देतां आल्या असत्या; श्री. लक्ष्मणराव किर्लोस्कर जसे महाराष्ट्राचे हेन्री फोर्ड, पुण्याचे द. ना. हेजीब जसे सर टॉमस लिप्टन, साबणकार वर्तक जसे इब्सेन, असोद्याचे द. गो. काळे जसे डार्विन, 'डॉ.' अण्णा नवले जसे लुइ पाश्चर, तसे जनूभाऊ डिंग्रेवाडीचे ल्यूथर—फ्रांक्लिन—लिंकन—राममोहन—दयानन्द—धर्मवीर—लोकमान्य—देशभक्त समाजसेवक होते! (याबद्दल कोणाला संशय आल्यास ते स्वतः असल्या संशयी माणसाची खात्री करायला नेहमीं तयार असत—फार काय, संशय नसलेल्याही माणसाची खात्री करण्यास दर बिऱ्हाडांत एक फेरी टाकण्याचा त्यांचा क्रम होता.] अलिकडे वाहणारे वारे पाहून, त्यांनीं आपल्या भाषणांत 'विषम समाजरचना' 'राबविण्याच्या सुधारणा' 'नागरीक स्वातंत्र्य,' 'मूलभूत हक्कांची घोषणा,' 'घटस्फोटनिर्बंध,' 'संक्रमणशील कुटुंबजीवन' 'स्त्रियांचें आर्थिक स्वातंत्र्य' 'पुरुषांची पारंपरिक सुलतानशाही' वगैरे (सामान्य कारकुनी जिभेला कष्टानें पेलणारे पण छाप पाडण्याच्या बाबतींत भयंकर परिणामकारक) शब्द वापरण्याचा सराव ठेवला होता. डिंग्रेवाडींतले बहुतेक पुरुष चाकरी करून पोट भरण्याच्या महत्त्वाच्या कार्यांत गुंतलेले असल्यामुळें, जनूभाऊंच्या श्रोतृवृंदांत वाडीचा महिलासमाज व अर्भकें यांचाच भरणा फार असे. जनुभाऊंना कल्पनांचा प्रचार करायला सभाच भरवावी लागे असें नाहीं. ते मोकळ्या मनानें घरोघर जाऊन आपलें कार्य चालू ठेवीत. त्यांना संकोची वृत्तीची अडचण मुळींच नव्हती. थोड्या ओळखीवर थेट स्वयंपाकघर गांठण्याच्या अवधीचा त्यांचा विक्रम उभ्या मुंबईत अजोड असेल. ते एखाद्या बिऱ्हाडांत आले कीं पुरुष मंडळी कांहीं काम आठवून बाहेर पडत व शिल्लक बायकापोरांत

जनूभाऊ आपलीं मतें गर्जून मांडीत. (त्यांचें वय धोक्याच्या सीमेपलीकडे गेलें असल्यामुळेंच वाडीकर आपल्या बायकांशीं त्यांना बोलूं देत हें सांगणें नलगे.)

अशा परिस्थितींत सामाइक स्वयंपाकाची कल्पना जनूभाऊंच्या कानांवर कोठूनशी पडली मात्र, ताबडतोब ते वाडींत धांवत आले! स्नान करतांना 'युरेका!' (सांपडला) म्हणून डुरकणी फोडून आर्किमिडीज जितक्या उत्साहानें न्हाणीघराबाहेर नंगा धांवत आला (त्याला बहुशः हातांतून सारखा निसटणारा साबण अखेरीस पकडल्याचा विजयोन्माद झाला असावा] तितक्या उत्साहानें धोतर गुडघ्यांच्या वर धरून गुंड्या उघड्या टाकलेल्या पैरणींत जनूभाऊ परत घरीं आले. एकदम स्वयंपाकघरांत जाऊन ते ओरडले,

"सामाईक स्वयंपाक–एक रांधा–कॉमन किचन!"

"प्राण गेला तरी एकत्र सैंपाक व्हायचा नाहीं माझा तुमच्या त्या भावाबरोबर!" लक्ष्मीबाईनीं त्यांना निक्षून सांगितलें. मागें कधीं जनूभाऊ आपल्या बंधूसह एकत्र रहात होते, पण कालांतरानें वेगळे झाल्यावरही 'घरांत' इतकी तेढ कायम राहिली होती!

जनूभाऊंनीं त्यांचा गैरसमज दूर केला; वाडींतल्या अखिल भगिनीवर्गास आपली उन्नति करून घेण्यास भरपूर वेळ राहावा म्हणून, सर्व बिऱ्हाडांचा मिळून एक स्वयंपाक करण्याची अचाट कल्पना होती त्यांची. ते वर्णन करतांना अगदीं रंगून गेले होते!

'खालच्या परसांत एक पत्र्याची शेड करून चर खणायचे आणि रोज बायकांच्या वेगळ्या तुकडीनें रांधा करायचा. आपल्या वाडींत एकशें-पंधरा बिऱ्हाडं आहेत, त्यांतले बिनबायकावाले जरी वगळले, तरी तिघी-तिघींचा गट महिन्यांतून एकेक दिवस, याप्रमाणें महिन्याला दर बाईला फक्त एक दिवसच काम राहील, बाकीचा महिनाभर व्याप नाहीं–'

'तर तर; आणि सोंवळ्या बायका, कॉलेजपर्यंत शिकलेल्या बायका, आजारी बायका, शिवायचं नसलेल्या बायका, आणि डोहाळे लागलेल्या

बायका, एवढ्या आणखी वगळायला लागतील त्या ? पुन्हां नवीन लगीन झालेल्या नवऱ्यांच्या लाडक्या बायका नि जुनं लगीन झालेल्या नवऱ्यांना न जुमानणाऱ्या बायका, नवेपणामुळं काम न येणाऱ्या आणि लठ्ठपणामुळं काम न होणाऱ्या, एवढ्या आणखी बाजूला ठेवल्यात कीं झालं ! उरतां उरल्या माझ्यासारख्या बिनमजुरीच्या मोलकरणी ! आमचं काय मेलं, चोवीस तास घरांत राबायचं तें आतां सगळ्या चाळीच्या डोंबलावर जेवण घालायला राबायचं-महिनाभर आम्हीच सैंपाकणी व्हायच्या ! नको ग बाई, मी साफ सांगतें कीं कांहींदेखील चालायचं नाहीं इथं—मी मुळींच कबूल नाहीं या तुमच्या थेरांना—'

जनूभाऊ थोडे नाउमेद झाले, पण पुन्हां त्यांनीं आपल्या योजनेचे फायदे वर्णन करण्यास सुरवात केली;

" अग—हें बघ, वेळ किती रिकामा राहील, खर्चांत किती बचत होईल—"

" मीं एकदां सांगितलं ना, मला नको म्हणून ? "

" ठीक आहे, सगळी वाडी तयार झाल्यावर चुंबित तयार होशील—"

" हो हो—बघतें ना आतां—"

असे निकराचे शब्द झाल्यावर इरेस पेटलेल्या जनूभाऊंनीं आपल्या भव्य योजनेचा प्रचार करायला ताबडतोब सुरवात केली. त्या रात्रीं साडेबारापर्यंत त्यांनीं पांच सदस्य मिळविले. प्रतिपक्षाला कंटाळा आणून अखेर वैतागानें कबूल व्हायला लावायचें अशी त्यांची हुकमी युक्ति होती.

सुमारें एक महिन्याच्या प्रचारानें त्यांना वीस एक सभासद 'हो' 'ना' करीत मिळाले. दरम्यान त्यांच्या या कार्याच्या बातम्या बऱ्याच मराठी वृत्तपत्रांतून त्यांनीं छापवून आणल्या होत्या. अखेर जास्त लोक सामील होत नाहींत हें पाहून महिनाअखेर त्यांनीं मुंबईतील सर्वांत कुरूप विदुषी शोधून आणली. [त्यामुळें वाडींतील बायका अर्थात्च खूष झाल्या] व तिच्या हस्तें 'डिग्रेवाडी सामायिक स्वयंपाकसमिती' या संस्थेचा उद्घाटनसमारंभ केला. आणलेल्या विदुषीनें आपल्या भाषणांत 'वारसा-हक्क' 'मतदानाचा अधिकार' 'कायदेशीर दुर्दशा' 'आर्थिक स्वातंत्र्य'

वगैरे शब्दसमुच्चय आणून पुरुष जातीला बऱ्याच शिव्या दिल्या. [ आणि वाडींतील बायकांना बाईच्या रूपाकडे पाहिल्यानंतर तिच्या बोलण्याबद्दल कांहींच आश्चर्य वाटलें नाहीं. ] शेवटीं मुहूर्ताचा भात वैरून बाईनीं सामायिक स्वयंपाक सुरू झाल्याचें जाहीर केलें. [ व जनूभाऊंनीं मुद्दाम तयार ठेवलेल्या पांचपंचवीस लंगोटीवाल्या पोरांनीं ताटावर वाट्या वाजवून मंगलनिनाद केले ] बाईनीं वैरलेले निम्मे तांदूळ खालीं सांडले; कारण गेल्या पंधरा वर्षांत त्या चुलीपाशीं कधीं वांकल्या नव्हत्या.

पहिल्या दिवसाचा सामायिक रांधा विशेषशी टीका न होतां खपून गेला; कारण आपापल्या बिऱ्हाडीं स्वतंत्र स्वयंपाक करण्याचा दूरदर्शीपणा महिलांनीं अगोदरच दाखविला होता. संध्याकाळीं मात्र थोडासा घोंटाळा झाला: दुपारच्या अन्नपूर्णा संध्याकाळच्या स्वयंपाकाला सहीसलामत राहिल्या नाहींत. शंभर पानांचा स्वयंपाक मुंबईच्या तिघींनीं करणें म्हणजे कांहीं लहानसहान गोष्ट नव्हती; संध्याकाळीं हालचाल करण्याचें त्यांनीं साफ नाकारलें. दुसऱ्या दिवशींच्या तिघीही आपली पाळी आल्याशिवाय खालीं उतरण्यास तयार होईनात. अखेर चारपांच खानावळींतून मिळून तीस डबे जनूभाऊंनीं आणवले; सभासदांनीं नाकें मुरडीत कसे बसे चार घांस खाल्ले व जनूभाऊंनीं नुसत्या सर्वांच्या शिव्या खाल्ल्या.

दुसऱ्या दिवशीं सामाईक रांध्यांत सदस्यांनीं दिलेलीं बरींच भांडीं गहाळ झाल्याची ओरड झाली, म्हणून तीस कुटुंबांतील बायका भांड्याच्या हिशेबतपासणीला आल्या. भांड्यांवरून भांडणावर जायला त्यांना कंपाझिटरइतका देखील वेळ लागला नाहीं. दोन तीन जोड्यांची चांगलीच जुंपली. त्या दिवशींच्या तिघींपैकीं एकीचें डोकें या प्रकारानें दुखायला लागलें म्हणून ती सेवानिवृत्त झाली; तें पाहून दुसरीच्या पोटांत कळ येऊं लागली व तिसरीला 'दादरच्या अत्यवस्थ मावसबहिणीचा तांतडीचा निरोप आला' म्हणून ती पसार झाली.

जनूभाऊंनीं स्वतः भातपिठलें करून सर्वांना जेवायला घातलें. ही योजना रद्द करावी अशा कांहीं पुरुषी सूचना त्यांच्याकडे आल्या.

पण जनूभाऊ हट्टासच पेटले होते. त्यांनीं दुसरे दिवशीं ऑफिसांतून पंधरा दिवसांची रजा काढली. स्वयंपाकाची सगळीं भांडीं नवीं—आपल्या जबाबदारीवर—आणलीं. आचारी—पाणके—वाढपी वगैरे आणले, व अगदीं एखाद्या कार्यातल्या प्रयोजनासारखा बेत करून सदस्यांना जेवायला घातलें.

त्या दिवशीं आधीं एकदोन वेळां ज्यांनीं स्वयंपाक केला होता त्या बायकांनीं 'आम्हाला उगीचच राबवलं' असा गिल्ला केला, व कांहीं कुटुंबांतून इतका खर्च कोणत्या अधिकारान्वयें केलांत म्हणून विचारणा आली.

बेफाम झालेल्या जनूभाऊंनीं 'माझ्या स्वतःच्या जबाबदारीवर' असें उत्तर दिलें.

नंतर कांहीं कुटुंबांनीं 'आमच्या घरीं आणून जेवण वाढलें पाहिजे' अशा हक्काची घोषणा केली.

इतरांनीं इतक्या मिष्टान्नानें आमचीं मुलें आजारीं पडतात, तरी डॉक्टरच्या बिलाचीही समितीनें व्यवस्था करावी, असा आग्रह धरला.

घरकाम एकदम कमी झाल्यामुळें वेगवेगळ्या कुटुंबांतून वेगवेगळी प्रतिक्रिया दिसू लागली. वृद्ध ठमाकाकू धोंडूभाऊंजवळ धुळाक्षरें शिकण्याचा हट्ट धरूं लागल्या; तर तरुण शकुंतलाबाई 'आतां गड्याचं काम नाहीं' म्हणून गड्याला काढून टाकून कॉलेजांत नवऱ्यानें आपलीं पुस्तकें बरोबर घेऊन यावें असें फर्मावूं लागल्या. आपलें मुख्य कामच राहिलें नाहीं हें पाहून दोघीतिघी माहेरीं निघून गेल्या, व खाणावळीच्या जेवणाला कंटाळलेल्या दोघातिघां अविवाहितांनीं आपलीं ठरलेलीं लग्नें मोडून टाकलीं. तिबूनानांना आपल्या आळशी कुटुंबासाठीं लौकरच दार मोठें करण्याची वेळ येणार अशी भीति वाटूं लागली, तर बायकोला कधीं कधीं स्वयंपाकापासून रजा देण्याचा उदारपणा दाखवून अभक्ष्यभक्षण करायला जाणाऱ्या गणूकाकांना आतां निमित्त कांहींच उरलें नाहीं. वाडींतल्या बऱ्याच बेकार झालेल्या बायका वर्तमानपत्रें, बायकांचीं वृत्तपत्रें वगैरे वाचून 'हक्क' सारखे शब्द आवेशानें वापरूं लागल्या व त्याचा, परिणाम म्हणजे

गंपूनाना संन्यासी होऊन हिमालयांत निघून गेले व तीन जोड्यांनीं घट-स्फोटासाठीं बडोद्याला जाऊन राहण्याचा निश्चय केला. कांहीं धूर्त पति-राजांनीं आपल्या अर्धवट शिकलेल्या बायकांमागें दहापंधरा रुपयांची एखादी नोकरी धरण्याचा लकडा लावला.

जनूभाऊ मात्र अजून नेट धरून राहिले होते. रोज सकाळ संध्याकाळ ते आपल्या भटारखान्याच्या भोंवती एखाद्या बोलपटाच्या दिग्दर्शकासारखे गुंतलेले असायचे. आत्मविश्वास वाढविण्यासाठीं हातांत एक थावर किंवा पळा धारण करून, ते त्या पाकशाळेवर मोठ्या आवे-शानें देखरेख करीत होते. सिनेमांतल्या नटासारखे शोभणारे ते आचारी पाणकेही दिग्दर्शकाकडे काडीइतकें लक्ष न देतां आपल्याला हवें तें करीत होते.

महिना भरून हिशेबाची वेळ येईपर्यंत सामायिक–स्वयंपाक–समि-तीच्या सदस्यांनीं जनूभाऊंचे शंभर अपराध पोटांत घालण्याचें ठरविल होतें. तीस तारखेपर्यंत सुमारें नव्याण्णव अपराध झाले असावेत; कारण शंभरावा अपराध–आचाऱ्याच्या विडीचें भातांत पडलेलें थोटुक–एका सदस्याच्या अक्षरशः पोटांत जाण्याची वेळ आली होती. दुर्दैवानें तो इसम एक होमिओपाथिक ऊर्फ 'साबूदाण्या' डॉक्टर होता; त्यानें अन्न शास्त्रावरही एक पुस्तक लिहिलें होतें. म्हणून शेवटच्या दिवशीं त्यानें एकच गिल्ला उडवला.

एकतीस तारखेला रात्रीं सदस्य कुटुंबांतील पुरुषांनीं खासगी सभेंत जनूभाऊंवर निंदाव्यंजक ठराव आणला. ज्या गृहिणींच्या कार्यावर जनूभाऊंनीं एवढा आटाटोप केला होता त्यांनींच अखेर 'लुडबुड्या मेला' म्हणून त्यांना दगा दिला. जनुभाऊंवर अधिकाराचें आक्रमण, गैरव्यवस्था, पैशांचा अकारण दुरुपयोग, अफरातफर इत्यादि नऊ आरोप ठेवण्यांत आले होते. घरोघर जाऊन आपल्या व्यापाराचें समर्थन कर-ण्याची संधी न मिळाल्यामुळें जनूभाऊ गडबडले. त्यांचा अगदीं होअरसाहेब झाला.

पहिल्या तारखेपासून सामायिक—स्वयंपाकसमिति बंद पडली. कांहीं कांहीं सदस्यांनीं दिलेली वर्गणी व उरलेल्या सामानाची आडगिऱ्हाईकी विक्री करून जनूभाऊंना एकूण त्रेपन्न रुपये, सहा आणे, नऊ पै तोटा आला. लक्ष्मुबाईंची कुडी बदलून घेण्याचें अंदाजपत्रक तहकूब करून जनूभाऊंनीं ती खोट स्वतः भरून काढली व ते सार्वजनिक आयुष्यांतून निवृत्ति झाले! वाडीवर सूड म्हणून त्यांनीं एक गायनमास्तर आणून पोरांबाळांसह व पेटीतबल्यासह जोराची मेहनत सुरू केली. लक्ष्मुबाईंनीं दीड महिना त्यांच्याशीं अबोला धरला.

नंतर मात्र दर रविवारीं नियमानें आपल्या पतिराजांना सामायिक रांध्याची आठवण कठोर शब्दांत देण्याचा क्रम त्यांनीं चालू ठेवला आहे.

———

# कुलीन नटी

( मुंबई शहर, मध्यवस्तींतली चाळ; एक गचाळ खोली. प्रवेश केल्यावर समोर 'पोटखोली'चें दार. त्याच्या पलीकडे लहानमोठे घरगुती आवाज. दर्शनी खोलींतल्या एका मळकट सत्रंजीवर तीनचार कळकट पोरें बसलीं आहेत. त्या सर्वांनीं सुरवारी व सदरे परिधान केले असून लांब केस वाढविले आहेत, व सर्वजण आपापल्या बदसुरांत गुणगुणत आहेत. खोलीच्या एका कोंपऱ्यांत रचलेल्या ट्रंका, इतस्ततः लोंबणारे कपडे व धूळ खात पडलेलीं एकदोन संगीत 'हत्यारें' या गोष्टी आपापल्या परीनें स्पष्ट दर्शवीत आहेत कीं परगांवाहून आपल्या कलेवर पोट भरण्यासाठीं आलेल्या लोकांचा हा मुक्काम आहे.

या स्थळीं या सकाळीं तीन व्यक्ति प्रवेश करतात. पहिली व्यक्ति लांब सडक केंस, हिरवी दाढी, खोटें हंसू, शींप्याच्या जाहिरातीसारखे कपडे व सर्वसाधारण मुरडणें या गुणधर्मावरून 'हीरो' म्हणून तात्काळ ओळखूं येते; दुसरी व्यक्ति निर्विकार दगडी मुद्रा, झीरो नंबरचा चष्मा व 'रेडिमेड' सूट यावरून ओळखूं येणें कठीण आहे. पण हातांतल्या चामडी पिशवीवर नांवानंतर स्पष्टपणें लिहिलेल्या 'ऑथर' या अक्षरांमुळें तो लेखक आहे हा उलगडा होतो. तिसऱ्या व्यक्तीचा मवाली पोषाख पण निर्बुद्ध चेहरा कांहींच दर्शवीत नाहीं, पण त्याला 'शेठ' म्हणून 'हीरो' हांक मारतो व 'ऑर्टिस्ट' असें ऑथर संबोधितो यावरून तो 'प्रोड्यूसर" बनलेला 'फिलम आर्टिस्ट" असला पाहिजे असें दिसतें. तिघेही आपापसांत थोडें कुजबुजतात.

**शेठ**–( हलकेच पण जाड आवाजानें ) हीच खोली ना ? नाहींतर परवांसारखी चप्पल—

**हीरो**-( मुरका मारून ) उंः ! चपलेची काय कथा ! वेळ पडली तेव्हां या पठ्यानं चाबकाचा मारदेखील खाल्ला आहे.

**लेखक**–( लब्धप्रतिष्ठितपणानें ) असे धास्ती धरूं नका. शेल्फ-कॉन्फरन्स पाहिजे. आपण कलासेवक आहोंत. तुम्हाला भीति वाटली तर मी लिटरी मनुष्य आहे, मी कल्चर आहे—

**शेठ**–मग आवाज कशाला ? विचारा ना !

( इतक्यांत खोलीतलें एक बाळ येऊन उर्मटपणानें विचारतें–)

**बाळ नं. १**–कोण पाहिजे ?

**हीरो**–( आदबीनें ) हाः हाः हाः ! गारगोटे इथेंच राहतात का ?

**बाळ**–( दारांतून न हालतां ) हो. तुमचें काय काम आहे ! तुम्ही कोण ?

( बाकीचीं बाळें दारांत गर्दी करून उभीं राहतात. )

**लेखक**–आम्ही अजीब सिनेटोनचे–

( अलीबाबानें " तिळा उघड " म्हटल्यासारखा ताबडतोब दारांतून प्रवेश सुकर होतो. 'बाबा ! बाबा !' अशी पुकार होते. एक गृहस्थ धोतराला हात पुशीत गडबडीनें बाहेर येतो. गृहस्थ जाडा, गिड्डा व काळा असून इतर मुलांइतकाच कळकट आहे. त्याच्या तोंडावर तपकिरीचा पुरावा ताजा आहे, व हास्याची कल्हई हीरोच्या सवाई आहे ).

**गृहस्थ**–( दरबारी नमस्कारासह ) या, या, या ! वा, वा, वा-हें काय ? इकडे कुणीकडे ? अलभ्य लाभ ! मला बालगंधर्वांनीं सूचना दिलीच होती–पेंढारकरही म्हणत होते–सरनाईकांनीं सांगितलें–ते आतांच येऊन गेले–आमच्या बैठकींतली मंडळी ! बरं, काय घेणार ? चहा क, कॉफी ? का सरबत करायला सांगू ? छे, छे, छे ! तें कांहीं चालायचं नाहीं. वास्तविक जेवायलाच बोलावणार होतों मीं सर्वांना–आमचा कंगालपुरी पाहुणचार आपण घेतलाच पाहिजे–मग काय अरे वीरसेन, तीन सिंगल चहा सांग बरं खालच्या हॉटेलांत–दूध जास्त म्हणावं, चांगला करून आणायला सांग–आमचं सगळं सध्यां आहे टेंपरवारी–नुकतेच आलों इथं–रहिमतखांनींच आग्रह केला ! वाळकेश्वरीं बंगला घेतला आहे, फर्निचर तयार होईपर्यंत हे असेच हाल चालायचे–अहो

आम्हांला कुठली आली आहे सवय ! कंगालपुरांत सहा वाडे आहेत, सुखांत होतों; तपकीर ओढली तर रुमालांत शिंक पकडायला हुजऱ्या ना ! दरबारचे फर्स्टक्लास सरदार आम्ही ! शोकाखातर सारंगी वाजवायची बैठकीला इतकेंच ! बरं काय कांहीं कमिजास्त विशेष ?

लेखक–अजीब कंपनीचं नांव ऐकलं असेलच तुम्हीं—

बाबा–वा वा वा ! हें काय विचारणं ? आज आसेतुहिमाचल द्वारकेपासून जगन्नाथपर्यंत कीर्ति आहे–शिवाय आमचे दादासाहेब, काकासाहेब नानासाहेब, बाळासाहेब, तात्यासाहेब, दाजीसाहेब–सगळ्यांनीं सांगितलं आहे मला—

लेखक–थोडक्यांत म्हणजे आम्हाला हिरॉईनची जरूर आहे. ( बाबा चेहरा मुद्दाम एकदम गंभीर करतो ) ष्टोरी–आपलं ह्यः ह्यः–माझीच आहे–आणि मी ती मुद्दाम आपल्या बीनाबाईवर लिहिली आहे क्यॉक्टर–म्हणजे भूमिका फार उत्तम वटली आहे. आर्यशंस्कृती आपली—

बाबा–( वरपित्याच्या रुबाबांत ) तें सर्व ठीक आहे, पण ( तपकिरीची चिमूट बोटांत धरून ) आमची गोष्ट वेगळी आहे. आमची छोकरी म्हणजे लहानसहान कूळ नाहीं; गरम पडेल महाराजा–

शेठ–पैशाची फिकीर–

बाबाः–अहो कसला पैसा घेऊन बसलां ? न्यू थिएटर्सनीं लाख रुपयांची 'ऑफर' दिली होती, तुमच्या प्रभातवाल्यांनीं तर कंगालपुराला दारीं धरणं धरलं होतं, इतर दहा कंपन्यावाले येऊन गेले- पण छे ! आमची मुलगी वाटेल त्याच्याकडे–नाहीं–( पाहुण्यांची चुळबुळ पाहून ) पण केलैन् तर आमच्या मिजाशीनं एकादे वेळीं काम करील ! रत्न आहे रत्न ! हीं सगळींच पोरं रत्नं आहेत बरं ! माझी भाचरं–( दाखवीत ) तो भीमसेन, अंगानें जरा किरकोळ आहे पण मोठा खट्याळ ! तुमच्या वाटेल त्या ष्टंट करून दाखवील ! तो चहा आणायला गेलेला वीरसेन–थोडा मिश्रा–पण महा हुषार पोरगा; तो कोपऱ्यांतला विजयसेन–म्यास्ट्रिक फेलपर्यंत शिकला आहे–दोनतीनदां नापास झाला, आतां घरचं पाहतो.

तिकडे झोंपला आहे तो गुणसेन आणखी–अरे बुध्या कुठं गेला रे? ('आंत आहे बाबा, तबल्याला शाई लावतो दौतींतली') मोठा कल्पक छोकरा–सगळे तुम्हाला उपयोगी पडतील फिल्ममध्यें–हा हा हा!

**हीरो**–आपल्या भाचीसंबंधीं–

**बाबा**–अहो भाची नि भाचा! ही पोरंदेखील हीरॉईनचं काम करून जातील! हे थोरले दोघे–ए गुण्या, ए बुध्या! (फरारी गुन्हेगारांच्या चेहऱ्याचे दोघे मुलगे पुढें येतात) हेच दोघे पहा! आहेत कीं नाहीं अगदीं अश्विनीकुमार? कसा आहे 'कट' कां काय तुम्हीं म्हणतां तो? आम्हा-लाही माहिती आहे बरं का तुमच्या लाईनची–ते मद्राशांचं पिक्चर कोणतं? यल्लिकल्याणम्–आम्हीच काढलं जवळजवळ तें सगळं–लोक मोठे चांगले–एका शब्दानं आम्हांला विचारलं नाहीं–आमचीं पोरं करतील तें प्रमाण–आमची बीना म्हणजे त्यांच्या पिक्चरची राणी! संगीत तर आमचंच, रक्तांतच आहे ना तें–अरे विज्या–छायानट नाहीं तर पटदीपाचे आलाप काढ पाहूं थोडे–पण राहूं दे–(तपकीर ओढतो) तेव्हां सगळ्यांनाच घ्या–बरं पडेल!

**लेखकः**–तूर्त बीनाबाई—

**बाबाः**–अहाहा! बीनाबाई म्हणजे काय मूर्तिमंत बीन! अहो अल्लादियासाहेब देखील म्हणाले ना? आणि आमचा भीमसेन व वीरसेन म्हणजे हद्दूखा व हस्सूखांचे अवतार आहेत साक्षात्! (पाहुणे उठ-ण्याचा आव आणतात तें पाहून) बरं आतां बोला–स्पष्टच सांगा माझी भाची पाहिजे आहे तुम्हाला—

**लेखक, शेठ व हीरोः**–(एकदम) होय.

**बाबाः**–माझ्या अटी फार कडक आहेत–कळलं असेल तुम्हांला।

**शेठ**–ऐकूं द्याल तर खरं. मला पर्वा नाहीं. मी जन्टलमेंट आहे. मला बीना माझ्या पिक्चरला हवी. डफराव पिक्चर नाहीं. डायलॉग काढून टाकीन. पण गाणं पाहिजे–बाकीचे लोक डिसूम्यांटल करीन पण बीना पाहिजे–(लेखक त्याला आवरतो)

**हीरो**–आपल्या अटी–

**बाबा**–तुम्हाला अर्धा डझनाचं कॉंट्रॅक्ट केलं पाहिजे.-वीना, व तिचे भाऊ...

**शेठ**–( घाबरून भोंवतालीं बघतो; शेवटीं मनाचा धडा करून ) हरकत नाहीं. साइड कॅरेक्टर्स–

**बाबा**–( गर्जून ) छट्! साईड नाहीं नि कॅरेक्टर नाहीं–सगळेच्या सगळे हीरो ( हीरो थंडा पडतो )–निदान आतां दाखविलेले हीरो व व्हिलनला व बाकीचे मुख्य कामांना–हीरॉइनच्या अंगाशीं झटायचीं कामं तिच्या भावांकडेच पाहिजेत —

( शेठ व लेखक कुजबुजतात. लेखक मृत्युपत्र लिहिण्याच्या वेळे-सारखा चेहरा करून मान डोलवितो. )

**बाबा**–नंतर सीनॅर्यो आमचा विज्या तपासून येईल–

( लेखक उठूं लागतो त्याला बसवीत– )

**शेठ**–पण भाई सगळे कॅरेक्टर झाले मग वांधा काय ?

**बाबा**–सीनॅर्योमध्यें अश्लील, नास्तिक, अधर्मी, असत्य, अनैतिक भाग नाहीं अशीं आम्ही खात्री करून घेणार.

( लेखक डोळे मिटतो. शेठला एक कल्पना सुचते.)

**शेठ**–थांबा, सीनॅर्योच्या आधीं हा आंकडा कबूल आहे कां पहा. ( एका चिठीवर लिहून देतो, बाबा त्यांत थोडा फरक करतो, शेठ कबूल करतो. )

**बाबा**–ठीक आहे. सीनॅर्योचा त्रास तुम्हांला देत नाहीं. नंतर, आपादमस्तक बुरखा घालून माझी भाची काम करील.

( लेखक व हीरो तोंड उघडतात, पण शेठ त्यांना थांबवतो. )

**शेठ**-तुमच्या अटी लिहून घेतो, ( अट व आकड्याचें सदर असा कागद करून बाबाला दाखवितो. बाबा समजल्याचें खुणावतो. यापुढें दर अटीपुढें त्या अटीची किंमत मांडण्यांत येते. )

**बाबा**–ती कोणाचीही बायको होणार नाहीं—

(मालक आंकडे लिहित जातो; हीरो व लेखक बाहेर जाऊन गॅलरींत उभे राहतात.)

प्रेम किंवा असा कांहीं शब्द तिच्या भाषणांत किंवा गाण्यांत उपयोगी नाहीं—

तिला वेळाचा कोणताही निर्बंध लागू नाहीं—

तिला तालमी देण्यांत येऊं नयेत—

कपडे व अलंकार आम्हांला हवे ते घालूं—

तिचे भाऊ डिरेक्टरास सांगतील तें त्यानें ऐकावें—

तिच्याशीं माझ्या किंवा मुलांच्या परवानगीशिवाय कोणीही बोलूं नये, किंवा तिच्यापासून दहा हातांच्या अंतरावर जाऊं नये—

ती स्टूडिओंत येईल तेव्हां सर्व पुरुषांनीं गाडीच्या घोड्यांप्रमाणें झांपडा वापराव्या व स्त्रियांनीं तिला अदबीनें मुजरा करावा—

आम्हाला हवें तेव्हां काम बंद करूं—

स्टुडिओंत आमच्या सोयीसाठीं स्वतंत्र दिवाणखाना, फर्निचर, पानतंबाखू, सिगारेट, हुक्का, तस्त वगैरे सामग्री ठेवण्यात यावी व दोन नोकरही ठेवावे.

आमच्या दिमतीला कमींतकमी चार हजार रुपयांची मोटार द्यावी.

मुलगी, मी अथवा तिचे भाऊ यापैकीं कोणाचाही अपमान स्टुडिओंत झाला तर मालकानें आपल्या नोकरांसह दंडवत घालीत येऊन तीन दिवस आमच्या दाराशीं नाक घांसावें. आमच्याप्रमाणेंच आमचा कुत्रा, पोपट, फराळाचा डबा किंवा पाण्याचा तांब्या यांचाही अपमान होतां कामा नये—

जाहिरातींत अर्धी जागा मुलीसाठीं ठेवून बाकीच्या जागेंत इतर गोष्टी लिहाव्या. हलक्या लोकांचीं (म्हणचे आमच्याखेरीज इतर सर्व लोकांचीं) नांवें जाहिरातींत येऊं नयेत—

आम्ही कंगालपूर संस्थानचे फर्स्टक्लास सरदार असल्याचें कंपनीनें जाहीर करावें व एक तोफेच्या सलामीचा मान कायम ठेवावा—

मुलीचें तान्हें मूल कंपनीनें खूष ठेवलें पाहिजे. तें सीनमध्यें रडल्यास कोणी हरकत घेतां कामा नये. त्याच्या रडण्याचा पार्श्वसंगीताला उपयोग झाल्यास त्याबद्दल योग्य मुशाहिरा आम्हांस मिळावा.

आमचे जांवई मुलीची भेट घेण्यास वाटेल तेव्हां येतील त्यांना बंदी नसावी.

झालं, आणखी काय ? गुण्या, बिज्या, बुध्या–कारे कारट्यांनो तुम्हाला कांहीं सुचवायचें आहे का ? अहो, या पोरांच्या नादानं सारा व्याप हा ! नाहीं तर कंगालपुरांत सुखांत होतों ना मी–राजा होतों ! नबाबसाहेबांची बैठक माझ्या पडवींत–म्हणतों दिवाणखान्यांत !

( मालकाचा धीर खचत नाहीं. पोरें रुक्मिणीच्या पत्रिकेसारख्या अटींच्या याद्या आणतात. शेठ त्या खाकेंत मारतो. अटींच्या किंमतीची बेरीज करतो कांहीं हिशेब करून एक आंकडा लिहून बाबाच्या पुढें करतो. )

**शेठ**–या आंकड्याला ठोकबंद कंत्राट–आहे कबूल ? तुमच्या अटी सर्व मंजूर पण लिहायला नकोत–

( बाबा व पोरें यांची कमिटी बसते. हीरो व लेखक आंत येऊन शेठशीं कुजबुजतात. )

**बाबा** ( अपवार्य, पोरट्यांस ) शिंच्यो आंकडा तर पहा ! करून टाकतों ! मग ते आहेत नि आपण आहोंत !

**शेठ**–(अपवार्य, दुसऱ्या दोघांस ) आपल्याला नेस्टी आहे. लेट हिम खुशिफाइड, सगळें हो हो म्हणतों, एकदां रंगणांत येऊं देत मग ते आहेत नि आपण आहोंत–

**बाबा**–( खोटें हांसून ) मग काय ? शेठसाहेब, पाडतांच आम्हाला या भरीस ? ठीक आहे. तुम्ही म्हणून कबूल झालों. आम्हांला ( आंकडा एकदां नीट निरखून पाहून ) पैशाची किंमत नाहीं–मीं माणसाचा भुखा आहे–सांभाळून घ्या.

**लेखक**–( बराच वेळानें बोलण्याची संधी मिळालेला ) सेव्हर दि माइंट–काळजी नको. आमची कंपनी कल्चर आहे. उच्च दर्जाचे हौशी

लोक. हे हीरो अमॅच्यूर–नुसता पांचशें रुपये अलावन्स घेतात. आम्ही सभ्य लोक आहोंत व सेल्फ मेड! (विनयानें) मी बिलकूल शिकलेला नाहीं.

**शेठ**–शिक्षणबिक्षण आम्ही मानीत नाहीं, (लेखकाची बढाई सहन न होऊन विजयी मुद्रेनें) आपण तर मुळींच शिकलों नाहीं–

**हीरो**-(छातीवर हात मारून) या पठ्यानें कधींच शाळेंत पाऊल टाकलें नाहीं!

(तिघेही आपापसांत हस्तांदोलन करतात व खूष होऊन हांसतात. नंतर जाण्यास उठतात. नमस्कार चमत्कार–हस्तीदंती इत्यादि.)

**हीरो**–(जातांना वळून घुटमळत) पण बीनाबाईला पाहिलीच नाहीं—

**बाबा**–(घाईघाईनें) ह्यः ह्यः ह्यः! पोरीची तब्येत जरा—

**शेठ**-(हिरोला ओढीत) चला चला आतां, स्टुडिओंत दिसेलच.

**लेखक**–(सार्वजनिक नमस्कार करून) चला–ती कुलीन नटी आहे. नमस्ते!

(पुन्हां एकदां ह्यः ह्यः ह्यः इत्यादि. एक अतिप्रसंगीं कारटें शेठच्या पाठीवर थाप मारून म्हणतें 'नमस्कार!')

**सर्वजणांचा कोरस**–नमस्कार हो, मालकसाहेब!

—: मोहक पातळें आणि सुंदर कापड :—

मिळण्याचें १च ठिकाण

# महिला - स्टोअर्स

**The Home of Fancy Cloth !**

महाद्वार : : कोल्हापूर

Prop:-
M. V. Kulkarni.

आनंद वृद्धिंगत करणारे 'प्रवासांतील सोबती'

| | | |
|---|---|---|
| विद्युत्प्रकाश : | वि. स. खांडेकर | किं. १ रु. |
| काश्मिरी गुलाब : | प्रो. ना. सी. फडके | किं. २ रु. |
| वनभोजन : | वि. स. खांडेकर | किं. १ रु. |
| दिव्यचक्षु : | कु. रत्नप्रभा रणदिवे | किं. २ रु. |
| दत्तक व इतर गोष्टी : | वि. स. खांडेकर | किं. १२ आ. |

स्कूल अँण्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

## फक्त साडेतेरा रुपये

आमच्या कोणत्याहि एजंटला भेटून अर्जाचा फॉर्म भरून
दिल्यास किंवा खालील पत्त्यावर अर्जासह मनिऑर्डरीनें
अगर चेकनें पाठविल्यास

एका बाँडच जास्तींत जास्त ) **कल्पतरु बाँड** ( बक्षीस रु. ५०००

मिळण्याची व्यवस्था होईल.

अधिक माहितीकरितां लिहा अगर भेटा:—

मे. गोवारीकर ॲण्ड सन्स, स्पेशल एजंटस्, लक्ष्मीपुरी,
कोल्हापूर.

श्री. टी. आर. अभंग, स्पेशल ऑर्गनायझर, सातारा सिटी.

**महाराष्ट्र इन्शुअरन्स कं० लि०**

कऱ्हाड, जि० सातारा.

-: फक्त डोकेंबाजासाठीं :-

## -: शिरीन :-

डोकेंदुखीवरील कोणत्याहि
विलायती औषधापेक्षां प्रभावी
स्वदेशी औषध! अपायकारक
नसून, हृदयास पोषक आहे.
सर्वत्र मिळतें.

## फुरसतीचा वेळ

कसा घालवावा ?

घरपोंच पुस्तकें पोंचविणाऱ्या
**होम सर्क्युलेटिंग लायब्ररी**
महाद्वार रोड, कोल्हापूर.
नें
हा महत्त्वाचा प्रश्न
समाधानकारकपणें सोडविला
आहे.

वर्तमानकालीन सामाजिक परिस्थितीची पार्श्वभूमी

सूत्रबद्ध कादंबऱ्यांची माला—स्वयंपूर्ण तीन खंड

# उपकारी माणसें

[ तीन स्वयंपूर्ण पण सूत्रबद्ध कादंबऱ्या ]

# प्रवासातील सोबती

| साधीप्रत | प्रसिद्ध झालें : | अँटीक कापडी |
|---|---|---|
| रु. २। | पृष्ठें २८० डेमी | रु. ३। |

मध्यम वर्गातील चित्रकार तरुणाच्या पूर्वजीवनांतील



## अभ्र-पटल

(खंड २ रा)

त्याला त्यानंतर दिसलेली



## आकाश-गङ्गा

(खंड ३ रा)

एकामागून एक लवकरच प्रसिद्ध होतील !

— लेखक —

**श्री. रघुनाथ ज. सामंत, बी. ए.**

( ' हृदय ', ' वाळूंतील पाउलें ', ' सुरंगीची वेणी ', इत्यादि रसिकप्रिय कथासंग्रहांचे लेखक )

—: सोल एजंट्स व डिस्ट्रीब्यूटर्सः—

**दा. ना. मोघे, बी. ए., स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर**

# : सिताराम गणेश बावडेकर :

**केमिस्ट :** **ड्रगिस्ट :**

**गुजरी, कोल्हापूर**

आमचेकडे इंग्रजी, देशी व सर्व प्रकारचीं पेटंट औषधें, इंजेक्शन्स, ऑपरेशनचीं हत्यारें योग्य दरांत मिळतात.

व्हेटेरिनरी औषधें, इंजेक्शन्स व हत्यारें फक्त आमचेकडेच मिळतात.

# Sitaram Ganesh Bawdekar

**Chemist And Druggist**

**Kolhapur City**

We supply all kinds of Medicines, Instruments and Injections of all kinds.

—: *Speciality* :—

**The only Stockist of :—**

**Veterinary Instruments, Injections and Medicines.**